# दोन शब्द.



महापुराण हा जैनांचा परम पूज्य ग्रंथ आहे. याच्या अंतरंगासंबंधानें व ग्रंथकर्त्यासंबंधानें आम्हीं प्रस्तावनेंत विस्तारपूर्वक लिहिलेंच आहे. त्यावरून या पुराणाची थोरवी व सर्वश्रेष्ठत्व हीं वाचकांच्या सहज लक्षात येईल. महापुराणाचें समग्र मराठी भाषांतर कोल्हापूरचे स्याद्वादभूषण पं. कलाप्पा भरमाप्पा निटवे यांनीं छापून प्रसिद्ध केलें आहे. तथापि, ग्रंथविस्ताराच्या व किंमतीच्या मानानें सद्यः स्थितीकडे पाहता, पं. निटवे याच्या त्या मराठी भाषातराचा सर्वसामान्य लोकाना विशेषसा फायदा होईलसें दिसत नाहीं. यावरून श्रीयुत निटवे यांचा हा दीर्घ प्रयत्न व्यर्थ गेला असा मात्र वाचकांपैकीं कोणी आपला गैरसमज करून घेऊ नये. उलट, त्यांनीं हें भाषातर करून सर्व रसिक व विद्वान् महाराष्ट्र वाचकवर्गावर महदुपकार केले आहेत अशीच आमची समजूत आहे. व जिज्ञासु वाचकांनी रा. निटवे यांचें मूळासह असलेलें मराठी भाषांतर वाचावें अशी आम्ही त्याना आग्रहपूर्वक विनंति करितो. अस्तु; हें 'महापुराणामृत' बहुजनसमाजाला जैनवाङ्मयाची गोडी लावावी या मुख्य हेतूनें लिहिलें आहे. वेळ व पैसा थोडा खर्चून, त्याच्या योगानें सर्वांना-जैनांना व जैनेतराना—महापुराणाचा कंबहुना जैनतत्वज्ञानाचा आस्वाद पूर्णपणें घेतां येईल अशा

टीप.—१ प० निटवे यांनीं प्रसिद्ध केलेल्या महापुराणांस टपाल खर्चांसुद्धां २८ रुपये किंमत पडते.

पुस्तकाची सध्यां अत्यंत आवश्यकता आहे असें वाटून, आम्ही हा प्रयत्न केला आहे. यांत कित्येक ठिकाणीं मूळांतील संस्कृत अवतरणें घेतलीं आहेत. तसेंच, प्रत्येक श्लोकांत येणारीं व कवितेमध्येंच शोभणारीं संबोधनें आणि अनेक *ठिकाणचीं लांबलचक वर्णनें यांतून गाळलीं* आहेत. बाकी या अमृतांत मूळांतील महत्वाचा एकसुद्धां विचार गळूं नये म्हणून शक्य तेवढी खबरदारी प्रस्तुत लेखकानें घेतली आहे. यांत कांहीं ठिकाणीं पुनरुक्ति झाली आहे हें आम्हीं जाणून आहोंत. पण ती मुद्दाम ठेवण्यांत आली आहे. कारण अनेक सामान्य नीतितत्वें दिसण्यांत सोपीं असलीं, तरी तीं फार महत्वाचीं असतात; व अशीं तत्वें पुनः पुनः कर्णरंध्रांतून घुमत *राहून तीं हृत्पटलावर बिंबलीं जावींत म्हणून तीं ज्या ज्या ठिकाणीं* आलीं आहेत त्या त्या ठिकाणीं तीं कायम ठेविलीं आहेत. सारांश, हें अमृत प्राशन करितांना, परिचितांस आपण मूळ महापुराणाचाच मधुर व आल्हादजनक आस्वाद घेत आहोंत असें वाटेल; व अपरिचितांस महाकवि जिनसेनाच्या उदात्त कवित्व-शक्तीची ओळख होऊन त्यांच्या अंगीं बहुश्रुतता येईल. असो.

हें 'अमृत' तयार करण्यास माझ्या इतर व्यवसायांमुळें मला फारसा अवकाश सांपडला नाहीं; त्यामुळें यांत कांहीं दोष व चुका राहण्याचा संभव आहे. शिवाय, हा ग्रंथ ज्या छापखान्यांत छापून तयार झाला तेथें ग्रंथाचें काम करण्याचा हा पहिलाच प्रसंग असल्यामुळें कांहीं ठिकाणीं छपाईचे दोषहि

राहिले आहेत. कांहीं ठिकाणीं टाईप उडून गेला आहे. करितां, सुज्ञ व गुणग्राही वाचकांनीं या ग्रंथांतील दोषांकडे लक्ष न देतां त्यांबद्दल क्षमा करून ते आह्मांस कळविण्याची कृपा करावी; *ह्मणजे पुढील आवृत्तींत सुधारणा करण्यास ठीक पडेल.*

हें महापुराणामृत तयार करितांना पं. निटवे यांच्या मराठी भाषांतराचा आह्मांस मोठा उपयोग झाला त्याबद्दल हा लेखक त्यांचा सदैव ऋणी आहे. श्रीयुत नेमचंद वालचंद गांधी वकील यांनीं हें समग्र पुस्तक वाचून पाहून ज्या कांहीं उपयुक्त सूचना केल्या त्याबद्दल त्यांचे आह्मीं फार फार आभारी आहोंत. तसेंच, ती०श्रीयुत जीवराज गौतम दोशी यांनीं या ग्रंथाचें कामीं जी वेळोवेळीं मदत केली याबद्दल त्यांचे व जैनांतील उदार व वाङ्मयप्रसारेच्छु सद्गृहस्थ .श्रीयुत रामचंद नाथा गांधी यांनीं हा ग्रंथ प्रसिद्ध केला याबद्दल त्यांचे ही येथें मनःपूर्वक आभार मानणें अवश्य आहे.

शेवटीं, त्रिजगद्वंद्य प्रभु श्रीवृषभनाथ व त्यांचे चारित्रकार कविश्रेष्ठ श्रीजिनसेन यांना भक्तीनें वंदन करून आमची ही अल्प कृति त्या साधुद्वयांना अर्पण करितों. तसेंच, या अमृताचा स्वाद व त्याची रुचि माझ्या महाराष्ट्रबंधूंस आवडो; व त्याच्या सेवनानें त्यांचें सात्विक बल वाढो एवढीच त्या दयाघन वीतराग प्रभूपाशीं प्रार्थना करून मी वाचकांची रजा घेतो.

श्रीवीरनिर्वाणसंवत् २४४१.
विक्रमसंवत् १९७१.
तारीख १५।६।१९१५.

रावजी नेमचंद शहा, वकील.
सोलापूर.

## अनुक्रमणिका.

| पर्व. | विषय. | | पृष्ठसंख्या. |
|---|---|---|---|
| १८ | धरणेंद्राविजयार्धोपगमन. | .... | ....११३ |
| १९ | नमिविनामिराज्यप्रातिष्ठापन. | .... | ....११८ |
| २० | भगवत्कैवल्योत्पत्तिवर्णन. | .... | ....१२० |
| २१ | ध्यानवर्णन. | .... | ...१३० |
| | आर्तध्यान. | ... | ....१३१ |
| | रौद्रध्यान. | .... | ....१३१ |
| | धर्मध्यान. | ... | ....१३३ |
| | शुक्लध्यान. | .... | ...१४० |
| २२ | भगवत्समवसरणवर्णन... | .... | ....१४६ |
| २३ | भगवत्समवसृतिविभूतिवर्णन. | .... | ....१४८ |
| २४ | भगवद्धर्मोपदेशनोपवर्णन. | .... | ....१५२ |
| | जीव. .... | .... | . १५५ |
| | अजीव. .... | .... | .. १५९ |
| २५ | भगवाद्विहारवर्णन. | .... | ....१६५ |
| २६ | भरतराजदिग्विजयवर्णन. | .... | ....१७१ |
| २७ | भरतराजविजयप्रयाणवर्णन. | .... | ... १७२ |
| २८ | पूर्वार्णवद्वाराविजयवर्णन. | .... | ....१७३ |
| २९ | दाक्षिणार्णवद्वाराविजयवर्णन. | .... | ....१७७ |
| ३० | पश्चिमार्णवद्वाराविजयवर्णन. | ... | ....१७९ |
| ३१ | विजयार्द्धगुहाद्वारोद्घाटनवर्णन. | .... | ....१८० |
| ३२ | भरतोत्तरार्द्धविजयवर्णन. | .... | ....१८२ |
| ३३ | भरतराजकैलासाभिगमनवर्णन. | ... | ....१८७ |
| ३४ | भरतराजानुजदीक्षावर्णन. | ... | ....१९१ |
| ३५ | कुमारबाहुबलिरणोद्योगवर्णन. | .... | ....२०२ |

* * *

भगवद्गुणभद्राचार्यकृत महापुराणाचा उत्तरखंड.



# प्रस्तावना.



## नमः सिद्धेभ्यः ।

### भगवज्जिनसेनाचार्य व त्यांचे सच्छिष्य भगवद्गुणभद्राचार्य यांचें चरित्र.

अज्ञानांधस्य लोकस्य ज्ञानांजनशलाकया ।
चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरवेनमः ॥

अर्थः—लोक अज्ञानानें अंध झाले असतां ज्ञानांजन शलाकेनें जे त्यांचे डोळे उघडतात त्या श्रीगुरूंच्या चरणकमलीं माझे सहस्र प्रणिपात असोत.

जैनांच्या संस्कृतसाहित्यामध्यें ज्यांचें सिंहासन अति उच्च आहे असें समजलें जातें, तसेंच ज्यांनीं आपल्या अपूर्व व उदात्त कृतींनीं आपलें नांव युगयुगांतरीं अजरामर करून ठेविलें आहे अशा दोन महात्म्यांचा परिचय करून

देण्याचा आमचा विचार आहे. हे अतुलविद्यावाचस्पति महाले म्हणजे भगवज्जिनेसनाचार्य व भगवद्गुणभद्राचार्य हे होत.

## वंशपरिचय.

या महामुनींचा जन्म कोणत्या जातीमध्यें अथवा कुलामध्यें झाला हें जाणण्याची आमच्याजवळ कांहीं सामुग्री नाहीं. व त्यांनीं ही पण आपल्या ग्रंथांमध्यें या गोष्टींचा कांहीं उल्लेख केला नाहीं. उघडच आहे कीं, गृहस्थावस्थेचें स्मरण करण्याची मुनीजनांना काय आवश्यकता आहे? तसेंच, तात्कालीन व त्यानंतरच्या ग्रंथकारांना ही भगवान् जिनसेनाचार्य किंवा गुणभद्राचार्य यांच्या पारमार्थिक वंशाचें वर्णन करणें जितकें महत्वाचें वाटलें तितकें त्यांना त्यांच्या सांसारिक वंशाचें वर्णन करणें जरूरीचें वाटलें नसावें असें दिसतें. उदाहरणार्थ, महाकवि धनंजयानें भगवंताची स्तुति करितांना म्हटलें आहे कीं:—

तस्यात्मजस्तस्य पितेति देव त्वां येऽवगायन्ति कुलं प्रकाश्य ।
तेऽद्यापि नन्वाश्मनमित्यवश्यं पाणौ कृतं हेम पुनस्त्यजन्ति ॥

अर्थः—हे भगवान्! जे लोक 'आपण अमक्याचे पुत्र आहांत, अथवा अमक्याचे पिता आहांत' अशा प्रकारें आपल्या कुलाचा परिचय करून देऊन आपली स्तुति करितात, ते हातांत असलेल्या सुवर्णाला दगड म्हणून फेंकून देणाऱ्या लोकाप्रमाणें होत. वास्तविक हीच गोष्ट खरी आहे. कारण, एखाद्या महात्म्याची त्याच्या कृतीनें अथवा

त्याच्या अपार पांडित्यामुळें जी प्रशंसा होते तिजमध्यें त्याच्या कुलाचा अथवा जातीचा पत्ता लागल्यापासून कांहीं जास्त भर पडतें अशातला मुळींच भाग नाहीं. तथापि, आधुनिक कालीं ऐतिहासिक दृष्टीनें या गोष्टींचा विचार होणें हें ही अत्यंत आवश्यक आहे असें समजलें जातें. ह्मणून त्यासंबंधीं कांहीं माहिती मिळतें कीं काय हें आपण प्रथम पाहूं.

भट्टाकलंकदेवाप्रमाणें राजाश्रित अशा एकाद्या उच्च ब्राह्मणकुलामध्यें या महात्म्यांचा जन्म झाला असावा अथवा जैनब्राह्मण ( उपाध्याय ) किंवा चतुर्थ वा पंचम या तीन चार जातींपैकीं कोणत्या तरी एका जातीला त्यांनीं आपल्या जन्मानें पावन केलें असावें एवढें मात्र आह्मी अनुमानानें सांगूं शकतों. कारण, ज्या प्रांतामध्यें हे राहत होतें, तसेंच ज्या ठिकाणीं यांचा जन्म झाला असावा त्या प्रांतांत त्यावेळीं याच जातींमध्यें जैनधर्म पाळिला जात असे. भगवान् जिनसेनासंबंधीं यापेक्षां निश्चयपूर्वक असें कांहीं जास्त सांगता येत नाहीं. परंतु गुणभद्रस्वामींसंबंधीं द्राविड भाषेंतील चूडामणिनिघंटूवरून असें समजतें कीं, गुणभद्राचार्य हे तिरुनरुङ्कुण्डम् ( Tirunarunkundam ) नामक गांवचे रहिवाशी होते. हें गांव सध्यां दक्षिण अर्काट जिल्ह्यामध्यें (South Arcot District) आहे. याशिवाय, या महात्म्यांनीं कर्नाटकी व द्राविड भाषेमध्यें ही कांहीं ग्रंथ लिहिलें आहेत असें समजतें. यावरूनही हे कर्नाटक अथवा द्राविड देशामध्यें होऊन गेले असावेत हें उघड आहे.

भगवान् जिनसेन व गुणभद्र या आचार्यांच्या गृहस्थावस्थेच्या वशाचा पत्ता लागला नाहीं तरी चालेल. परतु, त्याच्या मुनिवशाचा परिचय त्याच्या ग्रथातून तसेंच इतर ग्रथातूनही चागल्या प्रकारें मिळतो ही मोठ्या संतोषाची गोष्ट आहे. जैनाचें अंतिम चोविसावें तीर्थंकर महावीर भगवान् मोक्षास गेल्यानतर—जोपर्यंत श्वेतांबर संप्रदायाची उत्पत्ति झाली नव्हती तोपर्यंत—ह्या सनातन जैनधर्मामध्यें सघभेद वगैरे मुळींच नव्हते. आर्हत्, अनेकात, जैन आदि नावानीं हा धर्म प्रसिद्ध होता. परतु विक्रमाच्या मृत्युनतर १३६ वर्षांनीं जेव्हा श्वेतांबर सप्रदाय निर्माण झाला तेव्हा दिगबर सप्रदाय मूलसघ या नावानें प्रसिद्धीस आला. भगवान् महावीर निर्वाणास गेल्यानतर सुमारें ७०० वर्षांनीं ह्मणजे अर्हद्बलि आचार्यांच्या वेळीं मूलसघामध्येंही पुढें १ नदिसघ, २ देवसघ, ३ सेनसघ, व ४ सिंहसंघ असे चार भेद झाले. व या संघामध्यें ही बलात्कार, पुन्नाट, देशीय, काणूर आदि गण, तसेंच, पारिजात, सरस्वती, पुस्तक वगैरे गच्छ स्थापन झाले. या मुनींच्या संघामध्यें कोणत्याही प्रकारच्या मतभेद नसून फक्त आपपल्या संघाबद्दलची निजत्वबुद्धि मात्र मुनींमध्यें दिसून येत असे. श्वेतांबर व दिगंबर याच्यामध्यें जसा कित्येक गोष्टीसबधीं मतभेद दिसून येतो त्याप्रमाणें या सघामध्यें अथवा गणगच्छामध्यें कसलाही विरोध नसून सर्वजण एकाच मार्गाचे अविभक्त उपासक होते. समयभूषण ग्रथामध्यें श्री-

इन्द्रनंदिसूरींनीं संघ, गण व गच्छ यासंबंधानें असाच आपला अभिप्राय व्यक्त केला आहे हें खालील श्लोकावरून दिसून येईल.

> तदेव यतिराजोऽपि सर्वनैमित्तकाग्रणीः ।
> अर्हद्बलिगुरुश्चक्रे संघसघट्टनं परम् ॥ ६ ॥
> सिंहसंघो नान्दिसंघः सेनसंघो महाप्रभः ।
> देवसंघ इति स्पष्टं स्थानस्थितिविशेषतः ॥ ७ ॥
> गणगच्छादयस्तेभ्यो जाताः स्वपरसौख्यदाः ।
> न तत्र भेदः कोप्यस्ति प्रव्रज्यादिषु कर्मसु ॥ ८ ॥

वर जे संघाचे चार भेद सांगितले त्यांपैकीं सेनसंघ नावाच्या वंशामध्यें आमच्या दोन्ही चरित्रनायकांनीं दीक्षा घेतली होती. सेनसंघाची एखादी विश्वासपात्र अशी पट्टावली आह्माला उपलब्ध न झाल्यामुळें सेनसंघाच्या प्रारंभापासून तों आमच्या चरित्रनायकापर्यंतची गुरुपरंपरा आह्माला देता येत नाहीं. तथापि, विक्रान्तकौरवीय नाटकांमध्यें हस्तिमल्लकवीनें जी आपली प्रशस्ति लिहिली आहे त्यावरून अशी माहिती मिळते कीं, गन्धहस्तिमहाभाष्याचे कर्ते स्वामी समन्तभद्राचार्य याच्या वंशामध्येंच भगवान् जिनसेन व गुणभद्र होऊन गेले. आमच्या परंपरेमध्यें श्रीसमंतभद्राचार्यानंतर ज्ञानांत महाअधिकारी असे आचार्य ह्मटले ह्मणजे श्रीमज्जिनसेनाचार्य हेच होत. त्या प्रशस्तींत वीरसेन लिहिलें आहे कीं, समन्तभद्रस्वामीचे शिवकोटि सेनसंघांतील या नावाचे दोन शिष्य होते व त्यांच्या सेन ह्या दोन

श्रीवीरसेन, जिनसेन व गुणभद्र असे आचार्य होऊन गेले. त्या प्रशस्तीमधील काहीं भाग आह्मी आमच्या वाचकाकरिता येथें देतो —

तत्वार्थसूत्रव्याख्यानगन्धहस्तिप्रवर्त्तकः ।
स्वामी समन्तभद्रोभूद्देवागमनिदर्शक ॥
अवटुतटमटिति झटिति स्फुटपटुवाचाटधूर्जटेर्जिह्वा ।
वादिनि समन्तभद्रे स्थितवति का कथान्येपाम् ॥
शिष्यौ तदीयौ शिवकोटिनामा शिवायन· शास्त्रविदां वरिष्ठौ ।
कृत्स्नश्रुतश्रीगुणपादमूले ह्यधीतिमन्तौ भवतः कृतार्थौ ॥
तदन्ववाये विदुषां वरिष्ठः स्याद्वादनिष्ठः सकलागमज्ञः ।
श्रीवीरसेनोऽजनि तार्किकश्रीःप्रध्वस्तरागादिसमस्तदोष ॥
यस्य वाचां प्रसादेन ह्यमेयं भुवनत्रयम् ।
आसीदष्टाङ्गनैमित्तज्ञानरूपं विदां वरम् ॥
तच्छिष्यप्रवरो जातो जिनसेनमुनीश्वरः ।
यद्वाङ्मयं पुरोरासीत्पुराणं प्रथमं भुवि ॥
तदीय प्रियशिष्योभूद्गुणभद्रमुनीश्वरः ।
शलाका पुरुषा यस्य सूक्तिभिर्भूषिता· सदा ॥
गुणभद्रगुरोस्तस्य महात्म्यं केन वर्ण्यते ।
यस्य वाक्सुधया भूमावभिषिक्ता मुनीश्वराः ॥

" श्रीजिनसेनाचार्यांनीं आपल्या हरिवंशपुराणाच्या शेवटीं सनर्धा`· भगवानापासून तों आपल्या वेळेपर्यंतच्या सर्व गणगच्छाम· -वें दिलीं आहेत. परंतु त्यामध्यें समन्तमार्गाचे अविभक्त· शिवकोटि, वीरसेनप्रभृति आचार्यांपैकीं

कोणत्याही आचार्याचें नांव नाहीं. यावरून असें दिसतें कीं, सेनसंघाची पुन्नाटगण नांवची जी एक शाखा आहे त्या शाखेचीच वर सांगितलेली परंपरा असावी. महापुराणाचे विद्वान् कर्ते जिनसेन हे पुन्नाटगणापैकीं नसून दुसऱ्या कोणत्या तरी गणामध्यें होऊन गेले असले पाहिजेत. आणि ह्मणूनच त्यांची गुरुपरंपरा पुन्नाटगणाच्या गुरुपरंपरेशीं मिळत नाहीं. वीरसेन, जिनसेन व गुणभद्र यांच्या ग्रंथांमध्यें ते कोणत्या गणामध्यें अथवा गच्छामध्यें होऊन गेले या गोष्टीचा कांहीं उल्लेख नाहीं. त्यांनीं जेथें जेथें आपला उल्लेख केला आहे तेथें तेथें फक्त सेनसंघाचा उल्लेख केला आहे पण गण किंवा गच्छ याचा मुळींच नामनिर्देश केला नाहीं. उदाहरणार्थ,

श्रीमूलसंघवाराशौ मणीनामिव सार्चिपाम् ।
महापुरुपरत्नानां स्थानं सेनान्वयोऽजनि ॥
तत्र वित्रासिताशेपप्रवादिमदवारणः ।
वीरसेनाग्रणीर्वीरसेनभट्टारको वभौ ॥ इत्यादि ॥

( उत्तरपुराण. )

असो. महापुराणामध्यें भगवान् जिनसेनांनीं यद्यपि आपली क्रमबद्ध अशी गुरुपरंपरा दिली नाहीं तथापि मंगलाचरणामध्यें ज्या आचार्यांना नमस्कार केला आहे त्या पैकीं समन्तभद्र, सिद्धसेन, यशोभद्र, शिवकोटि, वीरसेन व जयसेन हे सहा आचार्य होत व हे आचार्य सेनसंघांतील असावेत असें दिसतें. कारण, भद्र व सेन ह्या दोन

शब्दांचा सेनसंघाच्या आचार्यांच्या नांवाबरोबर बहुशः उपयोग केलेला आढळतो. त्यापैकीं समन्तभद्र व शिवकोटी या दोन आचार्यांचा उल्लेख वर आलाच आहे. व वीरसेन आणि जयसेन हे जिनसेनाचे गुरु होते हें आम्ही पुढें दाखविणार आहोंत. बाकीचे राहिलेले सिद्धसेन व यशोभद्र हे समन्तभद्रानंतरच्या गुरुपरंपरेंतील असावेत असें मानावें लागतें.

आमच्या चरित्रनायकांच्या गुरुपरंपरेचा क्रमबद्ध असा पत्ता चित्रकूटपुरनिवासी एलाचार्यापासून सुरू होतो. एलाचार्याजवळ वीरसेनस्वामींनीं संपूर्ण सिद्धांतशास्त्रांचें अध्ययन करून उपरितम आदि आठ अधिकार ( निबंध ) लिहिले. हे एलाचार्य कोण? व यांची गुरुपरंपरा कोणती? याचा कांहीं शोध लागला नाहीं. श्रुतावतारामध्यें मात्र त्यांच्या-संबंधीं उल्लेख केलेला आढळतो. तो असाः—

> काले गते कियत्यपि ततः पुनश्चित्रकूटपुरवासी ।
> श्रीमानेलाचार्यो बभूव सिद्धान्ततत्त्वज्ञः ॥ १७६ ॥
> तस्य समीपे सकलं सिद्धान्तमधीत्य वीरसेनगुरुः ।
> उपरितमनिबन्धनाद्यधिकारानष्टं लिलेख ॥ १७७ ॥

वीरसेन स्वामीचे विनयसेन, जिनसेन व दशरथगुरु या नांवचे तीन शिष्य होते. वीरसेनस्वामीचे श्रीपाल नांवाचे आणखी एक शिष्य होते असें जयधवलटीकेच्या प्रशस्तीवरून समजतें. वीरसेनस्वामीच्या या शिष्यांपैकीं विनयसेनस्वामीचा उल्लेख जिनसेनाचार्यांनीं आपल्या पार्श्वाभ्युदयकाव्याच्या प्रशस्तीमध्यें केला आहे. तो असाः—

श्रीवीरसेनमुनिपादपयोजभृङ्गः ।
श्रीमानभूद्विनयसेनमुनिर्गरीयान् ॥
तच्चोदितेन जिनसेनमुनीश्वरेण ।
काव्यं व्यधायि परिवेष्टितमेघदूतम् ॥ ७१ ॥

जिनसेनस्वामीसंबंधीं उत्तरपुराणाच्या प्रशस्तीमध्यें गुणभद्राचार्यांनीं असें लिहिलें आहे कीं:—

अभवदिह हिमाद्रेर्देवसिन्धुप्रवाहो ।
ध्वनिरिव सकलज्ञात्सर्वशास्त्रैकमूर्तिः ॥
उदयगिरितटाद्वा भास्करो भासमानः ।
मुनिरनु जिनसेनो वीरसेनादमुष्मात् ॥

अर्थः—ज्याप्रमाणें हिमालय पर्वतामधून गंगानदीचा प्रवाह निघतो, अथवा सर्वज्ञदेवाच्या शरीरांतून त्यांची दिव्यध्वनि निघते, किंवा उदयाचल पर्वतांतून तेजस्वी सूर्याचा उदय होतो त्याप्रमाणें भगवान् वीरसेनाच्या मागून सर्व शास्त्रांची मूर्तिच असे श्रीजिनसेनाचार्य होऊन गेले. तसेंच, आदिपुराणाच्या ( महापुराणाच्या ) प्रस्तावनेंत खुद्द जिनसेनस्वामींनीं, 'वीरसेनस्वामी हे आपले गुरु होत' असें ह्मणून अत्यंत गौरवपूर्वक त्यांचें स्मरण केलें आहे हें खालीं दिलेल्या श्लोकांवरून स्पष्टपणें दिसून येईल:—

श्रीवीरसेन इत्यात्तभट्टारकपृथुप्रथः ।
स नः पुनातु पूतात्मा कविवृन्दारको मुनिः ॥ ५५ ॥
लोकवित्वं कवित्वं च स्थितं भट्टारके द्वयम् ।
वाङ्मि वाग्मिता यस्य वाचा वाचस्पतेरपि ॥ ५६ ॥

सिद्धान्तोपनिबन्धानां विधातुर्मद्गुरोश्चिरम् ।
मन्मन सरसि स्थेयान्मृदुपादकुशेशयम् ॥ ५७ ॥
धवलां भारतीं तस्य कीर्तिं च विधुनिर्मलाम् ।
धवलीकृतनिःशेषभुवनां नन्नमीम्यहम् ॥ ५८ ॥

अर्थः—भट्टारकांची श्रेष्ठ पदवी धारण करणारे, पुण्य व कविशिरोमणि असे श्रीवीरसेनाचार्य आह्मांला पवित्र करोत ! लौकिक ( लोकस्वरूपाचें किंवा व्यवहार ) ज्ञान व कवित्व हे दोन गुण वीरसेन भट्टारकामध्यें प्रामुख्यानें वास करित होते. थोड्याच शब्दानीं पुष्कळ अर्थ दाखविणारें त्यांचें वक्तृत्व बृहस्पतीच्या पांडित्याचा सुद्धां पराजय करितें. धवल व जयधवल या नांवचे ग्रंथ लिहून सिद्धांतशास्त्रावर टिका करणाऱ्या किंवा त्यांवर प्रकरण ग्रंथ लिहिणाऱ्या अशा माझ्या गुरुमहाराजाचें कोमल चरणकमलयुगल माझ्या मनोरुपी सरोवरात चिरकाल वास करो ! त्यांच्या धवल अर्थात् पवित्र अथवा धवलटीका संबंधी वाणीला, तसेंच अखिलजग जिनें धवल केलें आहे अशा त्या चंद्रासमान निर्मल कीर्तीला माझा पुन. पुनः नमस्कार असो!

---

टीपः—१ भट्टारकाचें लक्षण नीतिसारग्रंथात असें सांगितलें आहे —

सर्वशास्त्रकलाभिज्ञो नानागच्छाभिवर्द्धकः
महामनाः प्रभाभावी भट्टारक इतीष्यते ॥

अर्थः—जो सकलशास्त्र व कला यांचा ज्ञाता आहे, जो अनेक गच्छाची वृद्धि करणारा आहे, तसेंच जो उदारमनस्क व प्रभावशील आहे, त्यास **भट्टारक** ह्मणतात.

उत्तरपुराणाच्या प्रशस्तीमध्यें जिनसेनस्वामींची प्रशंसा केल्यानंतर गुणभद्रस्वामी ह्मणतात, "ज्याप्रमाणें चंद्राचा सधर्मी सूर्य असतो त्याचप्रमाणें जिनसेनस्वामीचे सधर्मी ( गुरुबंधु अथवा एका गुरुचे शिष्य ) दशरथगुरु नांवाचे अत्यंत विद्वान असे आचार्य होऊन गेले. ह्या दोघांचे (जिनसेन व दशरथगुरु) जगत्प्रसिद्ध शिष्य गुणभद्रसूरी हे होत." ह्यावरून दोन गोष्टी निष्पन्न होतात. पाहिली, दशरथगुरु हे जिनसेनस्वामीचे सतीर्थ ( एक गुरुचे शिष्य किंवा गुरुबंधु ) होते. व दुसरी ही कीं, दशरथगुरु हे गुणभद्रस्वामींचेहि गुरु होते. बहुतकरून गुणभद्रस्वामींचे विद्यागुरु दशरथगुरु असावेत व दीक्षागुरु जिनसेनस्मामी असावेत.

कोल्हापुरीं प्रसिद्ध झालेल्या इन्द्रनंदिकृत श्रुतावतारामध्यें असें लिहिलें आहे कीं,

विंशति सहस्रसद्ग्रन्थरचनया संयुतां विरच्य दिवम् ।
यातस्ततः पुनस्तच्छिष्यो जयसेनगुरुनामा ॥ १८२ ॥
तच्छेषं चत्वारिंशता सहस्रैः समापितवान् ॥ इत्यादि ॥

अर्थः—जयधवलाच्या टीकेचे २० हजार श्लोक रचिल्यावर वीरसेनस्वामी स्वर्गवासी झाले. नंतर त्याचे शिष्य जयसेनगुरु यानीं बाकीचा राहिलेला भाग ४० हजार श्लोकांत पुरा केला. यावरून वीरसेस्वामींचे जयसेन नांवाचे ही एक शिष्य असावेत असें वाटतें. परंतु, वस्तुतः ही चूक आहे. लेखकाच्या प्रमादामुळें मूळ पुस्तकांत, किंवा प्रकाशकाच्या चुकीनें ग्रंथ छापतांना

' जिनसेनगुरु ' या शब्दाऐवजीं ' जयसेनगुरु ' असें प्रसिद्ध झालें असलें पाहिजे. कारण, जयधवला टीकेचा शेष भाग जिनसेनस्वामींनींच लिहिला आहे हें आह्मी पुढें दाखविणार आहोंत. त्यावरून जयधवला टीका जयसेन यांनीं लिहिली नसून वीरसेनस्वामीचे शिष्य श्रीजिनसेन यांनींच लिहिली असली पाहिजे हें दिसून येईल. आतां, जिनसेनस्वामींच्या दीक्षागुरुचें नांव जयसेन असें होतें ही गोष्ट खरी आहे. कारण, त्यांचा उल्लेख आदिपुराणाच्या उत्थानिकेमध्यें वीरसेनस्वामीनंतर केला आहे.

जन्मभूमिस्तपोलक्ष्म्याः श्रुतप्रशमयोर्निधिः ।
जयसेनगुरुः पातु बुधवृन्दाग्रणीः स नः ॥ ५८ ॥

अर्थः—तपोरुपी लक्ष्मीचें आधस्थान व शास्त्र आणि शांति यांचे निधि व विद्वानाग्रणी असे श्रीजयसेनगुरु आमचे रक्षण करोत!

याप्रमाणें आपणाला वीरसेस्वामींच्या तीन शिष्यांचा उल्लेख मिळतो. आणखी असेच वीरसेनस्वामींचे महाविद्वान् असे किती शिष्य होते हें कोणाला सांगता येईल ?

जिनसेनस्वामींच्या शिष्यांमध्यें मुख्यतः गुणभद्रस्वामीचाच उल्लेख केलेला आढळतो. यावरून गुणभद्र हेच सर्वांत अधिक प्रसिद्ध होते असें दिसतें जिनसेनस्वामींचे दुसरे गृहस्थाश्रमी जगद्विख्यात शिष्य महाराजाधिराज अमोघवर्ष हे होत. यांनीं राज्यत्याग केला होता. यांचा विशेष परिचय आह्मी पुढें करून देणार आहोंत. गुणभद्र-

स्वामींच्या अनेक शिष्यांपैकीं फक्त दोन शिष्यांची मात्र थोडीशी माहिती आमच्याजवळ उपलब्ध आहे. त्यांचे पहिले शिष्य लोकसेन हे होत. यांनाच उपदेश करण्याकरितां गुणभद्राचार्यांनीं 'आत्मानुशासन' नांवाच्या ग्रंथाची रचना केली. यांचे दुसरे शिष्य मण्डलपुरुष. यांनीं 'चूडामणिनिघण्टु' नांवाचा द्राविडभाषेमध्यें कोश रचिला आहे. लोकसेन मुनींविषयीं उत्तरपुराणाच्या प्रशस्तींत असा उल्लेख आढळतोः—

विदितसकलशास्त्रो लोकसेनो मुनीशः ।
कविरविकलवृत्तस्तस्य शिष्येषु मुख्यः ॥
सततमिह पुराणे प्राप्य साहाय्यमुच्चै-
र्गुरुविनयमनैषीन्मान्यतां स्वस्य सद्भिः ॥ २५ ॥

अर्थः—गुणभद्रस्वामींच्या सर्व शिष्यांमध्यें लोकसेन नांवाचे मुनीश्वर प्रमुख शिष्य होते. हे नामांकित कवि व उत्कृष्ट चारित्रधारी होते. तसेंच, हें उत्तरपुराण रचण्याच्या कामीं त्यांनीं अत्यंत विनयानें आपल्या गुरूंना फारच साहाय्य केल्यामुळें हे विद्वानांना अत्यंत पूज्य झाले होते. मंडलपुरुषानें स्वतः 'गुणभद्रस्वामी हे माझे गुरु आहे' असें आपल्या कोशामध्यें लिहिलें आहे. क्षत्रचुडामणीकाव्याच्या प्रस्तावनेंत श्रीयुत कुप्पूस्वामीशास्त्री यांनीं मंडलपुरुषकृत चुडामणिनिघंटूची प्रशस्ति उद्धृत केली आहे. परंतु द्राविडभाषेचें ज्ञान नसल्यामुळें ती आम्हाला येथें देतां आली नाहीं.

---

टीपः—१ मंडलपुरुष हें नांव मुनि अथवा आचार्यासारखें दिसत नाहीं. बहुतकरून हे विद्वान गृहस्थी असावेत

येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून पाहतां आमच्या चरित्रनायकांच्या वंशवृक्षाचा विस्तार खालीं लिहिल्याप्रमाणें होतो.




वीरसेनस्वामींच्या मागून जिनसेनस्वामींनीं व जिनसेनांच्या मागून गुणभद्रस्वामींनींच किंवा दुसऱ्या कोणत्या आचार्यांनीं आचार्यपद धारण केलें हें आतां आपण पाहूं.

देवसेनसूरीनें आपल्या दर्शनसारग्रंथांत काष्टासंघाची उत्पत्ति देतांना असें लिहिलें आहे कीं,

---

टीपः—१ एलाचार्य हेच यांचे आचार्य नसूनांनादी वीरसेनस्वामी हे त्याच्याजवळ सिद्धान्त शिकण्याकरितां गेले असावेत. किंवा वीरसेनस्वामींचे दीक्षागुरु दुसरे कोणी आचार्य असले पाहिजेत.

श्रीवीरसेनशिष्यो जिनसेनः सकलशास्त्रविज्ञानी ।
श्रीपद्मनन्दिपश्चात् चतुःसंघसमुद्धरणधीरः ॥ ३१ ॥
तस्य च शिष्यो गुणवान् गुणभद्रो दिव्यज्ञानपरिपूर्णः ।
पक्षोपवासमण्डितः महातपः भावलिङ्गश्च ॥ ३२ ॥
तेन पुनोपि च मृत्युं नीत्वा मुनेः विनयसेनस्य ।
सिद्धान्तं घोसित्वा स्वयं गतं स्वर्गलोकस्य ॥ ३३ ॥

अर्थः—श्रीपद्मनन्दिच्या मागून श्रीवीरसेनाचार्यांचे सकलआगमज्ञ शिष्य जिनसेन हे चतुःसंघाचे स्वामी (आचार्य) झाले. नंतर त्यांचे गुणवान् शिष्य गुणभद्र यांनीं आचार्यपद शोभित केलें. हे दिव्यज्ञानी, एक एक पक्षाचें, (पंधरवड्याचा) उपोषण करणारे, अत्यंत तपस्वी व मुनीलिंगधारी होते. ह्यांनीं विनयसेनाच्या मागून सिद्धान्ताचा उपदेश केला. व स्वर्गाला गेले.

यावरून असें दिसतें कीं, वीरसेनस्वामीनंतर पद्मनंदि नांवाचे मुनि संघाधिपति झाले. त्यांच्या पश्चात् जिनसेस्वामींनीं आचार्यपद सुशोभित केलें. याचप्रमाणें जिनसेनस्वामीनंतर विनयसेन व त्यांच्या मागें गुणभद्रस्वामी पट्टाधीश झाले. पद्मनंदि आचार्य कोण होते यासंबंधीं निश्चयपूर्वक असें

**टीपः**—१ पद्मनंदि हे नाव **नंदि**संघाच्या आचार्यांसारखें दिसतें. कारण, नंदि, चंद्र, कीर्ति अथवा भूषण हे चार शब्द प्राय. नंदिसंघाच्या मुनींच्या नांवाबरोबरच आढळून येतात. सेनसंघाच्या आचार्यांच्या नांवाबरोबर सेन, भद्र, राज व वीर्य या शब्दांचा उपयोग केलेला आढळतो. आता काहीं कारणामुळें पद्मनंदि हे नंदिसंघाचे आचार्य असून ही त्यांना सेनसंघाचें आचार्यपद दिलें असेल.

कांहीं सांगतां येत नाहीं. जिनसेन व गुणभद्र यांच्या उपलब्ध असलेल्या ग्रंथांमध्यें यांचा कांहीं नामनिर्देश नाहीं. परंतु, जर पद्मनंदि हें एलाचार्यांचेंच दुसरें नांव असलें, व–अशी प्रसिद्धी हीं आहे–तर मात्र असें असण्याचा संभव आहे कीं, वीरसेनाचे एलाचार्य ( यांचा उल्लेख श्रुतावतारकथेमध्यें आला आहे ) नावाचे जे गुरु होते तेच वीरसेनाच्या मागून संघाधिपति झाले असावेत. व त्याच्या पश्चात् जिनसेन होऊन गेले असावेत. विनयसेन जिनसेनस्वामींचे सतीर्थ (•एका गुरुचे शिष्य ) असून विद्वान्ही होते. ह्मणून जिनसेनाचार्यांच्या पश्चात् ते (विनयसेन) आचार्य झाले असतील यांत मुळींच शंका नाहीं. विनयसेनाचा उल्लेख पार्श्वाभ्युदयकाव्यामध्यें हीं केला आहे. गुणभद्रस्वामीनंतर बहुतकरून त्यांचे पट्टशिष्य लोकसेन यांनीं आचार्यपद सुशोभित केलें असलें पाहिजे.

## स्थानपरिचय.

मुनींचें राहण्याचें स्थान नियत केलेलें नसतें. एकाच ठिकाणीं राहिल्यानें मुनींचें चारित्र्य मलिन होण्याचा संभव असतो. ह्मणूनच दिगंबर मुनी हे एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं निरंतर विहार करीत करीत आपल्या उपदेशानें जगाचें कल्याण करित असतात. विक्रमाच्या नवव्या शतकामध्यें जेव्हां भगवान् जिनसेन व गुणभद्र होऊन गेले तेव्हां शेंकडों दिगंबरमुनी विहार करीत असत. व त्यांच्या संघाचें शासन संघाधिपति आचार्य

कारित असत. तथापि त्या कालाचा व तात्कालीन परिस्थितीचा थोडा बहुत प्रभाव मुनींच्या चारित्र्यावर झाला होता. व ह्मणूनच तात्कालीन आचार्यांनीं देशकालानुसार एकाच ठिकाणीं न राहण्याच्या तसेंच राजसभेमध्यें वगैरे न जाण्याच्या नियमांमध्यें थोडीशी सवलत दिली होती. भगवान् जिनसेन व गुणभद्र हे एकाच ठिकाणीं जरी राहत नव्हते तथापि त्यांचा बहुतेक काल कर्नाटक व महाराष्ट्र प्रांतांतच गेला असावा. कारण, याच प्रांतांत राष्ट्रकूट वंशाचे राजे त्याकाळीं(इ.स. च्या ८ व्या शतकांत)राज्य कारित होते. जैनमुनींना ह्या प्रदेशांइतका दुसरा कोणताही प्रदेश निरापद नव्हता. इतकेंच नव्हे, पण हे आचार्य बहुतकरून राजधानीमध्येंच जास्त राहत असून तेथूनच जैनशासनाचा उद्योत (प्रकाश) करीत असावेत. कारण, अमोघवर्ष, अकालवर्ष

टीप-अमोघवर्ष राजाची जिनसेनाचार्यावर केवढी दृढभक्ति होती हे गुणभद्राचार्यांनीं उत्तरपुराणाच्या प्रशस्तींत दिलेल्या खालील श्लोकावरून सहज कळून येण्यासारखें आहे:--

यस्य प्रांशुनखांशुजालविसरद्धारान्तराविर्भव।
त्पादांभोजरजः पिशंगमकुटप्रत्यग्ररत्नद्युतिः ॥
संस्मर्ता स्वममोघवर्षनृपतिः पूतोऽहमद्येत्यलं।
स श्रीमान् जिनसेनपूज्यभगवत्पादो जगन्मंगलम् ॥८॥

यावरून अमोघवर्ष हा जिनसेनस्वामींच्या चरणावर आपलें मस्तक ठेवण्यांत किती धन्यता मानित होता हें सहज दिसून येतें शिवाय, अमोघवर्षानें भगवान् जिनसेनांना आपल्या घराण्याच्या गुरुपदाचा बहुमान दिला होता हें योगिराट् पंडिताचार्य यांच्या खालीं दिलेल्या श्लोकावरून स्पष्टपणें दिसून येईल --

बंकापुरे जिनेंद्राघ्रिसरोजेंदिन्दिरोपम. ।
अमोघवर्षनामाऽभून्महाराजो महोदय ॥ ३ ॥
स स्वस्य जिनसेनार्यं विधाय परमं गुरुम् ।
सद्धर्मं द्योतयंस्तस्थौ पितृवत्पालयन्प्रजाः ॥ ४ ॥

व लोकादित्य आदि तात्कालीन राजे ह्या आचार्यांचे भक्त होते ही गोष्ट प्रसिद्ध आहे. व ह्या राजांचा त्यांना आपल्या राजधानींत राहण्याचा आग्रह होत असला पाहिजे. राजधानीशिवाय इतर ठिकाणीं राहिल्याबद्दचा उल्लेखहि क्वचित्‌च आढळतो. इतरत्र न राहण्याचें कारण, त्यावेळीं धर्मद्वेष वाढल्याप्रमाणावर असल्यामुळें दिगंबर आचार्यांना भारतवर्षाच्या एका टोंकापासून तों दुसऱ्या टोंकापर्यंत निःशंकपणें विहार करून धर्मोपदेश करता येण्यासारखी अनुकूल परिस्थिति नव्हती. निदान, जैनमुनींना तरी सर्व अखिल भारतवर्षांत विहार करण्याची परवानगी नसावी. ह्मणून ज्या प्रांताचे राजे जैनधर्मी होते, निदान जेथील राजे जैनधर्माचा द्वेष तरी करीत नव्हते अशाच प्रांतांत जैनमुनी विहार करून धर्मोपदेश करीत असत. राष्ट्रकूटवंशातील कांहीं राजे जैनधर्माचे उपासक होते हीं गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. व बाकीचे कांहीं जैन-धर्मानुयायी नसले तरी जैनधर्माचे द्वेष्टे नव्हते ही गोष्ट निर्विवाद आहे.

गुणभद्राचार्यांनीं उत्तरपुराणाची समाप्ति बंकापुरांत केली. बंकापूर ही वनवास देशाची राजधानी असून येथें अकालवर्षाचा सामन्त लोकादित्य हा राजा राज्य करित होता. आजमितीस बंकापूर हा धारवाडप्रांतांत एक कसबा आहे. पार्श्वाभ्युदयकाव्य हें अमोघवर्षराजाची राजधानी जी मान्यखेट तेथें विनयसेनमुनींच्या विनंतीवरून जिनसेनाचार्यांनीं शा.शके ७३७च्या सुमारास रचिलें.

मान्यखेट नगर हें त्यावेळीं कर्नाटक व महाराष्ट्र

या दोन्ही प्रांतांच्या राजधानीचें ठिकाण होतें एवढी एकच गोष्ट सांगितली ह्मणजे या नगराच्या वैभावाची कल्पना वाचकांस सहज येईल. तात्कालीन शिलालेखामध्यें या नगराला इंद्रपुरीची उपमा दिली आहे. त्यावेळीं त्या दोन्ही प्रांतांत मान्यखेटाइतकें विस्तृत, वैभवसंपन्न व धनधान्य युक्त असें दुसरें शहर नव्हतें. परंतु, आज त्याच शहराकडे पाहिल्यास प्राचीन काळीं हें एक मोठें वैभवसंपन्न शहर होतें या गोष्टीवर कोणाचा विश्वासही बसणार नाहीं. सांप्रत, मान्यखेटला ' मलखेड ' असें ह्मणतात. हैद्राबाद रेलवे लाइनीवर चितापूर स्टेशनाच्यापुढें मलखेडगेट नांवाचें एक लहानसें स्टेशन आहे; या स्टेशनापासून मलखेड गांव हें ४।५ मैल दूर आहे. ह्या गांवाच्या पश्चिमेस एक किल्ला आहे. किल्ल्यानजीकच एक विस्तीर्ण व रमणीय नदी वाहत आहे. प्राचीन काळीं या किल्ल्यामध्यें एक विशाल व सुंदर जैनमंदिर असून तेथें सुवर्णाच्या बहुमूल्य प्रतिमा होत्या असें सांगतात. परंतु आज तें मंदिर बुजविलें असून त्याच्या फक्त काहीं खाणाखुणा तेवढ्या दिसतात. मुंबईमध्यें श्रीरत्नकीर्ति नांवाचे जे भट्टारक राहत होते ( हे आपण मलखेडच्या गादीचे स्वामी आहोंत असें सांगत असत ) ते ह्मणत असत कीं, किल्ल्यांतील एका जैनमंदिराच्या भुया-रामध्यें हिरे, पांच, माणिक आदि नानाप्रकारच्या रत्नाच्या अंगुष्ठप्रमाण ५१ प्रतिमा आहेत. व प्रयत्न केल्यास लोकांना त्यांचें दर्शनही होतें हें मंदिर एका उपाध्यायाच्या ता-

व्यांत आहे. पूर्वी तर किल्लासुद्धां जैनांच्याच ताब्यांत होता; परंतु सध्यां नाहीं. गांवांत आज फक्त एकच जैनमंदिर आहे. बाकींचीं जैनचैत्यालयें मोडकळीस आली असून तेथें आज अन्यधर्मी लोकांच्या प्रतिमा आहेत. जिनेंद्रदेवाच्या ठिकाणीं आतां जरी अन्यदेवांच्या मूर्ति *स्थापिल्या आहेत तरी सुद्धां हें पूर्वी जैनमंदिरच होतें हें* दाखविण्यास आजमित्तीस ही अनेक चिन्हें अस्तित्वांत आहेत.

मलखेड येथें मूलसंघी भट्टारकाची एक गादी अद्याप आहे. परंतु आजमित्तीस इतर ठिकाणच्या गादीप्रमाणेंच या गादीचीही अत्यंत शोचनीय स्थिती झाली आहे. या गादीचे भट्टारक कोण आहेत? येथील अद्वितीय ग्रंथ-भांडार कोठें आहे? वगैरे गोष्टींचा कांहीं सुद्धां पत्ता लागत नाहीं. पूर्वी दक्षिणेंत ही गादी मुख्य समजली जात असे. व सेतवाल, कासार आदि सर्व जैन जाति यांच मठाधिपति भट्टारकाला कांहीं नियमित भेट देत असत. परंतु पुढें जेव्हां या गादीच्या दोन शाखा लातूर व कारंजा येथें स्थापन झाल्या, तसेंच भट्टारकांमध्येंही शिथिलाचार वाढूं लागला तेव्हां हळूं हळूं येथील गादीचें महत्व कमी कमी होत जाऊन शेवटीं ती रसातळास पोंचली. जेथें शेंकडों वर्षें-पर्यंत भगवान् वीरसेन, जिनसेन,. गुणभद्र व अकलंक या सारखे महान्तपस्वी व अतुल विद्यावाचस्पति होऊन गेले, जेथें विजयधवल, महापुराण व उत्तरपुराण यांसारखे अपूर्व ग्रंथ रचिले गेले तेथें आज मितीस त्या महापुराणांतलि

एका श्लोकाचा अर्थ जाणणारी एक व्यक्तिसुद्धां मिळत नाहीं हें पाहून कोणत्या सहृदय माणसाचें अंतःकरण विदीर्ण होणार नाहीं? हाय! जी मलखेड नगरी एकेकाळीं जैन साम्राज्याची केंद्रभूमी झाली होती त्या इतिहास प्रसिद्ध प्राचीन नगरींमध्यें फार काय नाहीं, पण फक्त प्राचीन जैनमंदिरांचा जीर्णोद्धार करून, भगवान् जिनसेन व गुणभद्र यांचें तेथें स्मारक करणारा जैनामध्यें एकसुद्धां महापुरुष आज आढळू नये काय?

हे निर्घृण काला, तुझी लीला अत्यंत विचित्र आहे! तुझ्या विशाल उदारगर्भामध्यें आह्मांस पूज्य अशीं मान्यखेटा-सारखीं किती तरी शहरें कायमचीं गडप झाली असतील हें कोण सांगूं शकेल?

मान्यखेटामध्यें [1]बहुतकरून बलात्कार गणाची गादी असावी. मान्यखेटामध्यें सेनसंघाच्या आचार्याशिवाय इतर संघांचेही अनेक आचार्य होऊन गेले अशी माहिती उपलब्ध आहे. देवसंघाचे आचार्य भगवान् अकलंकदेवभट्ट हे ही

---

**टीप —१** विक्रमशकाच्या नवव्या शतकाच्या सुमारास मान्यखेट येथें राष्ट्रकूटवंशातील अमोघवर्ष राजाच्याच घराण्यात 'साहसतुंग' (शुभतुंग) नावाचा राजा होऊन गेला. **अकलंकदेव** हे या राजाच्या पुरुषोत्तम प्रधानाचे 'पुत्र होत ही गोष्ट' अकलंक चरित्राच्या वाचकांना विदितच आहे.

**प्रो के. बी. पाठक** यांनीं इ स १८९२ सालीं रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुंबई येथील शाखेसमोर '**भर्तृहरी व कुमारिलभट्ट**' या विषयावर एक निबंध वाचला होता त्यात '**अकलंकदेव** हे राष्ट्रकूटवंशीय **शुभतुंग** राजाचे समकालीन होते, व शुभतुंग हा आठव्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेला' असें त्यांनीं म्हटलें आहे

मान्यखेट नगरांतच होऊन गेले. अकलंकदेवाचे शिष्य प्रभाचंद्र व विद्यानन्दि हे जिनसेनाचार्यांचे समकालीन होते. आणि हे दोन्ही आचार्यही मान्यखेट नगरातच होऊन गेले असावेत.

याप्रमाणें जेथें भगवान् जिनसेनाचार्य व गुणभद्रस्वामी आदि विद्वान् महर्षि होऊन गेले तें मान्यखेट नगर एकेकाळीं मोठमोठ्या विद्वानांचें, जाड्या पंडितांचें व गुणज्ञ जैनी राजाचें निवासस्थल आणि भगवती जिनवाणीचें क्रिडामंदिर होतें.

---

## कालनिर्णय.

भगवाज्जिनसेनाचार्यांचा जन्म अजमासें शक संवत ६७५ ( वि. सं. ८१० ) मध्यें झाला असला पाहिजे असें आज्ञास उपलब्ध झालेल्या माहितीवरून समजतें. कारण, जिनसेन नावाच्या दुसऱ्या एका आचार्यानें आपल्या हरिवंशपुराण नावाच्या ग्रथात आमचे चरित्रनायक जिनसेनाचार्य व त्याचे गुरु वीरसेनाचार्य यांच्यासंबंधी असा उल्लेख केला आहेः—

जितात्मपरलोकस्य कवीनां चक्रवर्तिनः ।
वीरसेनगुरोः कीर्तिरकलङ्कावभासते ॥ ३९ ॥
यामिताऽभ्युदये तस्य जिनेंद्रगुणसंस्तुतिः ।
स्वामिनो जिनसेनस्य कीर्तिं संकीर्तियत्यसौ ॥४०॥
वर्द्धमानपुराणोद्यदादित्योक्तिगभस्तय. ।
प्रस्फुरान्ति गिरीशान्त.स्फुटस्फटिकभि.त्तिषु ॥ ४१ ॥

अर्थः—ज्यानीं परलोक जिंकिला आहे व जे कवींचे

---

टीपः-१ कित्येक प्रयात पार्श्वजिनेंद्रगुणसंस्तुति. असा पाठ आहे

चक्रवर्ती आहेत त्या वीरसेनगुरूची धवल कीर्ति प्रकाशमान होत आहे. जिनसेनस्वामींनीं भगवान् पार्श्वनाथाच्या गुणांची जी अपार स्तुति केली त्यामुळें त्यांची कीर्ति सर्वत्र पसरून त्यांचा चांगला अभ्युदय झाला. व त्यांनीं रचिलेल्या वर्द्धमान पुराणरूपी उगवत्या सूर्याचीं उक्तिरूपी किरणें विद्वान पुरुषांच्या अंतःकरणरूपी स्फटिकभूमींमध्यें स्फुरायमान होतात.

या श्लोकांवरून असें समजतें कीं, जेव्हां हरिवंशपुराणाची रचना झाली तेव्हां आदिपुराणकार जिनसेन हे विद्यमान होते. तसेंच हरिवंशपुराणकारांनीं प्रथम वीरसेन गुरूची प्रशंसा करून नंतर जिनसेनाचार्यांच्या उल्लेख केला आहे. त्यावरून वीरसेनाचे शिष्य आमचे चरित्रनायक जिनसेनाचार्यच होत याबद्दलही शंका राहत नाहीं. व त्या वेळीं आमचे चरित्रनायक जिनसेनाचार्य यांनीं 'पार्श्वजिनेंद्र-स्तुति.' व 'वर्द्धमानपुराण' या नांवचे दोन विद्वत्तापूर्ण ग्रंथ लिहिले होते. हे दोन्ही ग्रंथ तात्कालीन विद्वानांना मान्य झाले असून त्यांची फार वाहवा झाली होती. शिवाय, त्यांच्या नांवाबरोबर 'स्वामी' असें पद लाविलें आहे. त्यावरूनही त्यांना त्यावेळीं एक आदरणीय मुनि समजत असत असें दिसतें. तसेंच ज्यावेळीं हरिवंशपुराण रचिलें

---

टीपः—१ तत्वार्थसूत्रव्याख्याता स्वामीति परिपठ्यते।
(नीतिसार)

अर्थः—तत्वार्थसूत्रावर व्याख्यान (टीका) करणाऱ्याला अथवा त्याचा व्याख्यान (अर्थ) सांगणाऱ्याला '**स्वामी**' असें म्हणतात.

त्यावेळीं आमचे चरित्रनायक श्रीजिनसेनस्वामी यांचें वय अगदीं थोडें ह्मणजे अजमासें २५ वर्षांचें असावें असें दिसतें. कारण, त्या वयाच्या पूर्वी एवढें मोठें पाण्डित्य, एवढा गौरव व स्वामी ही पदवी मिळणें शक्य दिसत नाहीं. आतां, हरिवंशपुराण हें शकसंवत ७०५ मध्यें समाप्त झालें ही गोष्ट त्या पुराणाच्या प्रशस्तींतील श्लोकांवरून सिद्ध होते. व हरिवंशपुराणाची लोकसंख्या अजमासें दहा बारा हजार आहे. एवढा मोठा ग्रंथ रचण्यास अजमासें कमींत कमी पांच वर्षें तरी लागली असावीत. हरिवंशपुराणकारांनीं ग्रंथारंभींच आदिपुराणकार जिनसेस्वामींची प्रशंसा केली आहे. अर्थात् ग्रंथास प्रारंभ शकसंवत ७०० ( वि. सं. ८३५ ) मध्यें झाला असावा. त्यांतून जिनसेनस्वामींच्या वयाचीं २५ वर्षें वजा केलीं असतां, आपल्या चरित्रनायकाचा–श्रीजिनसेनाचार्यांचा–जन्म अजमासें शकसंवत ६७५ ( वि. सं. ८१० ) मध्यें झाला असावा असें ठरतें.

येथपर्यंत भगवज्जिनसेनाचार्यांचा जन्म केव्हां झाला असावा हें आह्मी दाखविलें. आतां ते स्वर्गवासी केव्हां झाले हें पाहूं. याबद्दलचा नक्की काल सांगण्याला जरी आमच्याजवळ कांहीं साधन उपलब्ध नाहीं तरी अनुमानानें जिनसेनस्वामी हे अजमासें शकसंवत ७६० ( वि सं. ९०५ ) मध्यें स्वर्गवासी झाले असावेत एवढें आह्मी सांगूं शकतो. कारण, वीरसेनस्वामींनीं सिद्धांतशास्त्रावर 'वीरसेनीया' नां-

याची जी टीका लिहिली आहे तिचा शेषभाग श्रीजिनसेनस्वामींनी शकसंवत ७५९ मध्यें समाप्त केला असें जयधवलाटीकेच्या प्रशस्तींतील खालीं दिलेल्या श्लोकांवरून समजतें.

इति श्रीवीरसेनीया टीका सूत्रार्थदर्शिनी ।
मटग्रामपुरे श्रीमद्गुर्जरार्यानुपालिते ॥
फाल्गुने मासि पूर्वान्हे दशम्यां शुक्लपक्षके ।
प्रवर्धमानपूजायां नन्दीश्वरमहोत्सवे ।
अमोघवर्षराजेन्द्रप्राज्यराज्यगुणोदया ।
निष्ठितप्रचयं यायादाकल्पान्तमनाल्पिका ॥
षष्ठिरेव सहस्राणि ग्रंथानां परिमाणतः ।
श्लोकेनानुष्टुभेनात्र निर्दिष्टान्यनुपूर्वशः ॥
विभक्तिः प्रथमस्कन्धो द्वितीयः संक्रमोदयः ।
उपयोगश्च शेषास्तु तृतीयस्कन्ध इष्यते ॥
एकान्नषष्टिसमधिकसप्तशताब्देषु शकनरेन्द्रस्य ।
समतीतेषु समाप्ता जयधवला प्राभृतव्याख्या ॥
गाथासूत्राणि सूत्राणि चूर्णिसूत्रं तु वार्तिकम् ।
टीका श्रीवीरसेनीयाऽशेषापद्धतिपञ्चिका ॥
श्रीवीरप्रभुभाषितार्थघटना निर्लोडितान्यागम-
न्याया श्रीजिनसेनसन्मुनिवरैरादेशितार्थस्थितिः ।
टीका श्रीजयचिन्हितोरुधवला सूत्रार्थसम्बोधिनी
स्थेयादारविचन्द्रमुज्ज्वलतमा श्रीपालसम्पादिता ॥

भावार्थः— याप्रमाणें सूत्रार्थ प्रगट करणारी ही

वीरसेनीया टीका फार विस्तृत आहे. व अमोघवर्ष महाराजाच्या विशाल राज्यछत्राखालीं या टीकेची उत्तमपणामुळें प्रसिद्धी झाली आहे. फाल्गुन शुद्ध दशमीच्या पूर्वाण्हसमयीं अष्टान्हिक महोत्सव व नंदिश्वर पूजा हीं चालू होतीं. अशा पर्वकाळीं ही टीका संपूर्ण झाली असल्यामुळें कल्पान्तकालापर्यंत इचा नाश होणार नाहीं. अनुष्टुप् श्लोकांच्या हिशोबानें या टीकेचे एकंदर ६० हजार श्लोक होतात. या टीकेचे तीन स्कंध आहेत. त्यांचीं नांवें क्रमानें विभक्ति, संक्रमोदय व उपयोग हीं होत. शकसंवत ७५९ मध्यें कषायप्राभृताची ही जयधवला टीका समाप्त झाली. गाथासूत्र, सूत्र, चूर्णिसूत्र, वार्तिक व वीरसेनीया टीका अशा प्रकारचा या पंचांगी टीकेचा क्रम आहे. या टीकेंत वीरभगवंताच्या उपदेशाचा-

---

टीपः— १ या भावार्थांत कांहीं ठिकाणीं ' वीरसेनीया ' व कांहीं ठिकाणीं ' जयधवला टीका ' असे जे दोन प्रयोग आले आहेत ते वाचकांना किंचित् घोटाळ्यात पाडतील. वास्तविक, कषायप्राभृताची ( याला प्रायोदोष प्राभृत असें ही ह्मणतात हा ज्ञानप्रवाद नावाच्या पाचव्या पूर्वाच्या दहाव्या वस्तूचा तिसरा प्राभृत होय ) वीरसेनस्वामी व जिनसेनस्वामीकृत जी ६० हजार श्लोकात्मक टीका आहे तिचें नांव ' वीरसेनीया ' असें आहे. व वीरसेनीया टीकेसहित कषायप्राभृताचीं मूलसूत्रें, चूर्णिसूत्रें व इतर आचार्यांच्या वार्तिक वगैरे टीका या सर्वांच्या समुदायाला ' जयधवला टीका ' असें ह्मणतात हा संग्रह श्रीपाल नामक आचार्यांनीं केला आहे ह्मणून जयधवला टीकेला श्रीपालसंपादिता, असें विशेषण वर दिलें आहे कषायप्राभृताचे मूल गाथासूत्र ( १८३ श्लोक ) व विवरणसूत्र ( ५०३ श्लोक ) गुणधरकृत आहेत. चूर्णिसूत्र ( ६००० श्लोक ) यतिवृषभाचार्यकृत आहेत व वार्तिक ( ६० हजार श्लोक ) बहुतकरून बप्पदेवगुरुकृत असावेत.

संग्रह केला गेला आहे. दुसऱ्या आगमांतील विषयही यांत गोंविलें आहेत. या टीकेंत श्रेष्ठ अशा श्रीजिनसेन मुनीश्वरांनीं आपल्या गुरूंनीं उपदेशिलेला सूत्रार्थ लिहिला आहे. व श्रीपाल नामक मुनी हे या टीकेचे संग्राहक होत. सूत्रार्थांचा बोध करणारी ही अतिशय पवित्र व प्रकाशमान जयधवला टीका यावच्चंद्रदिवाकरौ या संसारांत विद्यमान (स्थिर) राहो।

वीरसेनीया टीकेचा प्रथम स्कंध वीस हजार श्लोकाचा असून तो वीरसेनस्वामींनीं लिहिला आहे. व बाकीचा भाग त्याचे शिष्य जिनसेनस्वामी यांनीं पुरा केला ही गोष्ट इन्द्रनंदिकृत श्रुतावतारकथेमध्यें ही स्पष्टपणें लिहिली आहे. उ.

" गुरुमहाराजाची आज्ञा घेऊन श्रीवीरसेनगुरु चित्रकूटाहून माटग्रामाला आले. तेथें आनतेंद्रानें बांधिलेल्या जिनमंदिरात राहून त्यांनीं व्याख्याप्रज्ञप्ति ( वप्पदेवगुरुकृत ) मिळविली. त्याचे जे पहिले ( कर्मप्राभृताचे ) सहाखंड आहेत त्यांपैकीं सहाव्या खंडाचा संक्षेप केला. व सर्वांची बंधनादि अठरा अधिकारामध्यें ( अध्यायामध्यें ) प्राकृतसंस्कृतभाषामिश्र अशी धवला नावाची टीका ७२ हजार श्लोकात गुंफिली. नंतर वीरसेनस्वामी दुसऱ्या कषायप्राभृताच्या पहिल्या स्कंधाच्या चार विभक्तीवर जयधवला नावच्या टीकेचे वीस हजार श्लोक रचून स्वर्गवासी झाले. मग त्याचे शिष्य श्रीजयसेनगुरु यानीं आणखी ४० हजार श्लोक रचून ती टीका संपविली. याप्रमाणें जयधवला टीकेचे ६० हजार श्लोक संपूर्ण आहेत."

यांत वीरसेनाच्या शिष्याचें नांव 'जयसेनगुरु' ह्मणून जें लिहिलें आहे तें चुकीचें आहे हें आह्मी पूर्वी सांगितलेंच आहे. कारण, वीरसेनस्वामीचा 'जयसेन' नांवाचा कोणी शिष्य नसून 'जिनसेन' नांवाचाच शिष्य होता. दुसरें, विबुध श्रीधरकृत गद्यश्रुतावरांत *जयसेनाच्या ऐवजीं जिनसेन असें लिहिलें आहे यावरून* वाचकांस वरच्या आमच्या विधानाची सत्यता सहज पटेल. त्यांतला उतारा आह्मी खालीं दिला आहे.

अत्रान्तरे एलाचार्यभट्टारकपार्श्वे सिद्धान्तद्वयं वीरसेननामा मुनिः पठित्वाऽपराण्यपि अष्टादशाधिकाराणि प्राप्य पंचखण्डे षट्खण्डं संकल्प्य संस्कृतप्राकृतभाषया सत्कर्मनाम टीकां द्वासप्ततिसहस्रप्रमितां धवलनामाङ्कितां लिखाप्य, विंशतिसहस्रकर्मप्राभृतं विचार्य्य वीरसेनमुनिः स्वर्गं यास्यति। तस्य शिष्यो जिनसेनो भविष्यति सोऽपि चत्वारिंशत्सहस्रैः कर्मप्राभृतं समाप्तिं नेष्यति। अमुना प्रकारेण षष्टिसहस्रप्रमिता जयधवलनामाङ्किता टीका भविष्यति॥

इन्द्रनंदिकृत श्रुतावरकथेमधील वर जो आह्मी उतारा दिला आहे तोच अर्थ वरच्या उताऱ्याचा आहे. फक्त जयसेनाच्याऐवजीं जिनसेन हे वीरसेनाचे शिष्य होते एवढा मात्र फरक आहे.

याशिवाय भगवद्गुणभद्रांनीं उत्तरपुराणाच्या प्रशस्तींत *जिनसेनस्वामीला 'सिद्धान्तशास्त्राचे टीकाकार' असें* ह्मटलें आहे. उदाहरणार्थः—

जिनसेनभगवतोक्तं मिथ्याकविदर्पदळनमातिललितम्।
सिद्धान्तोपनिबंधकर्त्रा भर्त्रा चिराद्विनायासात् ॥

अर्थः— मिथ्या कवींच्या गर्वाचें निर्दाळन करणारें हें अत्यंत सुंदर महापुराण सिद्धान्तावर ( कषायप्राभृताची ) शेष टीका विशेष परिश्रम न घेतां लिहिणारे व चिरकाल संघाचें पालन करणारे श्रीजिनसेनस्वामी यांनीं लिहिलें आहे. यावरूनसुद्धां जयधवला टीकेचा बाकीचा भाग आदिपुराणकार जिनसेनस्वामींनींच लिहिला ही गोष्ट सिद्ध होते. याशिवाय या बाबतींत जास्त पुराव्याची जरूर नाहीं असें आम्हांस वाटतें.

आतां आपण आपल्या प्रस्तुत विषयाकडे वळूं. श्रीजिनसेनाचार्य हे शक संवत ७५९ पर्यंत होते ही गोष्ट येथपर्यंत दिलेल्या पुराव्यावरून निःसंशय ठरतें. या पुढें आणखी किती वर्षेपर्यंत त्यांनीं या अवनितलास पवित्र केलें हें पाहूं.

जयधवला टीका संपूर्ण झाल्यावर आदिपुराणाची रचना झाली असावी अशी आमची समजूत आहे. कारण, आदिपुराणाची प्रस्तावना जेव्हां लिहिली गेली तेव्हां वीरसेनस्वामी हे सिद्धांत शास्त्रावरील दोन्ही टीकेचे कर्ते समजले जात होते, तसेंच त्यावेळीं ते इहलोक सोडून गेले होते, हीं दोन्ही अनुमानें खालील श्लोकावरून निघतात.

सिद्धान्तोपनिबन्धानां विधातुर्मद्गुरोश्चिरम् ।
मन्मनःसरसि स्थेयान्मृदुपादकुशेशयम् ॥ ५७ ॥

या श्लोकाचा अर्थ पूर्वीं आम्ही दिलाच आहे. जर

आदिपुराण जयधवला टीकेच्या पूर्वी लिहिलें असतें तर या श्लोकांत वीरसेनस्वामींना ' सिद्धांतावर ·टीका लिहिणारे ' असें जें विशेषण दिलें आहे तें आदिपुराणांत आलें नसतें. वीरसेनस्वामींनीं, पूर्वींच ' टीका ' रचिली होती, ह्मणूनच तें विशेषण आदिपुराणांत आलें आहे. तसेंच ' त्यांचे कोमलचरणकमल माझ्या हृदयसरोवरांत वास करोत ! ' अशी जी श्रीजिनसेनस्वामींनीं इच्छा प्रदर्शित केली आहे त्यावरून असें ध्वनित होतें कीं, त्यावेळीं वीरसेनस्वामींचा स्वर्गवास झाला असला पाहिजे. कारण, त्याशिवाय गुरुचरणांचें स्मरण करण्याची जरूरी नव्हती. शिवाय, ज्या अर्थीं महापुराण अपुरें ठेवून जिनसेनस्वामी स्वर्गास गेले आहेत त्याअर्थीं महापुराण ही त्यांची शेवटचीच कृति असली पाहिजे ही गोष्ट स्वयंसिद्ध आहे. जयधवला टीका त्यापूर्वी पुष्कळ वर्षे अगोदर लिहिली असली पाहिजे हें उघडच आहे.

आतां, महापुराणास प्रारंभ केव्हां झाला, व त्याचा उत्तरभाग लिहिण्यास गुणभद्रस्वामींनीं केव्हां सुरवात केली हें समजण्यास आह्मांजवळ कांहीं सामुग्री उपलब्ध नाहीं. फक्त उत्तरपुराणाच्या समाप्तीच्या वेळीं त्याच्या शेवटच्या प्रशस्तींत शकसंवत ८२० मध्यें महापुराण समाप्त झालें असें गुणभद्रस्वामींनीं लिहिलें आहे. महापुराणाचा शेष भाग जो गुणभद्रस्वामींनीं पुरा केला त्याचे दहा हजार श्लोक आहेत. गुणभद्रस्वामींनीं एकसारखें दररोज दहा दहा पांच पांच श्लोक रचिलें असें जरी धरिलें तरी दहा हजार श्लोकांची रचना

करण्यास त्यांना पांच वर्षे लागलीं असतील हें अगदीं उघड आहे. परंतु एवढ्यावरूनच जिनसेनस्वामी हे शक संवत ८१५ च्या सुमारास स्वर्गस्थ झाले असें समजणें मात्र चुकीचें आहे. कारण, या कालांत १४० वर्षांचें आयुष्य असणें संभवनीय दिसत नाहीं. यावरून असें दिसतें कीं, जिनसेनस्वामींचें देहावसान झाल्यावर महापुराण पुष्कळ वर्षेपर्यंत तसेंच अपुरें राहिलें असलें पाहिजे. पुढें गुणभद्रस्वामींनीं तें कार्य हातीं घेतलें असावें. जिनसेनस्वामीनंतर संघाधिपति विनयसेन झाले हें आह्मीं पूर्वीं दाखविलें आहे. व त्याच्या पश्चात् गुणभद्रस्वामी झाले. यावरून असें अनुमान निघतें कीं, गुणभद्रस्वामीकडे संघाधिपत्य अर्थात् आचार्यपद आल्यावर त्यानीं महापुराण लिहिण्यास सुरवात केली असली पाहिजे. महापुराणासारखा महान् आर्ष ग्रंथ एका संघाधिपति अनुभवी ऋषींच्या हस्तेंच पुरा होणें जरूर व योग्य आहे व त्यामुळेंच महापुराणाचें काम कांहीं वर्षेपर्यंत तसेंच त्यांनीं अपुरें ठेविलें असावें यांत मोठेसें आश्चर्य नाहीं.

दुसरें, जयधवला टीका संपूर्ण झाल्यावर जर महापुराण रचण्यास सुरवात झाली तर दहा हजार श्लोक रचण्यास अजमासें १० वर्षे तरी लागलीं असली पाहिजेत. महापुराणाचा जेवढा भाग श्रीजिनसेनस्वामीकृत आहे तेवढ्या भागाचे दहा हजार श्लोक आहेत. महापुराणास सुरवात झाली तेव्हां जिनसेनाचार्यांचें वय अजमासें ८० वर्षांच्या वरच झालें असावें. ह्या हिशेबानें शक संवत ७७० पर्यंत

किंवा निदान कमींत कमी ७६५ पर्यंत तरी जिनसेन-स्वामी हयात होते असें मानण्यास कोणतीही हरकत नाहीं. याप्रमाणें भगवान् जिनसेनाचार्य आजन्म अस्खलित ब्रह्मचर्य, संयम व यथायोग्य यतिधर्म पाळून व या जगावर अनंत उपकार करून आपल्या वयाच्या ९० व्या किंवा ९५ वर्षाच्या सुमारास परलोकवासी झाले असावेत.

---

## भगवान् गुणभद्राचार्यांचा कालनिर्णय.

*भगवद्गुणभद्राचार्यांचा कालनिर्णय करणें याहूनही जास्त कठीण आहे. कारण, त्यांनीं उत्तरपुराणाशिवाय दुसऱ्या कोणत्याही ग्रंथामध्यें आपली प्रशस्ति दिली नाहीं. तसेंच त्यांच्या समकालीन विद्वानांपैकीं कोणीहि त्याच्याविषयीं काहीं लिहिलेलें उपलब्ध नाहीं.* देवसेनसूरीनें आपल्या दर्शनसार ग्रंथाच्या गाथेंत म्हटलें आहे कीं, '*गुणभद्रस्वामी* हे जिनसेनस्वामींचे शिष्य होते. त्यानीं *विनयसेनमुनींचें* देहावसान झाल्यावर सिद्धांताचा उपदेश केला. व शेवटीं *ते ही स्वर्गस्थ झाले.*'

विनयसेनाचा शिष्य कुमारसेन या नांवाचा होता. त्यानें पुढें संन्यासभ्रष्ट होऊन काष्टासंघ चालविला. यावरून असें दिसतें कीं, विनयसेन व गुणभद्रस्वामी यांच्या निधनानंतर कुमारसेन संन्यासभ्रष्ट झाला. पुढें त्यानें काष्टासंघ स्थापिला. दर्शनसार ग्रंथाच्या गाथेमध्यें काष्टासंघाच्या

उत्पत्तिसंबंधानें असें ह्मटलें आहे कीं, ' नंदितट गांवांत विक्रम ( शालिवाहन ) राजाच्या मृत्युनंतर ७५३ वर्षांनीं काष्ठासंघ स्थापन झाला. त्या गांवीं शास्त्रज्ञ असा कुमारसेन सल्लेखनाच्या वेळीं दर्शनभ्रष्ट झाला.'

सध्यां जो शकसंवत आपणांत चालू आहे तो शक शालीवाहनाच्या जन्मापासून धरण्यांत येतो. व वर जो ७५३ शक दाखविला आहे तो शालीवाहनाच्या मरणसमयींचा आहे. ह्मणून शालीवाहनाच्या वयाचीं ८९ वर्षें त्यांत मिळविलीं पाहिजेत. ह्मणजे ७५३+८९=८४२ शक संवतामध्यें काष्ठासंघाची उत्पत्ति झाली असें ठरतें

यावरून ही गोष्ट सिद्ध होतें कीं, शकसंवत ८४२ च्या पूर्वीं व शके ८२० च्या नंतर गुणभद्रस्वामी परलोकवासी झाले असावेत. शके ८२० च्यापूर्वीं असें ह्मणण्याचें कारण हें कीं, गुणभद्राचार्यांनीं महापुराणाची समाप्ति शके ८२० मध्यें केली हें आह्मीं पूर्वीं सिद्ध करून दाखविलेंच आहे. आत्मानुशासन, जिनदत्तचारित्र आदि कांहीं ग्रंथ गुणभद्रस्वामींनीं रचिले आहेत. परंतु त्या ग्रथांची प्रशस्ति नसल्यामुळें ते ग्रंथ महापुराणाच्या पूर्वीं लिहिलें किंवा मागाहून लिहिलें हें कांहीं नक्की सागता येत नाहीं. हे ग्रथ महापुराणानंतर लिहिलें असें जर मानिलें तर शके ८२० नंतर सुद्धां कांहीं

---

टीपः— १ शकसंवत चालविणाऱ्या शालीवाहनाचें नाव ' विक्रम ' असें होतें व जैनग्रथांमध्ये जेथे जेथें विक्रमाब्द असा शब्द लिहिला आहे तेथें तेथें बहुत करून शकसंवत या अर्थानेच तो योजिला आहे

वर्षे गुणभद्रस्वामी हयात होते हें सिद्ध होतें. असो.

मडलपुरुपकृत चूडामणिनिघंटूवरून गुणभद्राचार्यांच्या जन्म व दीक्षादिकालाचें निश्चित ज्ञान होण्याचा बराचसा संभव आहे. सबब, द्राविडभाषिभिज्ञानीं तो ग्रथ अवश्य वाचावा अशी आह्मीं त्याना येथें शिफारस कारितों.

---

## भगवज्जिनसेनाचार्यांचे ग्रंथ.

भगवज्जिनसेनाचार्यांचे 'आदिपुराण' व 'पार्श्वाभ्युदयकाव्य' हे दोन ग्रंथ सुप्रसिद्ध असून हल्लीं उपलब्धही आहेत. जयधवलाटीकेचा शेषभाग सर्वत्र उपलब्ध नाहीं. मुडबिद्रीच्या सुप्रसिद्ध सिद्धात मंदिरामध्यें त्याची एक प्रत आहे हरिवंशपुराणाच्या प्रस्तावनेवरून जिनेंद्रगुणस्तुति व वर्धमानपुराण हे दोन ग्रंथ जिनसेनाचार्यांचे आहेत असें समजतें. परंतु हे ग्रंथ आजमित्तीपर्यंत तर उपलब्ध नाहींत. एवढेंच काय, पण हे दोन ग्रथ जिनसेनस्वामींनीं लिहिलें आहेत हें ही कोणास माहित नाही. या ग्रंथाशिवाय हरिवंशपुराण हें ही जिनसेनस्वामीकृत आहे असें कांहीं विद्वानाचें ह्मणणें आहे. प्रोफेसर. के. बी. पाठक व श्रीयुत टी. एस् कुप्पूस्वामी शास्त्री प्रभृति कांहीं विद्वानांनीं ही आदिपुराणाचे कर्ते भगवान् जिनसेन यांनीं हरिवंशपुराण लिहिलें असें ह्मटलें आहे. परंतु ही त्याची चूक आहे. हरिवंशपुराणकार जिनसेन व आदिपुराणकर्ते जिनसेन हा दोन व्यक्ति अगदीं भिन्न होत्या ही गोष्ट खालील प्रमाणावरून अगदीं स्पष्टपणें सिद्ध होतें.

१ आदिपुराणकार जिनसेन यांच्या विद्यागुरुचें नांव वीरसेन व दीक्षागुरुचें नांव जयसेन असें होतें ही गोष्ट आम्ही वर आदिपुराण, पार्श्वाभ्युदय उत्तरपुराण, श्रुतावतार, दर्शनसार आदि कांहीं ग्रंथाच्या आधारें सिद्ध करून दाखविली आहे. परंतु हरिवंशपुराणाचेकर्ते जिनसेन आपल्या गुरुचें नाव कीर्तिसेन होतें असें लिहितात.

२ आदिपुराणकरांनीं आपल्या संघाचें नांव सेन असें लिहिलें असून गणाचें नांव मुळींच दिलें नाहीं. हरिवंशकारांनीं आपल्या संघाचें नांव वगैरे कांहीं न देतां आपण पुन्नाटगणाचे आहोंत एवढेंच लिहिलें आहे. शिवाय दोघाची गुरुपरंपराही एकमेकाशीं मुळींच मिळत नाहीं. हरिवंशपुराणाच्या प्रशस्तींत त्यानीं आपली गुरुपरंपरा दिली आहे. त्यांत वर्धमानस्वामीपासून जयसेनगुरूपर्यंतची गुरुपरंपरा देऊन त्यांनीं म्हटलें आहे कीं, जयसेनगुरुचे शिष्य अमितसेन गुरु होते. हे पुन्नाटगणाचे मुख्य आचार्य होते. त्याचे पश्चात् त्याचे जेष्ठबंधु व धर्मसहोदर कीर्तिषेण हे आचार्य झाले. हे अत्यंत शांत, तपस्वी व धर्माचे मूर्तिमंत अवतार होते. त्या कीर्तिषेणाचा मुख्य शिष्य जिनसेनसूरि ह्यानीं आपल्या अल्पबुद्ध्यनुसार हरिवंशपुराण रचिलें. हरिवंशपुराणाचे कर्ते पुन्नाटगणाचे असून ते सेनसंघी जिनसेनाहून भिन्न होते.

३ हरिवंशपुराणाच्या प्रारंभीं ग्रंथकर्त्यानें जिनसेन व त्यांचे गुरु विनयसेन यांची प्रशंसा केली आहे. यावरून प्रशंसा करणारे ग्रंथकार प्रशंसित जिनसेनाशिवाय दुसरे

होते ही गोष्ट अगदीं स्पष्ट होतें

४ हरिवंश व उत्तरपुराण यातील कथाभागामध्यें कित्येक ठिकाणीं फरक आहे. हरिवंशपुराणात नेमिनाथ तीर्थंकराचा जन्म सौरीपुरामध्यें झाला असें म्हटलें आहे. व उत्तरपुराणात द्वारकेंत झाला असें लिहिलें आहे. यावरूनही आदिपुराणकार व हरिवंशकार ह्या दोन व्यक्ति वेगळ्या असाव्यात हें स्पष्ट होतें. कारण, उत्तरपुराण आदिपुराणकाराचे शिष्य गुणभद्राचार्य यानीं लिहिलें आहे. आता, हरिवंशपुराण हें जर गुणभद्राचार्यांचे गुरु श्रीजिनसेन यानीं रचिलें असतें तर गुणभद्राचार्यांनीं आपल्या गुरूंनीं लिहिलेल्या कथाभागाविरुद्ध केव्हाही लिहीलें नसतें. शिवाय, हरिवंशपुराण कर्ते व उत्तरपुराणकर्ते हे वेगळ्या वेगळ्या संघाचे आचार्य असल्यामुळें याच्या कथाभागातही मतभेद दिसून येतो.

५ हरिवंशपुराण व आदिपुराण हे दोन्ही ग्रंथ रचणारे कवि वेगळे वेगळे होते ही गोष्ट या दोन्ही ग्रंथाचा अत्यंत विचारपूर्वक स्वाध्याय करणाऱ्याच्या ध्यानांत सहज येतें. कारण दोघाची काव्यशैली, कथानक सांगण्याची पद्धत, उत्प्रेक्षा, कल्पना आदि सर्व गोष्टींत बरेचसें अंतर दिसून येतें.

हरिवंशपुराणाशिवाय अलंकारचिंतामणि या नांवाचा एक अलंकार विषयक ग्रंथ ही भगवज्जिनसेनाचार्यांच्या नावानें प्रसिद्ध झाला आहे. परंतु, ग्रंथाच्या मुखपृष्ठावरील 'भगवज्जिनसेनाचार्यकृत' या शब्दाशिवाय हा ग्रंथ जिनसेनाचार्यांनीं

लिहिला असावा याला दुसरें कोणतेंच सबळ प्रमाण नाहीं. सुमारें वीस वर्षांपूर्वी हा ग्रंथ 'काव्याम्बुधि' नांवाच्या मासिकपुस्तकांत प्रसिद्ध झाला होता. ह्या मासिकाचे संपादक बेंगलोर येथील सुप्रसिद्ध जैनविद्वान् पद्मराजपंडित हे होते. त्यांत त्यांनीं हा ग्रंथ अजितसेनाचार्यकृत ह्मणून लिहिलें आहे. यावरून हा ग्रंथ अजितसेनाचार्यांचाच असावा असें दिसतें. असो. जरी हा ग्रंथ अजितसेनाचार्यकृत नसला तरी देखील भगवज्जिनसेनाचार्यकृत नाहीं यांत मुळींच शंकाच नाहीं. कारण, त्यांत वाग्भट्टालंकारांतील तीन श्लोकांचा उतारा दिला आहे. व वाग्भट्टालंकारकर्ते हे वि० सं० ११७९ मध्यें ह्मणजे जिनसेनस्वामीनंतर अजमासें ३०० वर्षांनीं होऊन गेले. याशिवाय खालीलही श्लोक पहा.

श्रीमत्समन्ताभद्राचार्यजिनसेनादिभाषितम् ॥
लक्ष्यमात्रं लिखामि स्वनामसूचितलक्षणम् ॥ (पान ३०)

ह्या श्लोकांत स्वतः कवि आपण जिनसेनाचार्याहून भिन्न आहोंत असें सांगतात. यावरून अलंकारचिंतामणि हा ग्रंथ जिनसेनाचार्यकृत नव्हे हें स्पष्टपणें सिद्ध होतें.

जयधवलाटीकेचा शेषभाग भगवज्जिनसेनाचार्यकृत आहे हें आह्मीं पूर्वी सिद्ध करून दाखविलें आहे. याशिवाय, प्राकृतशब्दानुशासनाचे कर्ते महाकवि त्रिविक्रम यांच्या प्रशस्तीवरून अशी माहिती मिळते कीं, जिनसेनस्वामींनीं कांहीं प्राकृत भाषेत ग्रंथ लिहिले असावेत. हें खालील श्लोकावरून सिद्ध होतें; व त्यांपैकींच प्रायः संस्कृतप्राकृतमिश्र वीरसेन[illegible]-टीकेचा शेषभाग हा एक ग्रंथ असला पाहिजे.

श्रीवीरसेनजिनसेनाचार्यादि वचः पयोधितः कतिचित् ।
प्राकृतपदरत्नानि प्राकृतकृतिभूषणाय विचिनोति ॥
( प्राकृतशब्दानुशासन. )

भावार्थः— मी आपल्या ग्रंथास शोभा यावी ह्मणून श्रीवीरसेन व जिनसेन या आचार्यांच्या वाक्सागरांतून काहीं प्राकृत पदरत्नांचा संग्रह केला आहे. असो.

याप्रमाणें जिनसेनस्वामीचे मुख्य ग्रंथ ह्मटले ह्मणजे १ वर्द्धमानपुराण २ पार्श्वस्तुति, ३ जयधवलाटीका, ४ आदिपुराण, ५ पार्श्वाभ्युदयकाव्य हे पांच होत असें निश्चित होतें. याशिवाय, द्रोपदिबंध वगैरे दोन चार ग्रंथ ही जिनसेनाचार्यांच्याच नांवावर मात्र विकले जातात. तथापि, जोंपर्यंत आह्मांला ते ग्रंथ चांगल्या रीतीनें पहावयास मिळाले नाहींत तोपर्यंत ते ग्रंथ कोणी लिहिलें असावेंत हें सांगणें फार कठीण आहे. कारण, जिनसेन नावाचे आणखीही अनेक विद्वान् आचार्य होऊन गेले आहेत.

वर सांगितलेल्या पांच ग्रंथांपैकीं सध्यां पार्श्वाभ्युदय व आदिपुराण हे दोन ग्रंथ सर्वांस महशूर असून उपलब्धही आहेत. सबब, त्याच ग्रंथाचें येथें थोडेसें समालोचन करूं.

पार्श्वाभ्युदयः— हें एक खंडकाव्य असून याचे मंदाक्रांता वृत्तांत ३६४ श्लोक आहेत. संस्कृतसाहित्यांत अशा

---

टीप.—१ भगवज्जिनसेनकृत ' जिनसहस्रनामस्तोत्र ' ही आहे. परंतु त्याचा आदिपुराणातच समावेश होत असल्यामुळें आह्मी निराळा नामनिर्देश केला नाहीं.

उत्पन्न झाल्यामुळें त्यानें आपल्या मुलाना मंत्रिपद देऊन स्वत. जिनदीक्षा घेतली. एके दिवशीं, अरविंद राजा मरुभूति मंत्र्याला आपल्याबरोबर घेऊन वज्रवीर्य राजावर स्वारी करण्यास गेला. तेव्हा मागें कमठ निरंकुश झाला. त्याचें मन मरुभूतीची पत्नी जी वसुंधरा तिजवर बसलें; व त्यानें तिला युक्तिप्रयुक्तीनें फसवून तिचें शील भंग केलें इकडे, राजा अरविंद शत्रूला जिंकून विजयी होऊन परत आपल्या राजधानीस आला; त्याला कमठाचें हें दुराचरण इकडे येण्याच्या पूर्वींच समजलें होतें. राजानें मरुभूतिमंत्र्याला बोलावून विचारिलें कीं, ' भातृजायेशीं संबंध ठेवणाऱ्या दुष्टाला काय शासन करावें " त्यावर मरुभूतीचें उत्तर ऐकून घेऊन अरविंद राजानें त्याला घरीं परत पाठविलें व कमठाची फार निर्भत्सना करून त्याला देशाबाहेर हांकून दिलें. कमठ आपल्या भावावर अत्यत क्रुद्ध होऊन भूताचलपर्वतावर गेला; व तेथें त्यानें संन्यास धारण केला. इकडे मरुभूति परत आल्यावर त्याला कमठाला शिक्षा झाल्याचें वर्तमान समजलें. तेव्हां त्याला अत्यत वाईट वाटलें. व तो कमठाचा तपास करीत भूताचलपर्वतावर गेला. तेथें त्याच्या पायां पडून त्याला घरीं चल क्षणून मरुभूतीनें पुष्कळ विनविलें परतु त्याचा परिणाम कमठावर उलट झाला; व त्यानें क्रोधाच्या आवेशात तपश्चरणाकारितां हातात धरलेली शिला मरुभूतीच्या मस्तकावर आपटली. त्यासरशीं त्याचा प्राण निघून गेला. तदनतर या दोघा बंधूंनीं नाना प्रकारच्या योनीमध्यें अनेक जन्म धारण

केले. त्यांत प्रत्येक जन्मीं कमठानें मरुभूतीचा प्राण घेतला. शेवटीं, मरुभूतीचा जीव वाराणसीच्या विश्वसेन महाराजांची पत्नी जी वामादेवी (ब्राह्मी) इच्या उदरीं पार्श्वनाथ तीर्थंकर होऊन जन्मला. व कमठ हा शंबर नामक ज्योतिर्षीदेव झाला पुढें एकेवेळीं, पार्श्वनाथ भगवान् हे दीक्षावनांत कार्योत्सर्ग ध्यानामध्यें निमग्न असतांना शंबर ज्योतिर्षीदेव विमानांत बसून आकाशमार्गानें जात होता. त्यावेळीं तेथें त्याचें विमान अडकलें. त्यायोगें त्याला पूर्वजन्मीच्या वैराचें स्मरण होऊन त्यानें सूड घेण्याच्या बुद्धीनें प्रभूला भयकर उपसर्ग करण्यास आरंभ केला." हेंच कथानक घेऊन भगवज्जिनसेनाचार्यांनीं पार्श्वाभ्युदय काव्य रचिलें. यांत शंबर देवाला यक्ष, ज्योतिर्भवनाला अल्कापुरी व मेघदूतांत ज्याप्रमाणें यक्षाला एका वर्षाचा शाप दिला होता त्याप्रमाणें येथें शंबर देवाला ही एक वर्षाचाच शाप दिला होता असें कवीनें मानिलें आहे. याशिवाय, या काव्यांत कवीनें पूर्व व वर्तमान भवांचाही कांहीं भेद पाळिला नाहीं. आतां आपण कविकुलमुकुटमणि कालिदासाच्या सुप्रसिद्ध मेघदूतकाव्याकडे वळूं.

मेघदूतांत म्हणण्यासारखें काहीं देखील संविधानक नाहीं ही गोष्ट प्रथम सांगणें जरुर आहे कारण, त्यांतील विषय म्हटला म्हणजे कायतो, एका शापाभिहत यक्षानें आपल्या विरहानें विव्हल, झालेल्या कृशांगी गृहिणीस रामगिरीपासून अल्कापूरीपर्यंत निर्जीव अशा मेघरूपी दूताबरोबर पाठविलेला संदेशच होय. हें मेघदूतांतील कथानक अत्यंत साधें असूनही याला कालिदासानें आपल्या अलोट कल्पनाशक्तीनें, अद्भूत बुद्धिवैभवानें, व

अत्युत्कृष्ट कवित्वानें फारच सुदर पेहराव चढविल्याचें आपणास दिसून येतें या खडकाव्याचा पाया इतका निर्जीव असूनही त्यावर कवीनें उभारलेली इमारत इतकी सुदर, भव्य, रमणीय व चित्ताकर्षक भासतें कीं, तिच्यातील प्रत्येक देखावा डोळ्यापुढें मूर्तिमत उभा राहतो. व तिच्यातील प्रत्येक गोष्टीचें वर्णन अगदीं हुबेहूब असल्यामुळें तें जणू काय त्या त्या गोष्टीशीं आपला प्रत्यक्ष परिचय करून देत असल्याचें दिसतें. याप्रमाणें मेघदूताच्या सविधानकाची वाचकाना थोडीशी ओळख करून देऊन आम्ही आपल्या प्रस्तुत विषयाकडे वळतों. आता वर दिलेल्या दोन्ही काव्याच्या कथानकावरून मेघदूताच्या कथानकात व पार्श्वचरित्राच्या कथानकात जमिन अस्मानचें अतर आहे हें अगदीं स्पष्ट होतें अशी स्थिति असताना, मेघदूतातील प्रत्येक चरण घेऊन पार्श्वचरित्र रचणें किती कठिण आहे याची रसिक व मर्मज्ञ काव्यकारानाच चागली कल्पना येईल. अशा प्रकारचा ग्रथ रचतांना क्लिष्टता, नीरसता वगैरे अनेक दोष येण्याचा फार सभव असतो परतु पार्श्वाभ्युदय हें क्लिष्टता, नीरसता वगैरे सर्व दोषापासून अलिप्त आहे. यातील कोणताही श्लोक घ्या आपण कोणत्या तरी एका काव्याची समस्यापूर्ति करित आहोंत असें आपणास कधींही वाटणार नाहीं. हें काव्य वाचित असताना वाचकाना एका नवीन व अपूर्व शैलीच्या काव्यरसाचा आस्वाद चाखण्यास मिळतो यात मुळींच सदेह नाहीं

महाकवि जिनसेनाची कविता कविकुलगुरु कालि-

दासाच्या कवितेच्या योग्यतेची आहे असें आह्मीं ह्मटल्यास कालिदासभक्तांना थोडेसें साहसाचें वाटेल. परंतु, एवढी गोष्ट मात्र वाचकांस सांगितल्याशिवाय आमच्यानें राहवत नाहीं कीं, कालिदासाच्या ग्रंथाचें सध्यां जितकें अध्ययन, अध्यापन, आलोचन व प्रत्यालोचन होत आहे तितकें जर श्रीजिनसेनाचार्यांच्या ग्रंथांचें होईल तर या आमच्या कविकुलमुकुटमणीचें आसन संस्कृतसाहित्यांत कल्पनातीत उच्च गेल्याशिवाय राहणार नाहीं अशी आमची खात्री आहे. कोणत्याहि कारणानें कां असेना, जैनेतर विद्वानांमध्यें जिनसेन कवीच्या ग्रंथांचें पठन, पाठन होत नाहीं; व आजमितीस जैनांमध्येंहि तसा ह्मणण्यासारखा कोणी विद्वान नाहीं ही अत्यंत दुःखाची गोष्ट आहे. व जे कोणी आमच्यांत आहेत त्यांच्या द्वारें या कविरत्नाचें गुण प्रगट होण्याची आशा नाहीं. तथापि 'कालो ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी' या भवभूति कवीच्या उक्तीकडे लक्ष देऊन आह्मीं आपलें समाधान करून घेतों. कारण, केव्हाना केव्हां तरी कविश्रेष्ठ जिनसेनाचें ग्रंथ निष्पक्षपाती विद्वानाच्या हातीं जाऊन आपले यथार्थ गुण प्रकट केल्याविना राहणार नाहींत असा आमचा पूर्ण भरवंसा आहे. अशा निष्पक्षपाती विद्वद्रत्नांपैकींच प्रोफेसर के. बी. पाठक हे एक होत. त्यांनीं रॉयल एशियाटिक सोसायटीपुढें 'कुमारिलभट्ट व भर्तृहरि' या विषयावर जो एक निबंध वाचून दाखविला होता त्यांत जिनसेनस्वामीसंबंधानें आपला अभिप्राय असा दिला आहेः—

"जिनसेन lived on into the reign of Amogha warsha I as he tells us himself in the पार्श्वाभ्युदय. This poem is one of the curiosities of Sanskrit literature It is at once the product and the mirror of the literary taste of the age. The first place among Indian poets is alloted to कालिदास by consent of all. जिनसेन, however, claims to be considered a higher genius than the author of Cloud Messenger ( मेघदूत )."

अर्थ:—पार्श्वाभ्युदयकाव्यांत जिनसेनांनीं स्वतः सांगित्याप्रमाणें ते पहिल्या अमोघवर्ष राजाच्या कारकीर्दीत होऊन गेले. पार्श्वाभ्युदय हा संस्कृत साहित्यांत एक कौतुकजनक उत्कृष्ट ग्रंथ असून तत्कालीन साहित्याच्या अभिरुचीचें हें एक आदर्शभूत फल आहे. सर्वानुमतें भारतीय कवींमध्यें कालिदासाला पहिलें स्थान ( पद ) मिळालें आहे. तथापि, मेघदूतकारापेक्षा जास्त प्रतिभासपन्न समजलें जाण्याचा जिनसेन स्वामींचा अधिकार आहे

प्रो. पाठक यांच्या या उताऱ्यावरून ईश्वरदत्त प्रतिभेचा ज्यांच्या ठायीं पूर्ण विकास झालेला आहे, अशा महान् कवींच्या प्रमावळींत बसण्याचा अधिकार जिनसेन कवीच्या अंगीं आहे याबद्दल कोणालाहि शंका वाटणार नाहीं.

## कालिदास कवीचा योग्यता व भगवज्जिनसेनाचार्यांचें सर्वश्रेष्ठत्व.

कालिदास हा सर्व गुणांनीं कवि या नात्यानें श्रेष्ठ

असल्यामुळें त्याची कवींद्रात गणना करून त्याला कविश्रेणींत अग्रेसरत्वाचा मान देणें अत्यवश्य आहे इतकेंच नाहीं तर, एकदर कविसमूहाची गणना करिताना, प्रथमत जी करंगळी मोडावयाची ती त्याच्याच नावानें व तत्समानार्थच मोडिली पाहिजे एका कवीनें कालिदाससबधानें असें म्हटलें आहे,

पुरा कवीना गणना प्रसगे । कनिष्ठिकाऽधिष्ठित कालिदासः ॥
अद्यापितत्तुल्य कवेरभावात् । अनामिकासाऽर्थवतीबभूव ॥

व खरोखर, कालिदासकवीची अलोट कविताशक्ति, त्याचें काव्यरसानें थबथबलेलें असें मनोहर काव्य, सृष्टिसौंदर्य वर्णन करण्याचें त्याचें अद्भुत सामर्थ्य, मानवीस्वभावाचें उत्तम ज्ञान, त्याचा तद्‌तगर्त पूर्ण परिचय, त्याची अनुपम रसज्ञता, त्याचें आल्हाददारक उपमाचातुर्य व त्याची उदात्त विचारसरणी इत्यादि गुणानीं त्याचें श्रेष्ठत्व व महत्व ह्या अवनितलावर सर्व राष्ट्रातील विद्वज्जनात स्वयमेव स्थापित झालें आहे. यावरून हा कवि केवढा जाडा विद्वान, कसला मर्मज्ञ व किती बहुश्रुत होता, हें विशेष रीतीनें सागावयास पाहिजे असें नाहीं अशी जरी कालिदासाची सर्वमान्य योग्यता आहे तरी सुद्धा विद्वद्वर्य प्रोफेसर के बी. पाठकासारखे निःपक्षपाती जैनेतर व्युत्पन्न पडित ही प्राजलबुद्धीनें व निराभिमानानें स्पष्टपणें कबूल करितात कीं, जरी भारतीय कवींमाजि केंत कालिदास हा अग्रेसर आहे तरी कालिदास कवीपेक्षा जिनसेन कवि हे अधिक प्रतिभासंपन्न होते. यावरून जिनसेन कवीचें सर्वश्रेष्ठत्व अ े अ।

स्थापित होतें. कालिदास किंवा जिनसेन यासारखीं गीर्वाण भाषेला अलंकृत करणारीं व तिला सर्व जगतलावर अत्युच स्थानापन्न करण्यास कारणीभूत होणारीं अशीं कविरत्नें आमच्यांत निर्माण झालीं ह्मणूनच संस्कृत भाषा ही एवढ्या थोरवीस पोंहचली गेली कीं, तिचा भाग्योदय होऊन आजमितीस कमींत कमी दहा पंधरा शतकें लोटलीं असतांही, तिच्या सौंदर्याविषयीं विद्वानांचें कुतूहल, तिच्या ऐश्वर्याविषयीं पंडितांची जिज्ञासा व तिच्या परिपक्वतेविषयीं गुणग्राहकांचें वात्सल्य ( प्रेम ) हीं बिलकूल कमी होत नाहींत. इतकेंच नव्हे तर, तीं उत्तरोत्तर वाढतच चाललीं आहेत. व ही स्पृहणीय स्थिति अवलोकन केली ह्मणजे संस्कृत भाषेला मृतभाषा ( Dead language ) ह्मणून आपल्या कोत्या ज्ञानाचें प्रदर्शन करणाऱ्या कांहीं अर्ध्या हळकुंडानेंच पिवळे झालेल्या लोकांची अत्यंत कींव येतें असो.

पार्श्वाभ्युदय व इतर कोणतेंहि काव्य या दोन्हींची तुलना करितांना काव्यमर्मज्ञ व रसिक वाचकांनीं ही गोष्ट विसरतां कामा नये कीं, जिनेसन कवीला आपल्या कल्पनाशक्तीला अत्यंत परिमित व संकुचित क्षेत्रामध्येंच वावरूं देणें भाग पडल्यामुळें त्याचा अगदीं नाइलाज झाला होता. समस्यापूर्तीच्या एका नियमित प्रदेशांत या महाकवीनें आपली प्रतिभा व कल्पनाशक्ति यांच्या सहाय्यानें कसें मनोहर नृत्य केलें हें या काव्यरसाचा आस्वाद घेतांना आपण पाहिलें पाहिजे. आपण असें न करितां, जर हें एक स्वतंत्र काव्य आहे असें समजून दुसऱ्या

एखाद्या स्वतंत्र काव्याशीं याची तुलना कराल तर तें मुळींच न्यायसंमत होणार नाहीं. आपण या काव्याकडे खऱ्या निष्पक्षपाती दृष्टीनें पहाल तर योगिराट् पंडिताचार्याप्रमाणेंच आपलाही अभिप्राय पडेल अशी आमची खात्री आहे. पार्श्वाभ्युदय काव्याचे टीकाकार योगिराट् पंडिताचार्य ह्मणतातः—

श्रीपार्श्वात्साधुतः साधुः कमठात्खलतः खलः ।
पार्श्वाभ्युदयतः काव्यं न च क्वचिदपीष्यते ॥ १७ ॥

अर्थः—श्रीपार्श्वनाथाहून श्रेष्ठ साधु, कमठापेक्षां जास्त दुष्ट व्यक्ति व पार्श्वाभ्युदयापेक्षां जास्त श्रेष्ठ असें काव्य आपणास इतरत्र कोठेंही आढळणार नाहीं.

पार्श्वाभ्युदय काव्य हें पहिल्या अमोघवर्ष राजाच्या कारकीर्दींत रचिलें असावें असें त्या काव्याच्या अंतःप्रशस्तींतील खालील श्लोकावरून विदित होतेंः—

इति विरचितमेतत्काव्यमावेष्ट्य मेघं ।
बहुगुणमपदोषं कालिदासस्य काव्यम् ॥
मलिनितपरकाव्यं तिष्ठतादाशशाङ्कम् ।
भुवनमवतु देवः सर्वदाऽमोघवर्षः ॥

आतां, जयधवलाटीका लिहिण्यास अजमासें शक संवत ७५० मध्यें प्रारंभ झाला व ती टीका शके ७५९ मध्यें संपूर्ण झाली; व पार्श्वाभ्युदय काव्य हें जयधवलाटीकेच्या पूर्वी लिहिलें असावें ही गोष्ट ही आतां निश्चित झाली आहे. सबब, शक संवत ७३६ पासून ( अमोघवर्षाचें राज्यारोहण ह्या सालीं झालें. ) शके ७५० च्या दरम्यानच्या कालांत पार्श्वाभ्युदय काव्य रचिलें असावें असें यावरून ठरतें.

पार्श्वाभ्युदयातील कवीतेचा आमच्या वाचकाना थोडा बहुत आस्वाद मिळावा ह्मणून आह्मी त्या काव्यांतील काहीं श्लोक खालीं अर्थासह उध्दृत केले आहेत:–

चित्रं तन्मे यदुदयमनानन्तरं विप्रयुक्ता
त्वत्तः साध्वी सुरतरसिका सा तदा जीवतिस्म ।
मन्ये रक्षत्यमुनिरसनाद्धातुमापद्गताना—
"प्राशाबन्धः कुसुमसदृशं प्रायशो ह्यङ्गनानाम्" ॥३५॥

अर्थः— शंबरयक्ष ( कमठाचा जीव ) श्रीपार्श्वनाथ स्वामीला ह्मणतो, विवाहानंतर तुजवर अनुरक्त असलेली तुझी साध्वी(?) स्त्री तुह्मां दोघांचा वियोग झाला असतांना अद्याप सुद्धां जीवंत आहे याबद्दल मला आश्चर्य वाटतें यावरून, आशातंतु हा दु:खी स्त्रियांच्या कुसुमासारख्या सुकुमार प्राणाचें ही प्रायः रक्षण करितो असें मला वाटतें

तस्माद्वीरप्रथमगणनामाप्तुकामस्त्वकं चे—
त्पूर्वेमीत्या सुभट सफलां प्रार्थनां मे विधत्स्व।
कालाद्यावे परमपुरुष त्वाभियायाद्ययुद्धं
"यज्वा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा" ॥२४॥

अर्थः—शंबरयक्ष पार्श्वनाथ प्रभूला युद्धाला आव्हान करून ह्मणतो, हे महावीरा, शूर पुरुषांच्या मालिकेंत अग्रेसरत्वाचा मान मिळावा अशी जर तुझी इच्छा असेल तर तुझा व माझा जन्मोजन्मीचा संबध ध्यानात

टीप—१ येथे कमठानें उपरोधिक भाषेत 'साध्वी' असें ह्मटलें आहे त्याच्या ह्मणण्याचा खरा आशय 'असाध्वी' असा होता हें उघड आहे

आणून माझी प्रार्थना सफल कर. कालवशात्, तुझ्यासारख्या श्रेष्ठ पुरुषाची आज गांठ पडली आहे; सबब, मी तुला युद्धाचें आव्हान करितो. बाबारे ! श्रेष्ठमाणसांनीं केलेला याचनाभंग अधमांनीं केलेल्या याचनापूर्तीपेक्षां अधिक चांगला !

कल्लोलान्तर्वलनाशिशिरः शीकरासारवाही
धूतोद्यानो मदमधुलिहां व्यञ्जयन्सिञ्जितानि ।
"यत्र स्त्रीणां हरति सुरतग्लानिमङ्गानुकूलः
शिप्रावातः प्रियतम इव प्रार्थनाचाटुकारः" ॥११२॥

अर्थः--त्या नगरींत पाण्याच्या लाटांच्या संयोगानें शीतल राहणारा, जलतुषारांना आपल्याबरोबर उडविणारा व उद्यानांना कंपायमान करणारा तो शिप्रानदीचा वायु, मत्त भुंग्यांच्या शब्दाप्रमाणें ध्वनि करित सुरतक्रीडा करण्याकरितां स्त्रियांची मनधरणी करणाऱ्या पतीप्रमाणें त्यांच्या अंगाला स्पर्श करून, त्या क्रीडेपासून झालेले त्यांचे श्रम दूर करित असे.

त्वत्सादृश्यं मनसि गुणितं कामुकीनां मनोहृत्
कामाबाधां लघयितुमथोद्गद्दकामा विलिख्य ।
यावत्प्रीत्या किल बहुरसं नाथ पश्यामि कोष्णै-
"रस्रैस्तावन्मुहुरुपचितैर्दृष्टिरालुप्यते मे" ॥३४॥

अर्थः--हे नाथ, जेव्हां जेव्हां मी माझी कामव्यथा कमी करण्याकरितां, कामी स्त्रियांचें चित्तहरण करणारी, मनांत पुनः पुनः चिंतन केलेली व श्रृंगारादि अनेक रसांनीं युक्त अशी आपली मूर्ति चित्रपटावर काढून, तिच्याकडे प्रेमपूर्ण दृष्टीनें अवलोकन करूं लागत्ये, तेव्हां तेव्हां नेत्रांत वारंवार

वाढणारे मंदोष्ण अश्रू माझी दृष्टि रोंकून टाकतात; अर्थात् ते मला आपल्या मूर्तीचें दर्शन घेऊं देत नाहींत.

तीव्रावस्थे तपति मदने पुष्पबाणैर्मदङ्गं
तल्पेऽनल्पं दहति च मुहुः पुष्पभेदैः प्रक्लृप्ते ।
तीव्रापाया त्वदुपगमनं स्वप्नमात्रेपि नाप्तं
"क्रूरस्तस्मिन्नपि न सहते सङ्गमं नौ कृतान्तः" ॥३५॥

अर्थः—हे प्रिया, तीव्र असा कामदेव आपल्या कुसुमबाणांनीं माझें शरीर तापवित आहे; आणि पुष्पशय्येवर असलेल्या माझ्या शरीराचा तो मदन अत्यंत दाह करित आहे. त्यायोगें, अतिशय दुःखी होऊन मी आपल्या समागमाची इच्छा करिते. परंतु स्वप्नांत सुद्धां आपला समागम होत नाहीं; अर्थात् मला निद्रा येत नाहीं. हाय हाय! हा क्रूर कृतांत प्रत्यक्ष तर राहोच, पण स्वप्नातदेखील आपला समागम सहन करीत नाहीं!

एवं मायां निकृतिमसुरः स्त्रीमयीमाशु कुर्वन्
व्यर्थोद्योगः समजनि मुनौ प्रत्युतागात्स दुःखम् ।
"कस्यैकान्तं सुखमुपनतं दुःखमेकान्ततो वा
नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण" ॥४५॥

अर्थः—त्या शंबर नामक असुरानें पार्श्वनाथमुनीशीं स्त्रीनिमित्त केलेलें अनेक प्रकारचें शाठ्य याप्रमाणें लौकरच विफल झालें. उलट, त्या शंबर दैत्याला दुःख मात्र झालें. या जगांत कोणालाच सर्वथैव सुखाची ही सतत प्राप्ति होत नाहीं; उलट त्याला अव्याहतपणें दुःखही भोगावें लागत नाहीं. रहाटगाडग्याप्रमाणें किंवा चक्राच्या धावेप्रमाणें जीवाची उच्च नीच स्थिति

नित्य बदलत असतें; अर्थात् हें स्थित्यंतर नित्य चालू असतें.

पार्श्वाभ्युदय काव्याची योग्यता दाखविण्याकरितां एवढे श्लोक पुरे! आम्हीं आमच्या सहृदय वाचकांना हें काव्य वाचण्याची आग्रहपूर्वक विनंति करून, आतां पुढें वळतो.

## आदिपुराण.

महापुराणाचे दोन भाग आहेत; प्रथम भागाचें नांव **आदिपुराण** व द्वितीय भागाचें नांव **उत्तरपुराण** होय. आदिपुराणामध्यें मुख्यतः प्रथम तीर्थंकर व प्रथम चक्रवर्ती यांचें चरित्र आहे; व उत्तरपुराणांत बाकीचे २३ तीर्थंकर व चक्रवर्ती, नारायण आदि पुण्य पुरुषांचें चरित्र गोंविलें आहे. संबंध महापुराणांत वर्तमानकालीन चोवीस तीर्थंकर, बारा चक्रवर्ती, नऊ नारायण, नऊ प्रतिनारायण आणि नऊ बलभद्र अशा ६३ पुण्यपुरुषांचें मंगलमय चरित्र ग्रथित केलें आहे.

दिगंबर संप्रदायामध्यें प्रथमानुयोगाचा हा सर्वश्रेष्ठ ग्रंथ आहे. जैनसाहित्यांत पुराणें, नाटकें, काव्यें इत्यादि जे जे ग्रंथ आहेत त्यांतील गोष्टी प्रायः या महापुराणांतूनच घेतलेल्या आहेत. महापुराणाची एकंदर श्लोकसंख्या वीस हजार आहे. त्यापैकीं आदिपुराणाचे बारा हजार श्लोक असून उत्तरपुराण आठ हजार श्लोकांत संपूर्ण झालें आहे. आदिपुराणाचीं ४७ पर्वें (प्रकरणें) आहेत; त्यापैकीं संबंध ४२ पर्वें व ४३ च्या पर्वांतील तीन श्लोक श्रीजिनसेनाचार्यकृत आहेत. बाकीचीं पांच पर्वें (१६२० श्लोक) त्यांचे पट्टशिष्य श्रीगुणभद्राचार्य यांनीं

---

टीपः—१ महापुराणामृत पर्व २ रें, पान ८ पहा.

रचिलीं आहेत. भगवज्जिनसेनाचार्य यानीं महापुराणांतील ४३ व्या पर्वांमधील फक्त तीनच श्लोक रचिले होते; तोंच त्यांचें देहावसान होऊन तें कार्य तसेंच अपुरें राहिलें जनतेंत अशी एक आख्यायिका आहे कीं, जिनसेनस्वामींनीं महापुराणांतील प्रथम मंगलाचरणाचा श्लोक रचिल्यानंतर 'हा ग्रंथ माझे हातून पूर्ण होणार नाहीं.' असें त्यांनीं आपल्या शिष्यांस सांगितलें होतें. मंगलाचरणांतील श्लोकामध्यें, जीं अक्षरें व जे शब्द योजिले होते त्यांवरून त्या विशाल बुद्धिमान् महात्म्यानें सदरील भविष्य केलें होतें. व शेवटीं तें दुर्दैवानें सत्यही ठरलें! अस्तु; शेष ग्रंथ गुणभद्राचार्यांनीं पूर्ण करून आपली गुरुभक्ति प्रकट केली.

"**श्रीमहापुराण** हाच जैन लोकांचा सर्वांत पहिला ग्रंथ असून त्यापेक्षां प्राचीन असा त्याचा दुसरा ग्रंथ नाहीं." असें पंडित कुप्पूस्वामी शास्त्रीप्रभृति कांहीं विद्वान् लोकाचें मत आहे. आणि या मताच्या पुष्टीकरणार्थ, ते हस्तिमल्लि कवीच्या विक्रान्तकौरवीय नाटकातील खालील श्लोक आधार ह्मणून देतातः—

शब्दाचा अर्थ पहिला असा करून, जीवंधरचरित्राच्या प्रस्तावनेंत असें ह्मटलें आहे कीं, 'जिनसेनाचार्यः पुराणकृतामादिमो जैनेषु।' अर्थात्, जैन पुराणकारांमध्यें जिनसेन सर्वांत पहिले होऊन गेले. परंतु ही त्यांची चूक आहे. कारण, जिनसेनाचार्यापूर्वी जैनांमध्यें अनेक पुराणकार होऊन गेले आहेत. आतां त्या सर्व पुराणांमध्यें आदिपुराण हा ग्रंथ सर्वोत्कृष्ट आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. आणि हस्तिमल्लि कवीनें योजिलेल्या 'प्रथम' या पदावरून ही हाच अर्थ निघतो. जिनसेनस्वामीचे सच्छिष्य श्रीगुणभद्राचार्य यांनीं स्वतः उत्तरपुराणाच्या प्रशस्तींत असें ह्मटलें आहे:-

कविपरमेश्वरनिगदितगद्यकथामातृकं पुरोश्चरितम्।
सकलछन्दोलङ्कृतिलक्ष्यं सूक्ष्मार्थगूढपदरचनम्॥१६॥

अर्थात्, जिनसेन स्वामींनीं आदिपुराण हें कविपरमेश्वर नामक एका कवीनें रचिलेल्या गद्यकथेच्या आधारानें लिहिलें. कविपरमेश्वर यांचें दुसरें नांव 'कविपरमेष्ठी' असें ही होतें. हे कर्नाटक प्रांतांत एक मोठे नामांकित व प्रतिष्ठित कवि होऊन गेले. कर्नाटकांतील सुप्रसिद्ध कवि आदिपंप यांनीं कविपरमेश्वराची फारच प्रशंसा केली आहे असें 'कर्नाटककविचरित्र' नामक पुस्तकाच्या कर्त्यांनीं ह्मटलें आहे. पंपकवीच काय, पण खुद्द जिनसेनस्वामी आपल्या आदिपुराणांत त्यांच्यासंबंधानें काय ह्मणतात ते पहाः—

स पूज्यः कविभिर्लोके कवीनां परमेश्वरः।
वागर्थसंग्रहं कृत्स्नं पुराणं यः समग्रहीत्॥६०॥

अर्थः—वाणी व तिचा अर्थ यांचा ज्यांत संग्रह केला आहे असें संपूर्ण पुराण ज्यानीं रचिले ते कविपरमेश्वर सर्व कवीश्वरांना वंदनीय आहेत. यावरून, ६३ पुण्यपुरुषांचीं मंगलमय चरित्रें ज्यांत ग्रथित केलीं होतीं, असें एक पुराण कविपरमेष्ठींनें रचिलें होतें, ही हीं एक गोष्ट निष्पन्न होतें; आणि बहुत-करून त्याच्या आधारानें आमचे चरित्रनायक जिनसेनस्वामि यांनीं श्रीमहापुराण हें काव्य रचिलें असावें.

आदिपुराणांतील कथाभाग असलेले अनेक पुराणग्रंथ भगवज्जिनसेनाचार्यांच्या आदिपुराणापूर्वी रचिले होते ही गोष्ट आह्मांस याशिवाय अनेक प्रमाणें देऊन दाखवितां येईल. उदाहरणार्थ, हरिवंशपुराण, पद्मपुराणादि ग्रंथ आदिपुराणापूर्वी रचिले असून, त्यांतील बराचसा कथाभाग आदिपुराणाच्या कथाभागाशीं जुळतो. याशिवाय, आदिपुराणाच्या उत्थानिकेंतील खालील श्लोक पहाः—

नमः पुराणकारेभ्यो यद्वक्त्राब्जे सरस्वती ।
येषामन्यकवित्वस्य सूत्रपातायितं वचः ॥४१॥
धर्मसूत्रानुगा हृद्या यस्य वाङ्मणयोऽमलाः ।
कथालङ्कारतां भेजुः काणभिक्षुर्जयत्यसौ ॥५१॥

यांतील प्रथम श्लोकांत ज्या पुराणकारांच्या उक्तींचा आधार घेऊन इतरांनीं आपले ग्रंथ रचिले त्यांना आचार्यांनी नमस्कार केला आहे. आणि दुसऱ्या श्लोकांत काणभिक्षु नामक एका कवीची प्रशंसा केली आहे. यांनींही एक उत्कृष्ट कथाग्रंथ रचिला होता. या सर्व प्रमाणांवरून जिनसेनाचार्यांपूर्वी अनेक पुराणकार होऊन गेले ही गोष्ट निर्विवाद शाबित होते.

आदिपुराण हा आपल्या गीर्वाण भाषेंतला—नव्हे जगामधील सर्व भाषेंतला–एक परमोत्तम ग्रंथ आहे. याची थोरवी जितकी वर्णन करावी तितकी थोडीच आहे. जैनाचार्यांच्या बुद्धिमत्तेंतून निघालेलें हें एक अमूल्य रत्न आहे. हा ग्रंथ ह्मणजे केवळ पुराणग्रंथच नव्हे. यांत कवीनें आपल्या रचनाकौशल्यानें जैनागमांतील १ कथा, २ चरित्र, ३ भूगोल व ४ द्रव्य या चार ही अनुयोगांतील विषयांचा संग्रह केलेला आहे. जैनधर्माची मुख्य मुख्य तत्वें; किंबहुना समग्र जैन तत्वज्ञान यांत एकाद्या कथेचा संबंध घेऊन कोठें तरी, कोणत्या तरी रूपांत ग्रथित केलेलें आढळेल. या पुराणाचें प्रामाण्य ही सर्वमान्य आहे. जिनसेनस्वामीनंतरच्या ग्रंथकारांनीं हा ग्रंथ 'आर्ष' समजून आपल्या ग्रंथांत यांतील उक्ति प्रमाण ह्मणून मोठ्या आदरबुद्धीनें दिल्या आहेत. पुराणकारांशिवाय कवींवृंदामध्यें सुद्धां या ग्रंथासंबंधानें विशेष पूज्यभाव दिसून येतो. महान् महान् कवि ही 'हें एक अद्वितीय महाकाव्य आहे' असें मानित आलें आहेत; आणि वस्तुतः हें आदिपुराणही तसेंच लोकोत्तर आहे! पाश्चात्य विद्वानांनीं महाकाव्याची व्याख्या करितांना ह्मटलें आहे कीं, "महाकाव्याचा विषय एकच असून त्यांत अनेक प्रसंग आले असावेत. त्यांतील मुख्य मुख्य पात्रें उच्च वर्गांतील असून उन्नत व उदात्त विचारांचीं असावींत. विषयानुरूप काव्यांचें वृत्त गंभीर व सुश्राव्य असावें; आणि निरनिराळ्या पात्रांचें संवाद, आत्मगत विचार व वृत्तकथन यांच्या संमिश्रणानें तें विकास पावलें असावें." पाश्चात्य पंडितांची ही महाकाव्यासंबं-

धाची कल्पना अगदीं योग्य आहे. व या कसोटीला आमचें हें महापुराण पूर्णपणें उतरतें हें रसिक वाचकांच्या चटदिशीं ध्यानांत येईल. तसेंच, पौर्वात्य पंडितांच्या साहित्यशास्त्राच्या नियमाप्रमाणें पाहिलें तर उत्तम काव्यात 'नव्या कल्पना, विषयाची अग्राम्यता, अक्लिष्ट श्लेष, रसाचा पूर्ण आविर्भाव व अक्षरबंध' हे गुण मुख्यतः असून त्यांत ईश्वरस्तवन ही असलें पाहिजे. भगवज्जिनसेनाचार्यांच्या काव्यांत महाकाव्याचीं हीं सर्व लक्षणें आपणास आढळून येतात. यांत शृंगारादि नवरस ओतप्रोत भरले असून, त्यांचा उत्कृष्ट तऱ्हेनें परिपाकही झाला आहे. यांतील कविता फारच श्रेष्ठ प्रतीची आहे. पदलालित्य, अर्थसौष्टव, सरलता, गंभीरता, कोमलता; तसेंच शब्दालंकार, अर्थालंकार आणि महाकाव्याला अवश्यक असे निर्दोषत्वादि धर्म या सर्व गोष्टी आचार्यांनीं या ग्रंथांत साधल्या आहेत. सृष्टिसौंदर्याचीं वर्णनें ठिकठिकाणीं मोठ्या बहारीचीं व आल्हादकारक झालीं आहेत. पात्रांचीं स्वभाववर्णनें ही यथार्थ व हुबेहूब साधलीं आहेत.-तसेंच, मानसिक विचारांचीं हीं यांत उत्कृष्ट चित्रें काढिलीं आहेत. सर्वोतोपरि उदात्त अशा ह्या ग्रंथाचें वाचन चाललें असतां, त्रिविधतापानें संतप्त झालेल्या वाचकांचें मनोरंजन तर होतेंच; पण त्याबरोबर त्यांच्यात कर्तव्यबुद्धि जागृत होऊन त्यांना खऱ्या सुखाचा–आत्मसुखाचा–मार्गही समजूं लागतो, हें यांतील वैशिष्ट्य होय. जिनसेनाची कविता वाचकांना शृंगार रसामध्यें तल्लीन करून सोडते; पण पुढें थोड्याच अवधींत त्यांचा त्यांनाच त्या रसाबद्दल तिटकारा वाटूं लागतो. हा फरक

वाचकाच्या सहजगत्या लक्षात ही येत नाहीं. हा एक या काव्यातील विशेष गुण आहे. जिनसेन कवीनें 'कविता कशी असावी,' याबद्दल जे उद्गार काढिले आहेत ते सर्व कवींनीं आपलें ध्येय ह्मणून पुढें ठेवण्यासारखे आहेत. आचार्य ह्मणतात —

धर्मानुबन्धिनी या स्यात्कविता सैव शस्यते ।
शेषा पापास्रवायैव सुप्रयुक्तापि जायते ॥ ६३ ॥
परे तुष्यन्तु वा मा वा कविः स्वार्थं प्रतीहताम् ।
न पराराधनाच्छ्रेयः श्रेयः सन्मार्गदेशनात् ॥ ७६ पर्व१लें॥

---

**टीप** —१ भगवज्जिनसेनाचार्यांच्या मताप्रमाणेंच आधुनिक पाश्चात्य पंडिताचं हीं मत बनत चालल आहे हा मोठ्या संतोषाची गोष्ट आहे याच्या पुष्ट्यर्थ आह्मी **'विविधज्ञानविस्तार'** मासिक पुस्तकाच्या १९१३ च्या सप्टेंबर महिन्याच्या अंकांतील श्रीयुत **वासुदेव गोविंद आपटे** याच्या **साहित्य** आणि **त्याची अभिवृद्धि'** या लेखांतील खालील उतारा वाचकास सादर करितों.

"अमेरिकेतल्या कोलंबिया युनिव्हर्सिटींतील **प्रो हार्टन** यांनीं 'The Elements of Literature' या विषयावर एक लेख लिहिला आहे त्यांत प्रोफेसर साहेब म्हणतात —

"साहित्य आणि धर्म यांचा निकट संबंध आहे. **धर्म हा साहित्याचा पाया आहे** अधार्मिक वाड्मय ह चिरस्थायी असणं शक्य नाहीं. निदान तें राष्ट्राचें शाश्वत हित करण्यास समर्थ असू शकणार नाहीं" यावर श्रीयुत आपटे आपल्या लेखात म्हणतात.—"प्रोफेसर हार्टन याच्या या विधानावर हिंदुस्थाना-सारख्या धर्मप्रधान राष्ट्रांत तर कोणी आक्षेप घेईल असं मला वाटत नाहीं पृथ्वीवर जेवढीं सुधारलेलीं राष्ट्रें आहेत, त्यांतल्या वाड्मयांतले आद्यग्रंथ धर्मविषयकच होते. वेद घ्या, बैबल घ्या, किंवा चिनी लोकांचा प्रथम ग्रंथ घ्या हे सर्व आद्यग्रंथ धर्मविषयक होते असें आढळून येईल समाजातल्या महत्तम संख्येचें महत्तम आणि शाश्वत हित उच्च धर्मकल्पनांच्या प्रसारांत आहे, ही गोष्ट आता जडवादी लेखकांना ही कबूल करावी लागत आहे धर्मग्रंथरचनाकाल म्हणजे साहित्याचा उदयकाल होय ही गोष्ट आतां सर्वमान्य झाली आहे"

अर्थः—जी कविता धर्मसबंधी आहे, तीच प्रशसनीय होय बाकीची कविता वाटेल तितकी चागली असली तथापि ती पापास्रव करणारीच होईल. इतर लोक प्रसन्न होवोत; वा न होवोत. कवीनें आपलें आत्महित पाहिले पाहिजे. कारण, लोकाराधन हें केव्हाही श्रेयस्कर नसतें. फक्त सद्धर्मोपदेश करणें हेंच श्रेयस्कर होय. याचा इत्यर्थ हाच कीं, कवीनें धर्मोपदेशमय कविता करावी. धर्म हा सर्व ज्ञानाचा शेवट असल्याकारणानें धर्मामध्यें प्रत्येक विद्येचा, प्रत्येक कलेचा व प्रत्येक शास्त्राचा अंतर्भाव झाला पाहिजे हें तत्व पूर्णपणें ओळखून, त्याप्रमाणें आपल्या प्रयत्नाची दिशा ठरविणाऱ्या ग्रंथकारात जिनसेनकवि हे अग्रगण्य होते अस्तु; जिनसेनस्वामीनें दाखविलेलें हें ध्येय आपल्या समोर ठेवून रसिक व विद्वान वाचकानीं या आदिपुराणाचा स्वाध्याय करावा, म्हणजे त्याना या महाकाव्याची खरी योग्यता व माधुर्य कळून येईल. परभाषेतील परदेशीय काव्यामधील विषय पाहिलें असता ते बहुतेक ऐहिक, व्यावहारिक व क्षणिक असतात. त्यामुळें त्याचा टिकाऊपणा ही बेताबाताचाच असतो. परतु अध्यात्मिक विषयाची गोष्ट तशी नाहीं. धर्म हा विषय सार्वत्रिक व सार्वकालीन असल्यामुळें, या महाग्रंथाचें अध्ययन चाललें असता सहृदय वाचकाना हें एक अतिशय पूज्य व पवित्र काव्य आहे असें वाटू लागते, व त्याना या काव्यासमोर इतर कवींचीं शृगाररसयुक्त व वासनाविलसित काव्यें फिकी व निरस वाटून त्यांच्या मुखांतून पुढील अर्थाचे उद्गार साहजिकपणेंच निघतात —

त एव कवयो लोके त एव च विचक्षणाः ।
येषां धर्मकथाङ्गत्वं भारती प्रतिपद्यते ॥ ६२ ॥
( प्रथमपर्व )

अर्थः—ज्यांची वाणी धर्मकथा प्रतिपादन करिते तेच पृथ्वीवर खरे कवि होत; व तेच खरे पंडित ही होत. अस्तु.

आदिपुराणाच्या कवितेसंबंधीं श्रीगुणभद्रस्वामी अति गौरवानें असें लिहितात कीः—

कविपरमेश्वरनिगदितगद्यकथामातृकं पुरोश्चरितम् ।
सकलछन्दोलङ्कृतिलक्ष्यं सूक्ष्मार्थगूढपदरचनम् ॥
व्यावर्णनोरुसारं साक्षात्कृतसर्वशास्त्रसद्भावम् ।
अपहस्तितान्यकाव्यं श्रव्यं व्युत्पन्नमतिभिरादेयम् ॥
जिनसेनभगवतोक्तं मिथ्याकविदर्पदलनमतिललितम् ।
सिद्धान्तोपनिबन्धनकर्त्रा भर्त्रा चिराद्विनेयानाम् ॥
अतिविस्तरभीरुत्वादवशिष्टं संगृहीतममलधिया ।
गुणभद्रसूरिणेदं प्रहीणकालानुरोधेन ॥ १९ ॥

अर्थः—हें आदिपुराण कविपरमेश्वरानें लिहिलेल्या गद्यकथेच्या आधारानें रचिलें आहे. यांत सर्व छन्द व अलंकार यांचीं उदाहरणें आहेत. हें काव्य गूढ पदरचना व सूक्ष्म अर्थ यांनीं युक्त आहे. यांतील वर्णन फारच सुंदर आहे. याच्या अध्ययनानें सर्व शास्त्रांतील उत्कृष्ट पदार्थांचें प्रत्यक्ष ज्ञान होतें. अर्थात्, यांत संपूर्ण शास्त्रांतील रहस्यांचा संग्रह केला आहे. इतर काव्यें याच्या पुढें [illegible] पदार्थ आहेत. यासारखें दुसरें उत्कृष्ट काव्य नाहीं. हें श्रव्य ( ऐकण्यास योग्य ) काव्य असून

विद्वानांना ग्रहण करण्यायोग्य आहे. मिथ्याकवींचा दुरभिमान नाहींसा करणारें हें सुदर काव्य सिद्धातावर टीका लिहिणारे व पुष्कळ वर्षेपर्यंत शिष्याना शासन करणारे असे जे **जिनसेनस्वामी** त्यानीं लिहिलें आहे याचा शेष भाग व उत्तरपुराण हीं शुद्धबुद्धि धारण करणारे गुणभद्रसूरि यानीं हीनकालानुरोधानें विस्तार न करिता लिहिलीं आहेत.

या महाकवीची विचारसरणी व वर्णनशैली हीं दोन्ही हृदयगम, आल्हादकारक व बोधप्रद असून मनोविकाराचें यथार्थ प्रदर्शन तेंही थोडक्या शब्दानीं पण बव्हर्थप्रचुर--फार चागलें झालेलें आहे. दुसरे एक कवी महापुराणाची प्रशसा करताना ह्मणतात —

यदि सकलकवीन्द्रप्रोक्तसूक्तप्रचार-
श्रवणसरसचेतास्तत्त्वमेवं सखे स्याः ।
कविवरजिनसेनाचार्यवक्त्रारविन्द-
प्रणिगदितपुराणाकर्णनाभ्यर्णकर्णः ॥

भावार्थः—हे मित्रा, सर्व महाकवींच्या कवितेचें अध्ययन करून अंगीं सरसता यावी अशी जर तुझी इच्छा असेल तर फक्त कविवर जिनसेनाचार्यांच्या मुखकमलापासून उदित झालेलें श्रीआदिपुराण श्रवण कर. यावरून या महाकाव्यानद्दल प्राचीन कविसमुदायामध्यें किती पूज्यबुद्धि वसत होती याचें चागलें दिग्दर्शन होतें.

संपूर्ण महापुराणाची स्तुति करताना एके ठिकाणीं ह्मटलें आहे.

धर्मोत्र मुक्तिपदमत्र कवित्वमत्र
तीर्थेशिनां चरितमत्र महापुराणे ।

यद्वा कवीन्द्रजिनसेनमुखारविन्द–
निर्यद्वचांसि न मनांसि हरन्ति केषाम् ॥

अर्थः—या महापुराणांत धर्म आहे; मोक्षमार्ग आहे; कवित्व आहे, व तीर्थंकरांचें चरित्रही आहे. शिवाय, यांतील ( पूर्वभागांतील ) जिनसेन कवीन्द्राच्या मुखारविंदांतून निघालेल्या उक्ति कोणाचें चित्त आकर्षण करणार नाहींत? खरोखर, वाग्देवी जिनसेनकवीच्या जिव्हाग्रीं नाचत असली पाहिजे. ज्ञानार्णवकर्ते श्रीशुभचंद्राचार्य मंगलाचरणांत ह्मणतात,

जयन्ति जिनसेनस्य वाचस्त्रैविद्यवन्दिताः ।
योगिभिर्यत्समासाद्य स्खलितं नात्मनिश्चये ॥

( ज्ञानार्णव. श्लोक १६. )

अर्थः—जिनसेनाचार्यांच्या वाणीचा जयजयकार असो ! कारण, ती न्याय, व्याकरण व सिद्धांत या तिन्ही विद्येतील ज्ञात्यापुरुषांना वंदनीय आहे. शिवाय, तिची प्राप्ति झाल्यावर योगिजन आत्मनिश्चयांत चुक करित नाहींत; अर्थात् ते तिच्या सहायानें आत्म्याचें यथार्थज्ञान करून घेतात.

आदिपुराणांत सुभाषित कविता विपुल आढळते हें खालील श्लोकावरून स्पष्ट होते.

यथा महार्घ्यरत्नानां प्रसूतिर्मकरालयात् ।
तथैव सूक्तरत्नानां प्रभवोऽस्मात्पुराणतः ॥ १६ ॥
सुदुर्लभं यदन्यत्र चिरादपि सुभाषितम् ।
सुलभं स्वैरसंग्राह्यं तदिहास्ति पदे पदे ॥ २२ ॥

**अर्थः**---ज्याप्रमाणें अमूल्य अशीं रत्नें रत्नाकरापासून उत्पन्न होतात त्याप्रमाणें सूक्ति—सुभाषितरूपी रत्नें--या पुराणातून निघतात. इतर ग्रंथामध्यें अत्यंत दुर्मिळ अशीं सुभाषितें या पुराणात ठिकाठिकाणीं सहज वाटेल तितकीं मिळू शकतात. साराश, या महाकाव्यातील वचनें सुभाषिताप्रमाणें रसाळ, इक्षुरसाप्रमाणें मधुर आणि सुंदर व सोप्या व्यावहारिक दृष्टांतानीं व सत्यज्ञानानें भरलेलीं आहेत. या प्रशंसापर श्लोकावरून उत्तमोत्तम ग्रंथात महापुराणालाच अग्रपूजेचा मान दिला पाहिजे असें जें आमचें ह्मणणें आहे त्याची सत्यता वाचकाच्या लक्षात आली असेलच

साहित्यदर्पणकाराची काव्याबद्दलची खालील उक्ति जिनसेन स्वामीच्या काव्यासंबंधानें अगदीं सार्थ व योग्य आहे असें कोणाहि मंद अथवा उत्तम अधिकाऱ्यानें त्याच्या ग्रंथानें बरबर अवलोकन केलें तरी त्याला दिसून येईल. साहित्यदर्पणकार ह्मणतात —

' चतुर्वर्गफलप्राप्तिः काव्यादेव प्रवर्तते ।'

ह्मणजे, धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारी पुरुषार्थांची फलप्राप्ति काव्यापासूनच होते

भगवज्जिनसेनाचार्यांच्या काव्यकुंजात चारीही पुरुषार्थांचे चार दरवाजे आहेत या काव्यकुंजात एकदा प्रवेश केल्यावर, ज्याला जो अभीष्ट विषय असेल, त्याला त्याची प्राप्ति झाल्याशिवाय राहणार नाहीं. जिनसेनकवीची वाणी खरी रसवती आहे. तिच्यात तेज व ओज हीं प्रसंगाविशेषीं व्यक्त झालीं

आहेत. शिवाय, या अद्वितीय काव्याचा अभ्यास केला असतां आपणास असें ही आढळून येईल कीं, जिनसेनाचार्य अनेकभाषाकोविद, व अनेककथाभिज्ञ होते. त्यांच्या वेळीं जितके धर्म, जितके धर्मपंथ, जितके ज्ञानसिद्धांत प्रचलित होते त्या सर्वांत आमचे चरित्रनायक चांगले निष्णात होते. सारांश, जिनसेनाचार्यांची काव्यरचना व पुराणरचना तत्कालीन व तदनंतरच्या ग्रंथकारांना आदर्शभूत झाली असें ह्मणण्यास मुळींच हरकत नाहीं. उत्तम भाषाप्रौढी, हुबेहूब वर्णन, उदात्त रचना, आल्हादकारक पदलालित्य व भिन्न भिन्न रसांचा समयोचित आविर्भाव इत्यादि गुणांनीं हें काव्य अलंकृत असल्याकारणानें त्याचा यशोध्वज स्वयमेवच स्थापित होऊन तें श्रेष्ठत्वास पाठविलें आहे. त्यांच्या उक्तिआपल्या ग्रंथांत गोंवणें ह्मणजे आपला ग्रंथ सजविणें व त्याला गौरव आणणें असें पुष्कळ ग्रंथकार समजतात. जिनसेनाचार्यांच्या या महाप्रासादिक व अप्रतिम काव्याचें श्रेष्ठत्व, उत्तमत्व व महत्व दुसऱ्यांना सांगून समजण्यासारखें नसून स्वतः अनुभव घेतल्यानेंच चांगलें समजण्यासारखें आहे. आमच्या वाचकांनीं स्वतः एकदां तरी या अद्वितीय काव्यग्रंथाचा विचारपूर्वक स्वाध्याय करून त्यांतील मधुर व सरस कवितेचा आस्वाद ध्यावा अशी आह्मी त्यांना सविनय प्रार्थना करितो.

आदिपुराण ही जिनसेनाचार्यांची सर्वांतली शेवटची कृति होय. पार्श्वाभ्युदय काव्य रचिल्यानंतर अजमासें ३० वर्षांनीं व वर्द्धमानपुराण लिहिल्यानंतर अजमासें ६० वर्षांनीं ह्मणजे कवीच्या वयाचीं ९०, वर्षे लोटल्यावर, ह्या अपूर्व महाग्रंथाची

रचना झाली असावी. आणि म्हणूनच या काव्यात जिनसेनाचार्यांच्या साऱ्या आयुष्यांतील अध्ययनाचें व विचारांचें सार दिसून येतें. यात कवीच्या कवित्वाचा परिपाक झालेला दिसून येतो. या वयांत विद्वानानीं लिहिलेले ग्रंथ फारच थोडे दिसून येतात. परंतु जे कांहीं थोडे आढळतात ते मात्र अनुभवानें व अबाधित सिद्धातांनीं युक्त असे दिसून येतात. " शतायुर्वै पुरुषः " या वचनाप्रमाणें जवळजवळ १०० वर्षे या अवनितलाला भुषणीभूत झालेल्या आमच्या या लोकोत्तर आचार्यानें लिहिलेलें हें महाकाव्य त्याच्या सुपक्व झालेल्या बुद्धिमत्तेची खात्री पटण्यासारखेंच झालें आहे. हा ग्रंथ आपल्या अंतःस्थ श्रेष्ठ गुणांनीं गीर्वाणभाषेचें शिरोभूषण झाला आहे. याच्या स्वाध्यायानें जैनधर्मांतील गहन गहन सिद्धातांचें ज्ञान होतें; व त्याबरोबरच विद्वानांना उच्च कोटींतील काव्याचा सुमधुर व सुस्निग्ध असा आस्वाद मिळून ते आनंदरसांत अगदीं तल्लीन होऊन जातात. माझ्या समजुतीनें आदिपुराणाच्या कवीतेंत सुंदरता, कोमलता व स्वाभाविकता इत्यादि गुणांचा जो कळस झालेला दिसून येतो तो *पार्श्वाभ्युदय* काव्यांत आढळत नाहीं. ही कृति रसिकजनपरंपरेस पुढें चिरकाल शिरोवंद्य होणार व इतर सर्व काव्यापेक्षां हीवरून आपलें कवित्वयश दिगंतरीं फडकणार हें जणों काय अगोदरच समजून, जिनसेनानें या महापुराणांत आपल्या बुद्धिवैभवाची पराकाष्ठा दाखविली आहे. एवढ्या विशाल व गंभीर काव्यार्णवाचें आलोडन करून त्यांतील उत्तम व सर्वमान्य कविता निवडून काढणें हें अत्यंत

कठीण आहे. तथापि आह्मी आमच्या समजुतीप्रमाणें यांतील थोडे श्लोक खालीं दिले आहेतः—

धुन्वानाश्चामराण्यस्य ता ममोत्प्रेक्षते मनः ।
जनापवादजं लक्ष्म्या रजोऽपासितुमुद्यताः ॥४१(पर्व११)

अर्थः—महाराज वज्रनाभीवर चामरें फिरवित असणाऱ्या स्त्रिया, जणूं त्याला लक्ष्मीच्या संबंधानें प्राप्त होणाऱ्या जनापवादाचा धुरळा उडवून टाकण्याकरितांच उद्युक्त झाल्या आहेत, अशी त्यांना पाहून माझ्या मनात कल्पना येते. अभिप्राय हा कीं, लक्ष्मीपुत्रांत मूर्खपणा, अभिमान, निर्दयपणा आदि दुर्गुण प्रायः आढळून येतात. ही जी एक प्रकारची बदनामीरूपी धूळ आहे ती या लक्ष्मीसंपन्न महाराजावर पडूं नये म्हणून दासी यत्न करित होत्या. अर्थात् हा वज्रनाभी लक्ष्मीपुत्र असून ही विद्वान्, निरभिमानी व धर्मात्मा आहे असे त्या दासी सर्वत्रांस प्रगट करित होत्या.

लक्ष्मीं चलां विनिर्माय यदाघो वेधसार्जितम् ।
तन्निर्माणेन तन्नूनं तेन प्रक्षालितं तदा ॥ ८२ (पर्व ६)

अर्थः—लक्ष्मीला चंचल अशी निर्माण करून विधात्यानें जें पातक उपार्जिलें होतें, तें सर्व त्यानें त्यावेळीं श्रीमतीला उत्पन्न करून 'त्या पुण्यानें' धुवून टाकिलें. सारांश, श्रीमती ही अचल व गंभीर होती.

स मातुरुदरस्थोऽपि नाऽस्याः पीडामजीजनत् ।
दर्पणस्थोऽपि किं वन्हिर्दहेत्तं प्रतिबिम्बितः ॥७२(पर्व१२)

अर्थः— मरुदेवीच्या उदरामध्यें असलेला तेजःस्वरूप

श्रीऋषभदेव तिला थोडी देखील पीडा करित नव्हता. दर्पणामध्यें प्रतिबिंब स्वरूपानें असलेला अग्नि दर्पणालाच जाळील काय?

**तमोऽवगुण्ठिता रेजे रजनी तारकातता ।**
**विनीलवसना भास्वन्मौक्तिकेवाभिसारिका॥१७० (पर्व ३५)**

अर्थः—अंधारानें गुरफटलेली व तारकानीं व्यापलेली अशी रात्र, जिनें काळें वस्त्र परिधान केलें आहे व जिच्या अलंकारांतील मोत्यें चमकत आहेत अशा अभिसारिकेप्रमाणें शोभली.

**तमो दूरं विधूयाऽपि विधुरासीत्कलङ्कवान् ।**
**निसर्गजं तमो नूनं महताऽपि सुदुस्त्यजम् ॥ १८० (पर्व ३५)**

अर्थः—अंधकारास दूर घालवूनहि चंद्र कलंकानें युक्त असाच होतो, यावरून मोठ्यांना देखील स्वभावत.च असलेलें तम ( दुर्गुण किंवा अज्ञान ) नाहींसें करणें अत्यंत कठीण आहे.

यापुढील श्लोक भगवद्गुणभद्राचार्यकृत आहेत.

**विचित्रपदविन्यासा रसिका सर्वसुन्दरी ।**
**कृतिः सालंकृतिर्न स्यात्कस्येयंकामसिद्धये ॥४२॥**
**सँस्कृतानां हिते मीतिः प्राकृतानां मियं मियम् ।**
**एतद्धितं मियं चातः सर्वान्सन्तोषयत्यलम् ॥४५॥ (पर्व४३)**

अर्थः—चमत्कारिक शब्दांनी जीच्यामध्यें रचना आहे अशी, शृंगारादिसानीं युक्त व सर्वत्र सुंदर असून अलंकारयुक्त अशी ही, (जिनसेन) कवींची महापुराणरूपी कृति, गमतीनें पावलें टाकणाऱ्या, रसिक, आणि सर्वावयवानीं सुंदर असूनहि अलंकार धारण करणाऱ्या स्त्रीप्रमाणें कोणाच्या इच्छेची तृप्ति करणार नाही!

सुसंस्कृत व सुविद्य लोकांना परिणामीं हितकर असलेली वस्तु प्रिय असते; व अज्ञानी लोकांना जी सद्यःसंतोष देणारी वस्तु असते ती प्रिय असते. हें पुराण परिणामीं सुखकर असून त्यावेळीं ह्मणजे ऐकल्याबरोबर सुख देणारें असें आहे. ह्मणून ज्ञानी व अज्ञानी लोकांना तें अतिशय संतोष देतें.

पुराणे प्रौढशब्दार्थे सत्पत्रफलशालिनि ।
वचांसि पल्लवानीव कर्णे कुर्वन्तु मे बुधाः ॥१२॥ (पर्व ४३)

अर्थः—ज्यांतील शब्द व अर्थ हे फार प्रौढ आहेत असा हा ( जिनसेनकृत ) पुराणरूपी वृक्ष सुंदर पानें व फळें ह्यांनीं युक्त झाला असतां ह्यांतील माझीं ( गुणभद्राचार्यांचीं ) वाक्यें सज्जनांनीं कोंवळ्या पल्लवाप्रमाणें कानावर धारण करावीत.

भिन्नौ युक्तौ मृदू स्तब्धावुष्णौ सन्तापहारिणौ ।
स्तनौ विरुद्धधर्माणौ स्याद्वादस्थितिमूहतुः ॥ ४७ (पर्व ४३)

अर्थः—वेगवेगळे असून एकमेकाला चिकटलेले, मृदु असून स्तब्ध ( जागच्या जागीं असलेले ), उष्णस्पर्श असून संताप नाहींसा करणारे असे परस्परविरुद्ध धर्मांनीं युक्त असलेले सुलोचनेचे स्तन स्याद्वादाच्या स्थितीला धारण करीत होते; अर्थात् ते विरुद्ध धर्मांनीं युक्त असल्यानें स्याद्वादासारखे होते.

घटविम्बप्रवालादि नोपमेयमपीष्यते ।
अधरस्यातिदूरत्वाद्वर्णाकाररसादिभिः ॥ ५१ ॥ -
चिताः सिताः समाः स्निग्धा दन्ताः कान्ताः प्रभान्विता ।
अन्तःकरोति तद्वक्त्रं तानेव कथमन्यथा॥५२॥ (पर्व ४१)

**अर्थः**—वडाचा नवीन अंकुर, तोंडलीचें फल, कोंवळीं पानें, प्रवाळ आदि वस्तु उपमा देण्याला योग्य अशा जरी आहेत तथापि रंग, आकार व गोडी ह्यासंबंधानें सुलोचनेचा अधरोष्ठ फारच अधिक असल्यानें त्यांचा उपमा देण्यांत उपयोग केला नाहीं.

ज्यांमध्यें अंतर नाहीं असे, शुभ्रवर्ण, सारख्या लांबीरुंदीचे आणि गुळगुळीत असे तिचे दांत सुंदर असून तेजस्वी होते. असे ते जर नसते, तर त्या तिच्या मुखानें त्यांनाच आपल्यामध्यें कशी बरें जागा दिली असती?

**निःशेषं नाशकद्धन्तुं ध्वान्तं हरिणलाञ्छनः ।**
**अशुद्धमण्डलो हन्यान्निष्प्रतापः कथं रिपून् ॥२८२ (पर्व ४४)**

**अर्थः**—हरिणाचें चिन्ह ज्याला आहे असा चंद्र अंधकाराचा निःशेष नाश करण्यास समर्थ झाला नाहीं. कारण, ज्याचें मंडल (वर्तुलाकार स्वरूप; मांडलिक राजे) अशुद्ध (काळें; अंतःकरणांत द्वेष करणारे) आहे व जो प्रताप—(प्रखर तेज; पराक्रम) रहित आहे तो शत्रूंचा नाश कसा बरें करूं शकेल! चंद्राचें मंडलांत काळें असतें व चंद्राचा प्रकाश शांत असतो ह्यावर ही कविकल्पना आहे.

विस्तारभयास्तव जास्त श्लोक येथें देतां येत नाहींत. अस्तु.

आतां, आम्ही श्रीवृषभनाथकालीन व भरतकालीन स्थिति कशी स्पृहणीय होती, तसेंच या दोघा महात्म्यांच्या चरित्राचें

---

टीपः—१ श्रीवृषभनाथापूर्वी जे प्रतिश्रुति प्रभृति चौदा मनु होऊन गेले त्यांचें व तत्कालीन स्थितीचें संक्षिप्त वर्णन तिसऱ्या पर्वांत आम्ही केलेंच आहे. संपादक.

रहस्य काय आहे याचें लहानसें शब्दचित्र रेखाटून हें श्रीमहापुराण—परिक्षण संपवितो.

प्रथम आपण तत्कालीन सामाजिक व्यवस्थेकडे वळूं.

जैनमताप्रमाणें मानवजात ही एकच 'जातिनाम' कर्माच्या उदयानें उत्पन्न झाली; व तीच निरनिराळ्या आचारांमुळें झालेल्या भेदांच्या योगानें, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशी चार प्रकारची झाली. व्रतें व संस्कार यांमुळें ब्राह्मण झाले; शस्त्र धारणामुळें क्षत्रिय झाले; न्यायानें द्रव्य संपादन करण्यानें वैश्य झाले; व नीच वृत्तीचा आश्रय करून शूद्र झाले. या चार वर्णांपैकीं श्रीऋषभदेवानें क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे तीन वर्ण प्रथम निर्माण केले. त्यानें प्रजेच्या जीवनाकरितां असि, (शस्त्र धारण करणें) मषि, कृषि, विद्या, वाणिज्य व शिल्प हीं सहा कर्मे योजिलीं. कल्पवृक्ष नाहींसे झाल्यामुळें तेव्हांपासून भोगभूमीची स्थिति नाहींशी होऊन, ही पृथ्वी कर्मभूमि झाली. पुढें त्यांचे पुत्र भरत चक्रवर्ती यांनीं द्विजांची उत्पत्ति केली. अर्हत्पूजा, शुद्धवृत्ति, दान, स्वाध्याय, तप व संयम हीं द्विजांचीं षट्कर्मे होत. जो ह्या आचारांचा त्याग करितो तो नामधारी द्विज समजावा. गर्भानें आणि क्रियेनें द्विजत्व प्राप्त होतें; 'जन्मत जायते शूद्रः संस्कारात् द्विज उच्यते।' अर्थात् प्रत्येकजण जन्मकालीं शूद्रच असून पुढें संस्कारानें व क्रियेनें द्विजत्वास अथवा इतर पदास पोंहचत असे. ज्यांचीं कर्मे दोषयुक्त व पापमय आहेत, जे दुष्ट उद्योगामध्यें गढून गेले आहेत व खाटिकाप्रमाणें हिंसा-

कर्मे करूनही जे आपणास द्विज मानणारे आहेत ते लोक जैन मताप्रमाणें खरे द्विज नसून कृष्णवर्गीतील कर्मचांडाल होत. तप, स्वाध्याय व जात हीं तीन ब्राह्मण असण्याचीं साधनें आहेत अव्रती द्विज म्लेंच्छवत् अतएव नमस्कारला अयोग्य समजावेत. १ शिकणें, २ शिकविणें, ३ दान देणें, ४ दान घेणें, ५ पूजा करणें व ६ पूजा करविणें ह्या सहा क्रिया ब्राह्मणांच्या जीवनाच्या होत. त्यावेळचा द्विजवर्ग स्वकर्तव्यांत दक्ष व तत्पर होता. ज्ञान व सदाचार यांत सदा रत असणारा हा वर्ग आपल्या निष्पाप आचरणानें इतरांस सर्वतोपरी पूज्य व वंद्य होत असे यांत आश्चर्य नाहीं. अध्ययन व अध्यापन यांत मग्न असलेल्या द्विजांस दान देणें हें आपलें कर्तव्य आहे असें तत्कालीन राजे व त्यांची प्रजा या दोघांची ही समजूत असे. ' संभोगो संविभागश्च फलमर्थार्जने द्वयम् ' अर्थात् द्रव्यार्जन करण्यांत त्याचा उपभोग घेणें व तें यथायोग्य वाटून देणें हें दोनच हेतु आहेत. अशीच सर्वांची दृढ भावना होती. व त्याप्रमाणें श्रीमान् भरतानें आपल्यास प्राप्त झालेले सर्व निधि यथायोग्य विभागूनच उपभोगले होते; व त्यामुळें मांडलिक राजांत किंवा त्याच्या प्रजेंत कधींही असंतुष्टता दिसून येत नसे.

आद्य प्रजापतीनें श्रीवृषभनाथानें न्याय रक्षणाचें काम क्षत्रिय वर्गावर सोपविलें होतें. दुष्टनिग्रह व शिष्टपालन हा क्षत्रियांचा मुख्य धर्म होय. शिवाय, कुलपालन, मतिपालन, आत्मपालन, प्रजापालन व समंजसपणा असा पांच प्रकारचा क्षत्रियांचा आचार आहे.

---

टीप —याचें सविस्तर वर्णन महापुराणामृत पर्व ४२ मध्यें पाहवें.

परचक्रापासून देशाचें रक्षण करणें हें क्षत्रियांचें विशिष्ट कर्तव्य असल्याकारणानें युद्धोपयोगी सर्व विद्येंत व उपयुक्त कलेंत ते अत्यंत तरबेज असत. जलप्रदेश व स्थलप्रदेश या ठिकाणीं जाऊन कृषि, वाणिज्य, पशुपालन इत्यादि प्रकारचा धंदा करून अर्थार्जन करणें हा वैश्याचार होय. व या त्रिवर्गांची सेवा करणें हें शूद्रांचें कर्तव्य होय. याप्रमाणें निष्पाप असा जगांत जितका जीवनोपाय आहे तितका सर्व आदिप्रभूनें त्यावेळीं प्रवृत केला. त्यावेळचे लोकहि आपापल्या योग्यतेप्रमाणें वर सांगितलेले धंदे करित असत. या व्यवस्थेवरून समाजांतील सर्व प्रकारचीं कामें प्रत्येकानें आपापल्या मगदुरीप्रमाणें वाटून घेतली होती हें उघड दिसतें. आजमित्तीला सुद्धां प्रत्येक देशामध्यें मुत्सद्दी, योद्धा, व्यापारी व मजुर असे चार भेद दिसून येतात. आणि पूर्वकालीन वर्णव्यवस्था याहून कोठेंहीं भिन्न होती असें दिसत नाहीं. आतां श्रीवृषभनाथानें सांगितलेले विवाहनियम सांगतो. शूद्रानें फक्त शूद्रकन्येशींच लग्न लावावें. वैश्यानें वैश्य अथवा शूद्र कन्येशीं विवाह करावा. क्षत्रियानें क्षत्रिय कन्येशीं विवाह करावा; वैश्य व शूद्र यांच्या कन्येशीहि विवाह करण्याचा त्याला पूर्ण अधिकार आहे. ब्राह्मणाला चातुर्वर्णींपैकीं कोणाच्याही कन्येशीं विवाह करतां येत असे. ऋषभदेवानें सर्व वर्णांचें योगक्षेम नीट चालण्याकरितां 'हा' 'मा' व 'धिकार' असा तीन प्रकारचा दंड सुरूं केला. याप्रमाणें या युगाचा आदिब्रह्मा जो वृषभदेव त्यानें आषाढ महिन्याच्या कृष्णपक्षांतील प्रतिपदा तिथीस

**कृतयुगाचा** आरंभ केला. आता त्यावेळच्या स्त्रियांची स्थिति कशी होती हें पाहूं.

स्त्रियांना पूर्वकालीं चांगलें उपयुक्त शिक्षण मिळत होतें हें **आदिब्रम्ह्यानें** आपल्या ब्राह्मी व सुंदरी या दोन मुलींना दिलेल्या शिक्षणावरून स्पष्टपणें व्यक्त होतें. सरस्वतीदेवीच्या मंदिरात 'न च लिंगं न च वयः' या तत्वाचा अंमल पाहिजे ही गोष्ट आमच्या आद्य तीर्थंकरानें फारच जोरानें प्रतिपादन केली आहे. प्रभूंनीं आपल्या मुलींना "हें तुमचें सुंदर शरीर तुम्ही विद्येनें विभूषित केलें तरच तुमचा जन्म सफल होईल. कारण, विदुषी स्त्रीच स्त्रीसृष्टीच्या श्रेष्ठपदास पावते." असा उपदेश करून त्यांना सर्व प्रकारचें शिक्षण दिलें होतें. व त्या मुलींनी ही व्याकरणज्ञानरूपी दीपप्रकाशानें प्रकाशलेल्या सर्व प्रकारच्या विद्या व कला यांमध्यें चांगलें नैपुण्य संपादिलें होतें तसेंच त्यावेळीं स्त्रियांच्या शिक्षणक्रमांत चित्रकलेचाहि अंतर्भाव होत होता. व त्या कलेंत व गायन कलेंतही त्यांनीं चांगलेंच प्राविण्य संपादिलें होतें. वज्रदंतचक्रवर्तीची कन्या श्रीमती इचें चित्रकलेंतील असाधारण नैपुण्य पाहून वज्रजंघ चक्रवर्तीसुद्धा थक्क झाला. यावरून चित्रकला त्यावेळीं चांगली पूर्णतेला पोंचलेली होती हें स्पष्ट होतें. स्त्रियांना आपल्या अभिरुचीप्रमाणें व साधनाच्या अनुकूल्याप्रमाणें कोणत्याही विद्येचें अथवा कलेचें शिक्षण मिळविण्याची पूर्ण मुभा होती ही गोष्ट स्पष्टपणें सिद्ध होतें. तसेंच तत्कालीन स्त्रियांना योग्य ती स्वतंत्रता होती; एवढेंच नव्हे तर त्यांच्याविषयीं पुरुषवर्गांत आदरबुद्धिही दिसून येत असे.

महापुराणाच्या १२ व्या पर्वांतील मेरुदेवींचें दिक्कन्यांशीं झालेले कूटप्रश्नात्मक संवाद वाचले ह्मणजे त्यावेळचें स्त्रीशिक्षण किती उच्च प्रतीचें होतें याची चांगली कल्पना येते. स्त्रियांनीं योग्य वेळीं संसाराची आसक्ति सोडून, श्रीजिनदीक्षा घेऊन आपल्या तपोबलानें स्त्रीलिंग छेदून, स्वर्गप्राप्ति व पुढें क्रमानें मोक्षप्राप्ति करून घेतल्याचीं अनेक उदाहरणें आपणास या पुराणांत आढळून येतील. आता तत्कालीन शिक्षणक्रमाकडे वळूं.

मुलाला पांचवें वर्ष लागलें ह्मणजे प्रथम अक्षरज्ञान करून द्यावें. नंतर त्याला आठव्या वर्षीं ब्रह्मचर्यव्रत देऊन त्याच्याकडून स्थूलहिंसात्यागादि व्रतें धारण करावावींत. त्यानें विद्यार्थी अवस्थेत तांबूल सेवन करूं नये. त्यानें अध्यात्मशास्त्र, शब्दशास्त्र, अर्थशास्त्र, गणितशास्त्र वगैरे शास्त्राचा अभ्यास करावा. विद्यार्थ्यांच्या शिक्षणक्रमात कुस्त्या, दाडपट्टा, धनुर्विद्या आदि मर्दानी खेळाचा, गायनादि कलांचा, तसेंच पुराणेतिहास व राजनीति यांचा समावेश होत असे. त्यावेळीं भावी पिढीला योग्य तें शिक्षण मिळत असल्यामुळें ती मनानें व शरीरानें मजबूत, उत्साही, दृढनिश्चयी व राष्टकार्यक्षम अशीच निघत असे शिवाय १ न्याय करण्याचें शास्त्र, २ त्रयी ह्मणजे वृद्धि ( संपत्ति वाढविणें ), क्षय ( संपत्तीचा नाश ) व स्थान ( राहण्याचें ठिकाण ) ह्या तिन्ही-बद्दलचें शास्त्र, ३ वार्ता (परराज्यांतील गुप्त यातमी मिळविण्याचें शास्त्र ) व ४ दंडनीति ह्मणजे अपराध्यांना शिक्षा देण्याचें शास्त्र या चारी राजविद्यांचें राजपुत्रांना विशेष शिक्षण देण्यांत येत असे. विद्यार्जन झाल्यानंतर गुरूच्या आज्ञेनें मुलांचा मौंज

कन्येशीं विवाह होत असे. जयकुमार व सुलोचना यांच्या स्वयंवरापासून मुलींचीं लग्नें पुढें त्याच विधीनें होऊं लागलीं.

कन्येनें स्वतः वराला पाहून आपलें दान करणें अशा प्रकारचा जो स्वयंवराचा अनुकरणीय, श्लाघ्य व सर्वोत्कृष्ट विधि त्याचा प्रारंभ करण्याचें श्रेय आपण घ्यावें ह्मणून अकंपन राजाला त्याच्या सुमति मंत्र्यानें सल्ला दिली. व त्याप्रमाणें त्या राजानें सुलोचनेचा स्वयंवर करून त्या विधीची जनतेंत वहिवाट पाडिली. यावरून वर पसंत करतांना वधूच्या इच्छेला ही योग्य तो मान देण्यांत येत असे हें उघड होतें.

त्यावेळचे लग्नसंबंध मुलामुलींच्या इच्छेविरुद्ध बलात्कारानें न होतां संमतिपूर्वक होत असत. नाभिराजानें वृषभदेवाच्या लग्नापूर्वीं त्याची संमति घेतली होती " दारपरिग्रह करणें हा गृहस्थांचा धर्म होय. गृहस्थांनीं आपल्या वंशाचें रक्षण करण्याविषयीं यत्न करणें योग्य आहे. करितां तूं लग्नाला संमति दे." याप्रमाणें नाभिराजानें आदिनाथाला चार उपदेशाच्या गोष्टी सांगून त्यानें 'ॐ' ह्मणून रुकार दिल्यानंतर त्याचें लग्न केलें. विवाह जरी झाला तरी वर्णलाभ होईपर्यंत पुत्र हा पित्याच्या ताब्यांत असे. पित्यानें दिलेलें द्रव्य घेऊन, पुत्र निराळें राहून स्वतंत्रपणें जी उपजीविका करितो तिला वर्णलाभ असें ह्मणतात. गृहस्थानें पुत्रप्राप्ति झाल्यावर त्याच्यावर योग्य वेळीं संसारभार टाकून, नंतर प्रशांतीचा स्वीकार करावा. तत्कालीन श्रावक दीक्षा घेण्यापूर्वी पुत्राला सर्व इस्टेट देऊन उपदेश करीत असत कीं, " बाबारे, या द्रव्याचा तिसरा भाग धर्मकृत्याकडे खर्च करून बाकीचा

गृहकृत्याकडे लाव. मुलींनाही तुमच्याबरोबर हिस्सा देऊन कुलपरंपरेनें चालत आलेला धर्म, सदाचार व शास्त्र यांचें रक्षण कर. " असें सांगून नंतर ते गृहत्याग करीत असत.

**राजधर्मः**—राजाचें प्रजेसंबधीं कर्तव्य काय आहे व त्यानें कसें वागलें पाहिजे याविषयींची अत्युदात्त कल्पना भगवज्जिनसेनाचार्यांनीं या सर्वसमहात्मक शिक्षणग्रंथात—महापुराणांत—आपल्यापुढें मांडली आहे.

गवळी ज्याप्रमाणें सावधानतेनें आपल्या गायींचें रक्षण करितो, त्याप्रमाणें राजानें आपल्या प्रजेचें प्रयत्नानें रक्षण करावें. इतकेंच नव्हे, पण राजानें आपल्या देशांतील शेतकऱ्यांना हरतऱ्हेनें मदत करून त्यांच्याकडून उत्तम शेतकी करवावी. योग्य रीतीनें प्रजापालन व्हावें म्हणून राजानें प्रजेच्या उत्पन्नातून योग्य तेवढाच हिस्सा घ्यावा. न्यायानें द्रव्य मिळविणें, तें न्यायानें वाढविणें, त्याचें सत्पात्रीं दान करणें हा राजाचा सदाचार होय. 'अन्यायेषु प्रवृत्तिश्चेद् वृत्तिलोपो ध्रुवं हि वः' अर्थात्, अनीतीकडे प्रवृत्ति झाल्यास संचित अन्न मिळणार नाहीं हें तत्व तत्कालीन राजे ओळखून होते. अधर्मानें राज्य कधींही चालणार नाहीं, प्रजेला समतेनें न वागविणाऱ्या राजाचा पराभव होतो अशी त्याकाळीं सर्वांची दृढ भावना होती. राज्यातील कांहीं महत्वाचीं कामें ज्येष्ठ पुत्रास युवराज नेमून त्याजवर सोंपविण्यात येत असत. राजा जर धर्मशील असेल तर प्रजाही त्याच स्वभावाची होती. कारण, 'यथा राजा तथा प्रजा' हा न्याय सुप्रसिद्धच

आहे. भरतेश्वराच्या राज्यांत त्याची प्रजाही त्याच्याप्रमाणें धर्मानें, सदाचारानें व न्यायानें वागत असे हें उघडच आहे.

अपराध्यास योग्य ती शिक्षा देणें, व निरपराध्याचा बचाव करणें हीं दोन्हीं राजाचीं पवित्र कर्तव्यकर्में समजलीं जात असत. आणि या शासनापासून राजपुत्रही वगळले जात नसत हें खालील गोष्टीवरून स्पष्ट होतें. " राजानें आपला ज्येष्ठपुत्र जर अपराधी असेल तर त्यालासुद्धा दंड करावा; या नीतिमार्गाची प्रवृत्ति करण्याकरिता मी आज तयार आहे " हें भरतचक्रवर्तीचें भाषण व त्याप्रमाणें त्यानें अर्ककिर्तीचा केलेला त्याग हें पाहिलें म्हणजे कोणालाही त्याच्या न्यायप्रियतेबद्दल कौतुकच वाटेल. येथें आचार्य म्हणतात कीं, भरतानें ज्येष्ठ पुत्राचा त्याग करून न्यायालाच आपला औरस पुत्र केला ! यावरून राजे लोक आपलें सर्वस्व खर्चूनहि कर्तव्यपालन करित असत हें दिसून येतें. प्रजेवर समदृष्टि असणें हेंच राजाचें समजसत्व होय असें मानण्यात येत असे.

श्रीवृषभासारखा रणधीर, विनयशाली, सत्यव्रत व पुण्यश्लोक राजा श्रीवृषभच होय. पुत्रवत् प्रजापालन हें तर त्याचें ब्रीद; आणि शाततासुख हे तर प्रजेचें दैवत असे. पुण्यश्लोकात अग्रगण्य असलेला श्रीऋषभनाथ व त्याचा त्रिजगद्वंद्य पुत्र भरत चक्रवर्ती यांचें चरित्र इतकें उदात्त व बोधप्रद आहे कीं, तें वाचताना हृदय तल्लीन होऊन त्याजवर संसारातील अनेकविध कर्तव्यांचें अत्यंत उदार व सर्वांगसुंदर चित्र स्पष्टपणें उमटल्यावाचून राहत नाहीं. श्रीमान् चक्रवर्ती भरत म्हणजे सर्व शम-

दमादि सात्विक गुणाचा मूर्तिमत अवतार होय. ऋषभदेवाचे सर्व सद्गुण भरतामध्यें ततोतत उतरले होते. भरताचें दिग्विजयाच्या प्रसगाचें वर्णन वाचू लागलें ह्मणजे आपणास असें आढळून येतें कीं, त्यानें जय मिळविण्यापेक्षा अधिक अपेक्षा कधींही केली नाहीं. शत्रु शरण आला ह्मणजे त्याचें समाधान होई; व पराजित शत्रूस पुन्हा वैभवास चढविण्यात तो भूषण मानित असे. यामुळें भरत शत्रूसहि प्रिय होत असे. तसेंच तो राजाधिराज भरत प्रत्येक दिवशीं क्षुधार्तांना आहारदान, भयभीत प्राण्याना अभयदान, रोग्यांना औषधज्ञान व जनतेला ज्ञानदान देऊन सर्वांचा परामर्ष घेत असे. प्रथम धर्माचा विचार करूनच तो राजा कोणतीही क्रिया करीत असे.

भरतप्रभृति क्षत्रिय राजे जसें युद्ध करण्यास योग्य तसेंच प्रजापालन करण्यासही ते शिक्षणानें योग्य होते. याच्या राज्यात सर्व प्रकारचीं सुखें पूर्णपणें नादत असल्यामुळें जनतेंत सर्वत्र आनदीआनद दिसून येत असे. अहिंसादि मतें लोक पूर्णपणें पाळित असत. पूज्याचें पूजन करणें हें इहपरलोकीं जीवांना सुखाचें साधन आहे. व पूज्यांचा अनादर करणें हें दोन्हीं लोकीं ही पाप उत्पन्न करणारें आहे; अशी राजा व प्रजा या दोघाचीही दृढ समजूत असे. राजे लोक स्वत धर्मानें वागून जनतेला त्याप्रमाणेंच वागण्यास शिकवित असत. या बाबतींत भरताचें चारित्र सर्वांना किंघा घेण्यासारखे होते. एकदा असें घडलें कीं, राज्यावर असूनहि शमदमादि गुणांच्या योगानें 'राजर्षि' ह्मणविणाऱ्या या श्रीमान् भरताला पित्याचें केवलज्ञान,

पुत्रजन्म व चक्ररत्नाची उत्पत्ति हीं तिन्ही एका वेळींच समजलीं. त्यांपैकीं पहिलें धर्मपुरुषार्थाचें फळ होय. दुसरें व तिसरें हें अनुक्रमें काम व अर्थ या पुरुषार्थांचें फळ होय. तिन्हींपैकीं प्रथम कोणतें कार्य करावें ह्मणून त्या राजाला क्षणभर विचार पडला. तथापि हें सर्व धर्माचेंच फळ आहे असा विचार करून त्यानें धर्मकार्यच सर्वांत प्रथम करण्याचें ठरविलें. यावरून धर्माकरितां कोणत्याही प्रिय वस्तूचा त्याग करावा; पण धर्म सोडूं नये इतका धर्माचरणाबद्दल सर्वांचा कटाक्ष होता हें स्पष्ट होतें. राजापासून रंकापर्यंत प्रत्येक जण आपली यत्किंचितही अपकीर्ति होऊ नये ह्मणून जपत असे. तसेंच प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणीं योग्य तो स्वाभिमान व अलोट धर्मप्रेम दृग्गोचर होत असे. आपल्या धवल यशास थोडासा सुद्धां कलंक लागूं नये याबद्दल प्रत्येकजण अत्यंत काळजी घेत असे. अस्तु.

याप्रमाणें समाजांतील बहुतेक सर्व लोक त्यावेळेस धर्म, सद्वर्तन व नीति याच्या मार्गानें चालत असत. तसेंच तत्कालीन राजे प्रजेचें न्यायानें पालन करून, काललब्धि प्राप्ति झाली असतां संसारापासून विरक्त होऊन, एखाद्या मुनीपाशीं जाऊन दिगंबर दीक्षा घेत असत. राजाबरोबर हजारों मुमुक्षजन मोठ्या आनंदानें त्याच मार्गाचें अवलंबन करित असत. त्यावेळीं चक्रवर्ती राजे, मांडलिक प्रभु व आर्यवर्ग हे आपापल्या विभूतीप्रमाणें इंद्रभुवनासारख्या विशाल, भव्य व रमणीय मंदिरांत राहून, धर्म व नीति यांचें यथायोग्य पालन करून नानाप्रकारचे विलास भोगित होते. तसेंच अशा न्यायनीतिपरायण

व प्रजाहितदक्ष चक्रवर्ती राजांचे व उदार पुरुषांचे पोवडे गाण्यास कविसमुदायांची ही रेलचेल होती. वेळोवेळीं राजाच्या व राजवंशाच्या गुणांचीं व यशाची मंगलगीतें सूत, मागध आदि स्तुतिपाठक गात असत. व त्यांना प्रातःकाळीं जागें करून वेळेवीच आठवण करून देत नसत, तर आपलें यशरूपी धन रक्षण करण्याविषयीं ते त्यांना नित्य प्रोत्साहन देत असत. तत्ववेत्त्यांचीही समाजांत उणीव नव्हती. तथापि ते उत्क्रांतीच्या पूर्णावस्थेंत असल्यामुळें, ऐहिक सर्व वस्तु क्षणभंगुर अतएव त्याज्य समजून, ते मोक्षामार्गाकडेच जास्त लक्ष्य घालित असत.

तसेंच, अराजकस्थिति अत्यंत भयंकर असते अशी सर्व लोकांची समजूत होती. ही गोष्ट खालील श्लोकावरून स्पष्ट होते.

**प्रजा दण्डधराभावे मात्स्यं न्यायं श्रयन्त्यमूः।**
**ग्रस्यन्तेऽन्तःप्रदुष्टेन विबलो हि वलीयसा ॥५२॥** [पर्व १६]

अर्थः—प्रजेला दंड करणारा राजा नसल्यास प्रजेमध्यें मात्स्यन्याय ( मोठे मासे लहान माशास खातात हा न्याय ) सुरूं होईल. अंतर्यामीं दुष्ट असलेला बलिष्ठ प्राणी निर्बळास गिळून टाकतो हें सुप्रसिद्ध आहे. अतएव संपत्ति व जीवित यांच्या सुरक्षिततेसाठीं सर्वांना राजाची अवश्यकता वाटत असे.

**युद्धकलाः**—महापुराणांतील युद्धांचें वर्णन वाचलें म्हणजे त्यावेळीं युद्धकला किती शास्त्रीय पद्धतीनें व कशी शिस्तवार होत असावी याची कोणालाही चांगली कल्पना येते. युद्धाकरितां रणभूमि कशी असावी, तसेंच सैन्याची व्यूहरचना कशी करावी, निरनिराळीं हत्यारें व अस्त्रें,

द्वंद्वयुद्ध, दृष्टियुद्ध, जलयुद्ध वगैरेचें वर्णन, बाण सोडताना कोणत्या प्रसगीं योद्ध्यानें कोणतें आसन घालावें या सर्व गोष्टींची हकीकत वाचल्यास आपणास असें दिसून येईल कीं, त्यावेळची युद्धकला रानटी अवस्थेंत नसून सध्या सुधारलेल्या राष्ट्रातल्याप्रमाणें फारच व्यवस्थित व शिस्तवार होती

अध्यात्मविचार:—जन्या आत्म्याचें स्वरूप काय आहे, त्याची प्राप्ति कशी करून घ्यावी, कर्ममीमासा, पुनर्जन्म विचार या गोष्टींचा विचार जैनाचार्यांनीं यात सुदर रीतीनें केला आहे. प्राणिमात्राच्या ठायीं दया करणें, सत्य आचार व विचार ठेवणें, क्षमा धरणें, निर्लोभ असणें, विषयभोगाची तृष्णा कमी करणें, ज्ञानसंपादन करणें, व ससारापासून विरक्त होणें याला जैनागमात ‘ धर्म ’ अशी सज्ञा दिली आहे. या उलट जो व्यवहार तो सगळा अधर्म होय. ‘ माध्यस्थभाव विपरीतवृत्तौ ’ म्हणजे भिन्नधर्मियाशीं रागद्वेषरहित वृत्ति असणें यावरून परमत सहिष्णुता दिसून येते. “ सत्वेषु मैत्री ” यावरून विश्वबधुत्वा ( Universal brotherhood )ची कल्पना येते या ग्रथांत सृष्टीच्या कर्तृत्वासबधानें पूर्वाचार्यांनीं जेवढा विचार केला आहे व त्यानीं केलेली मीमासा जितकी योग्य, तर्कशास्त्राला धरून व समाधानकारक आहे तितकी दुसऱ्या कोठेंच झाल्याचें दिसून येत नाहीं. समाजाची इमारत धर्माच्या व नीतीच्या भरभक्कम पायावर उभारण्यामध्यें त्याची जितकी खटपट झाली तितकी दुसऱ्या कोणी केल्याचें क्वचितच आढळेल. ह्या सृष्टीचें आदिकारण काय असावें अशाविषयीं आमच्या महाज्ञानी

पूर्वाचार्यांचा तीव्र कोटिक्रम, कुशाग्र बुद्धिवाद आणि अति सूक्ष्म विवेचनपद्धति हीं पाहून कोणालाही आश्चर्य वाटल्यावांचून राहत नाहीं. व ह्या अध्यात्मविद्येचा व्यासंग त्यांनीं इतक्या पुरातन कालीं केला होता कीं, त्यावेळेस या भूतलावरील इतर सुधारलेलीं राष्ट्रें केवळ गाढ निद्रावस्थेंत होती.

**उपसंहारः**—या महापुराणांत धर्मशास्त्र, नीतिशास्त्र, राजधर्म, क्षात्रधर्म, श्रावकधर्म, मुनिधर्म, पदार्थविज्ञानशास्त्र, कर्म, तत्वज्ञान वगैरे सर्व उपयुक्त विषयाचें विवेचन केलें आहे. आमच्या पूर्वाचार्यांनीं धर्मशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र वगैरे विषयांवर ते वेळीं लाविलेले मोठमोठे शोध अद्याप सुद्धां मोठमोठ्या विद्वानाना थक्क करून सोडित आहेत. तसेंच, गणित, ज्योतिष, खगोल, भूगोल आदि शास्त्रामध्यें तत्कालीन लोकाची प्रगति कालमानाप्रमाणें बरीच दिसून येतें. आकाशांतील ग्रहनक्षत्रादिकाचे वेध घेऊन ग्रहनक्षात्रादिकासंबंधाच्या एकंदर बऱ्याच गोष्टींचा निर्णय त्यावेळीं ठाम झाला होता. लव, घटि, कला, मुहूर्त, दिवस, रात्र, पल्य, सागर, कल्प, युग वगैरे कालाच्या भागाची लोकांना पूर्ण माहिती होती. अहिंसा, सत्य, अस्तेय, विश्वबंधुत्व, परमतसहिष्णुता इत्यादि सात्विक गुणाच्या व उदार तत्वांच्या पायावर या जैनधर्माची रचना झाली आहे. आम्ही पुनर्जन्म तसेंच पाप पुण्य मानित असल्यामुळें आपल्या कर्मानें बरेंवाईट फळ केव्हाना केव्हा तरी अर्थात् इहलोकीं किंवा परलोकीं भोगल्यावांचून गत्यंतर नाहीं अशी आमची दृढ श्रद्धा व ह्या

एक आमच्या धर्माचा सिद्धांत असल्यानें ज्यायोगें पापाश्रव घडतील अशीं कर्मे करण्यास जैनधर्मानुयायी माणूस कचरला पाहिजे. अशा या उदात्त धर्माचा, उदात्त नीतीचा या पुराणांत ठिकठिकाणीं विचार आला आहे. दयाघन वीतराग प्रभूनें उपदेशिलेला आमचा हा दयामय सनातन जैनधर्म जगाच्या पाठीवर चालू असलेल्या सर्व धर्मांत अगदीं प्राचीन आहे. एवढेंच नव्हे, पण आह्मी तर त्याला अनादि मानतो. या धर्माचा जितका जितका अभ्यास जास्त करावा, तितका तितका यासंबंधानें अधिकाधिक पूज्यभाव व अधिकाधिक प्रेम वाढूं लागतें. व या धर्मांत आपण जन्मल्याबद्दल स्वतःला धन्यता वाटूं लागतें! अस्तु; त्यावेळेस भारतवासियांची सामाजिक, नैतिक, राजकीय व आध्यात्मिक स्थिति सर्वतोपरि समाधानकारक होती; इतकेंच नव्हे पण ती सुधारणेच्या शिखरास जाऊन पोंहचली होती. त्या लोकांच्या प्रत्येक कृत्यास धर्माचा, सदाचाराचा व नीतीचा दुजोरा असल्यामुळेंच त्यांची अशा प्रकारें उन्नति व भरभराट झाली हें योग्यच आहे. शेवटीं, श्रीआदिप्रभू व भरतचक्रवर्ती यासारखे जगद्वंद्य चरित्रनायक, गीर्वाणभाषेसारखी प्रौढ व तेजस्वी भाषा आणि जिनसेनासारखा प्रतिभासंपन्न महाकवि असा अपूर्व त्रिवेणीसंगम प्रस्तुत ग्रंथांत जुळून आला आहे. करितां, वाचकांनीं या अद्वितीय ग्रंथाचें एकदा पारायण करून कृतार्थ व्हावें अशी पुन्हां एकदां विनंति करून पुढें वळतो.

आदिपुराणाचीं शेवटचीं ५ पर्वे गुणभद्राचार्यांनीं लिहिलीं

आहेत हें आह्मी पूर्वी सांगितलेंच आहे. गुणभद्राचार्यकृत हीं ५ पर्वे व उत्तरपुराण हीं आदिपुराणाच्या लौकिकास सर्वस्वी शोभण्यासारखीच आहेत. खरोखर, स्वतः ग्रंथरचना करणें कठीण नाहीं; पण दुसऱ्याच्या अपुऱ्या ग्रंथास जोड लावून दोघांचा एक जीव करून देणें ह्मणजे प्रतिसृष्टि निर्माण करण्याप्रमाणेंच परम दुर्घट आहे. तथापि, बाणभट्टाच्या पुत्रानें पित्याची राहिलेली अपूर्ण कादंबरी पूर्ण करण्यांत ज्याप्रमाणें यश मिळविलें, त्याप्रमाणेंच गुणभद्राचार्यांनीं ही आपल्या परमपूज्य गुरूच्या कवीतेच्या तोडीची कविता करण्यांत चांगलेंच यश मिळविलें. सर्व महापुराण श्रीजिनसेनचार्यांच्या हातून पुरें झालें असतें तर तो ग्रंथ केवढा मोठा झाला असतां त्याची कल्पना करवत नाहीं. हें अपुरें काव्य गुणभद्राचार्याशिवाय इतर कोणाच्या हातून इतक्या चांगल्या रीतीनें पुरें झालें असतां कीं नाहीं याबद्दल जबरदस्त शंका वाटते. उत्तरपुराणाच्या आरंभीं जी त्यांनीं थोडिशी प्रस्तावना केली आहे तिजवरूनही त्यांची स्वाभाविक बुद्धि व संस्कारजन्य विनय हीं स्पष्ट दिसतात. अतुलविद्यावाचस्पति अशा श्रीमज्जिनसेनाचार्यांचें पट्टशिष्यत्व श्रीगुणभद्राचार्याला प्राप्त झालें होतें एवढें सांगितलें ह्मणजे त्यांचा अधिकार केवढा मोठा होता ह्यासंबंधानें निराळें सांगणें नको. आतां श्रीगुणभद्राचार्यांच्या ग्रंथांचें थोडक्यांत समालोचन करितों.

गुणभद्राचार्यांनीं लिहिलेल्या ग्रंथांपैकीं आज मितीस तीन ग्रंथ उपलब्ध आहेत. एक आदिपुराणाचा शेष भाग व

उत्तरपुराण, दुसरें आत्मानुशासन व तिसरें जिनदत्त-चरित्र. यापैकीं आदिपुराणाच्या शेषभागाबद्दल वर लिहिलेंच आहे. उत्तरपुराण आदिपुराणाच्या शेवटच्या पाच पर्वाप्रमाणेंच उत्तम झालें आहे. तंजावरचे श्रीयुत कुप्पूस्वामी शास्त्री यांनीं उत्तरपुराणातून जीवधंरचरित्र वेगळें काढून छापून प्रसिद्ध केलें आहे, व तें विद्वानांना फार पसंत पडलें आहे. यावरून उत्तरपुराणातील कवीतेच्या उत्तमतेचें सहज अनुमान करिता येतें.

**आत्मानुशासनः—** हा २७२ श्लोकाचा छोटासा पण अत्युत्तम ग्रंथ आहे. हा ग्रंथ गुणभद्राचार्यांनीं लिहिण्याला केव्हां सुरवात केली, तो केव्हां संपविला, त्याच्या रचनेला किती काळ लागला इत्यादि गोष्टी समजण्याला कांहीं सामुग्री उपलब्ध नाहीं. कारण, गुणभद्राचार्यांनीं फक्त आत्मानुशासनाच्या शेवटीं आपला व आपल्या गुरूचा खालीलप्रमाणें उल्लेख केला आहे.

जिनसेनाचार्यपादस्मरणाधीनचेतसाम् ।
गुणभद्रभदन्तानां कृतिरात्मानुशासनम् ॥२६९॥

अर्थः—श्रीमज्जिनसेनाचार्यांच्या चरणकमलाचें स्मरण करण्यात ज्याचें चित्त रममाण झालें आहे असे जे गुणभद्र त्यांनी हा आत्मानुशासन ग्रंथ रचिला आहे. आत्मानुशासन हा ग्रंथ महापुराणाचा शेष भाग रचण्यापूर्वी लिहिला असावा असें एक अनुमान निघतें कारण, आत्मानुशासनावर हिंदी भाषेंत टीका लिहिणारे प० टोडरमल्लजी या ग्रंथाच्या हिन्दी भाषेच्या टीकेच्या प्रारंभीं लिहितात कीं, आत्मानुशासन

हें काव्य गुणभद्राचार्यांनीं **लोकसेन** नामक शिष्याला उपदेश करण्याकरितां रचिलें आहे. पं. टोडरमलजींनीं ही टीका संस्कृत टीकेच्या आधारानें लिहिली आहे. आतां, उत्तरपुराणाच्या प्रशस्तींत गुणभद्राचार्यांनीं लोकसेनमुनीला ' विदितसकलशास्त्र, मुनीश, कवि, अविकलवृत्त ' आदि विशेषणें दिलीं आहेत. उत्तरपुराण लिहितांना गुणभद्राचार्यांनीं लोकसेनमुनीला हीं जीं विशेषणें दिलीं आहेत यावरून असें अनुमान निघतें कीं, हीं विशेषणें लोकसेनमुनीला देण्याच्यापूर्वी त्यांना जितकी उपदेशाची आवश्यकता होती तितकी कांहीं आवश्यकता त्यावेळीं—अर्थात् उत्तरपुराण रचतांना—नसली पाहिजे. ह्मणून जोंपर्यंत कांहीं विरूद्ध पुरावा पुढें येत नाहीं, तोंपर्यंत आत्मानुशासन उत्तरपुराण लिहिण्याच्या पूर्वी लिहिलें असलें पाहिजे असें मानिल्यास वावगें होणार नाहीं. हा अमूल्य बोधग्रंथ आत्म्याला बोध करण्याकरितां—त्याला वशीभूत करण्याकरितां—न्यायी शास्त्याप्रमाणें आहे. आध्यात्मिक विषयाच्या भोक्त्यांना या ग्रंथाच्या अध्ययनापासून अपूर्व शांतीचा लाभ होतो. याची रचना भर्तृहरीच्या वैराग्यशतकाच्या धर्तीची असून, तशीच प्रभावशालिनीहि आहे. यांत तत्वज्ञान व कवीची उदात्त प्रतिभाशक्ति यांचा मनोहर संगम झाला आहे. दर्शन, ज्ञान, तप, आणि चारित्र अशा चार आराधनांचें यांत मुख्यतः वर्णन केलें आहे. आत्मानुशासनांतील कांहीं श्लोक आह्मीं आमच्या वाचकाकरितां खालीं दिले आहेत. त्यांवरून या महाकवीच्या लेखनशैलीचा वाचकांस थोडा बहुत परिचय होऊन बोधहि होईल.

हे चन्द्रम' किमिति लाञ्छनवानभूस्त्वं ।
तद्वान् भवेः किमिति तन्मय एव नाभूः ॥
किं ज्योत्स्नया मलमलं तव घोपयन्त्या ।
स्वर्भानुवन्ननु तथा सति नाऽसि लक्ष्यः ॥१४०॥

अर्थः—हे चंद्रा, तूं कलंकानें युक्त कां झालास ? तुला जर कलंकयुक्तच व्हावयाचें होतें, तर सर्वस्वी कलंकमय कां नाहीं झालास ? अरे, तुझा कलंकच प्रामुख्यानें दाखविणाऱ्या या प्रकाशाचा काय उपयोग ? यापेक्षा, जर तूं राहूप्रमाणें सर्वस्वी कृष्णवर्णाचा असतास, तर तुझा दोष कोणालाही दिसला नसतां ! अर्थात् तुझा चिडविण्यास तरी अवसर मिळाला नसता ! या ठिकाणीं, कवीनें मोठ्या चातुर्यानें अन्योक्ति अलकारानें चद्राला अनुलक्षून उपरोधिक भाषण केलें आहे या श्लोकात श्रेष्ठ दर्जाच्या व्यक्तीच्या अगीं असलेला यत्किंचितही अवगुण टीकेस पात्र होतो असें मोठ्या मार्मिकतेनें आचार्यांनीं दाखविलें आहे.

सत्यं वदात्र यदि जन्मनि बन्धुकृत्य-।
माप्तं त्वया किमपि बन्धुजनाद्धितार्थम् ॥
एतावदेव परमास्ति मृतस्य पश्चात् ।
संभूय कायमहितं तव भस्मयन्ति ॥ ८३ ॥

अर्थः—अरे बाबा, या जन्मीं बंधुजनापासून जर तुझें कांहीं खरें खरें हित झालें असेल तर तें मला दाखिव. मरणानंतर सर्व बांधवानीं एकत्र होऊन, तुझ्या या अपकार करणाऱ्या शरीराला जाळून भस्म केलें, एवढाच त्यांचा

उपकार आम्हांला तर दिसतो. याठिकाणीं आप्तेष्टांच्या मोहजालांत गुंतून स्वकर्तव्यापासून च्युत होऊं नका असा उपदेश आचार्यांनीं मोठ्या कळकळीनें केला आहे.

ज्ञानमेव फलं ज्ञाने ननु श्लाघ्यमनश्वरम् ।
अहो मोहस्य माहात्म्यमन्यदप्यत्र मृग्यते ॥१७५॥

अर्थः—ज्ञानाचें ज्ञान हेंच फल होय; व तें सर्वस्वी श्लाघ्य असून अविनाशी आहे. अहो! ज्ञानाला सोडून दुसऱ्या सांसारिक फलांची इच्छा करणें हें खरोखर मोहाचें महात्म्य होय. सारांश, ज्ञानापासून निराकुल असें जें सुख मिळतें तें सोडून विपयसुखाची इच्छा करणें हें मूर्खपणाचें होय.

प्रियामनुभवत्स्वयं भवति कातरं केवलं ।
परेष्वनुभवत्सु तां विषयिषु स्फुटं ल्हादते ॥
मनो ननु नपुंसकं त्विति न शब्दतश्चार्थतः
सुधी कथमनेन सन्नुभयथा पुमान् जीयते ॥१३७॥

अर्थः—मन हें केवल शब्दानें ( व्याकरणानें ) च नपुंसक आहे असें नाहीं, तर तें अर्थानेंही नपुंसक आहे. कारण, त्याला स्वतः तर स्त्रीचा उपभोग घेतां येतच नाहीं; उलट तें भयभीत होतें. शिवाय, स्पर्शनादिक दुसरीं इंद्रियें स्त्रीचा उपभोग घेतात तें पाहून, मन यंढाप्रमाणें हर्ष पावतें; पण बुद्धिमान् पुरुष हा वरील दोहोंप्रकारांनींही पुल्लिंगी आहेः त्याला हें षंढ मन जिंकू शकेल काय? सारांश, मनाला बलवान् समजून शहाण्यानें आपला पुरुषार्थ सोडूं नये. पुरुषार्थानें मनोविजय करणें हेंच श्रेयस्कर आहे.

**जिनदत्तचरित्रः**—वडनगरांत शेठ मलूकचंदजी हिराचंदजी यांच्या मंदिरांत या ग्रंथाची एक संस्कृत प्रत आहे. या ग्रंथाची रचनाशैली फार चांगली असून भाषा प्रौढ आहे. या चिमुकल्या नऊ सर्गाच्या काव्यवाचनापासून गुणभद्राचार्यांच्या पांडित्याचा व रसाळ वाणीचा पूर्ण परिचय होतो. हें सर्व काव्य अनुष्टुप श्लोकांत आहे.

भावसंग्रह नांवाचा ग्रंथ ही **गुणभद्राचार्यकृत** आहे असें ह्मणतात. परंतु तो ग्रंथ उपलब्ध नसल्यामुळें त्यासंबंधीं आह्मी कांहीं लिहूं इच्छित नाहीं. श्रीयुत तात्या नेमिनाथ पागळ यांनीं ' विविधज्ञानविस्तार, ' मासिकांत गुणभद्राचार्यांचें चरित्र लिहिलें आहे. त्यांत त्यांनीं एक त्याच्यासंबंधीं दंतकथा दिली आहे. ती अशीः—

" ज्यावेळीं जिनसेनाचार्याला समजलें कीं, महापुराण कांहीं आपल्या हातून पुरें होत नाहीं व आपला अंतसमय तर आतां अगदीं जवळ येऊन ठेपिला आहे, त्यावेळीं आपल्या शिष्यांपैकीं कोणता शिष्य हा ग्रंथ उत्तम रीतीनें पुरा करील अशी त्यांना मोठी चिंता वाटूं लागली. तेव्हा त्यांनीं आपल्या सर्व शिष्याना बोलाविलें. व समोर असलेल्या शुष्क वृक्षाचें काव्यवाणींत वर्णन करण्यास सांगितलें. तेव्हा एक जण

---

**टीप**—ही दंतकथा विश्वसनीय वाटत नाहीं. कारण, सुप्रसिद्ध कवी **बाणभट्टासंबंधानें** सुद्धां अशीच गोष्ट ऐकण्यांत येते. बाणभट्ट जेव्हा आसन्नमरण झालें तेव्हा त्यानीं ही आपल्या दोन पुत्राना आपल्या अपुऱ्या राहिलेल्या कादंबरी संबधानें असाच प्रश्न विचारला असून त्याचें उत्तर ही हेंच मिळालें होतें. यावरून या दंतकथेंत फारसें तथ्य असावें असें वाटत नाहीं.

शुष्कं काष्ठं तिष्ठत्यग्रे। ' असें ह्मणाला. दुसऱ्यानें ' नीरसतरुरिह विलसति पुरतः । ' असें वर्णन केलें. हे दुसरे शिष्य ह्मणजे गुणभद्राचार्य होत. यानीं केलेलें सरस वर्णन ऐकून जिनसेनाचार्यांनीं यानाच योग्य व अधिकारी समजून, शेष ग्रंथ पुरा करण्याची आज्ञा केली.

## समकालीन राजांचा परिचय.

### प्रथम अमोघवर्ष.

श्रीजिनसेनचार्य व गुणभद्राचार्य यांच्या वेळीं जे जे राजे होऊन गेले त्या सर्वांमध्यें महाराज प्रथम अमोघवर्ष हे जैनधर्माचे मोठे पुरस्कर्ते व श्रीमान् जिनसेनाचार्यांचे परम भक्त होते.

---

टीप—१ "The rapid progress made by Digambar Jainism late in the ninth and early in the tenth century under the guidance of various notable leaders, including Jinasen and Gunabhadra, who enjoyed the favour of more than one monarch, had much to do with the marked decay of Budhism."

Vincent Smith's Early Hitory of India. p. 328

नवव्या शतकाच्या अखेरीस व दहाव्या शतकाच्या आरंभीं थोड्याच अवधींत जिनसेनगुणभद्रादि अनेक प्रसिद्ध आचार्यांच्या-याच्यावर अमोघवर्षप्रभृति तत्कालीन राजांची कृपादृष्टी असल्यामुळे-नेतृत्वाखालीं दिगंबर जैनधर्माची चांगलीच प्रगति झाली. त्यायोगे बौद्धधर्माचा त्या काळांत मोठा ऱ्हास झाला.

प्रश्नोत्तररत्नमाला नांवाचा एक लहानसा ग्रंथ प्रथम अमोघवर्षराजानें लिहिला आहे हें त्याच ग्रंथांतील अंतिम श्लोकावरून स्पष्टपणें दिसून येतें:—

विवेकात्त्यक्तराज्येन राज्ञेयं रत्नमालिका ।
रचितामोघवर्षेण सुधियां सदलङ्कृतिः ॥

यावरून अमोघवर्षानें विवेकपूर्वक ह्मणजे संसार असार आहे असें समजून राज्याचा त्याग केला होता असेंहि दिसतें. शिवाय, त्या ग्रंथाच्या प्रारंभीं दिलेला खालील श्लोक पहाः—

प्रणिपत्य वर्धमानं प्रश्नोत्तररत्नमालिकां वक्ष्ये ।
नागनरामरवन्द्यं देवं देवाधिपं वीरम् ॥

महाराज अमोघवर्ष हे जैनांचे चोवीसावे तीर्थंकर भगवान् महावीर याचे अनुयायी असून, त्यांच्या सत्य उपदेशाचा महाराजांच्या मनावर इतका प्रभाव झाला होता कीं, ते संसारत्याग करून, राज्यावर लाथ मारून धर्मसेवन करूं लागले होते, ही गोष्ट उपरिनिर्दिष्ट दोन श्लोकावरून स्पष्टपणें सिद्ध होते.

अमोघवर्षाचा उल्लेख प्राचीन लेखांत व पुस्तकांत 'अमोघवर्ष', 'नृपतुंगदेव' व 'शर्वदेव' अशा तीन नांवांनी केलेला आढळतो. महाराज अमोघवर्ष हे औदार्य, धर्मप्रीति, दानशूरत्व व न्यायपरायणता आदि सद्गुणांमुळें इतके प्रसिद्ध झाले होते कीं, भावी पिढींतील लोकाना 'अमोघवर्ष' हें नांव धारण करणें ही एक पदवी वाटूं लागली. इतकेंच नव्हे, पण राठोड वंशांतील तीन चार राजांनीं व परमार वंशाच्या मुंज राजानेंही हें नांव भूषण समजून धारण केलें होतें. यांच्या मागून

अमोघवर्ष नांवाचे तीन चार राजे होऊन गेले. म्हणून इतिहासांत यांचा 'प्रथम अमोघवर्ष' असा उल्लेख केलेला आढळतो. अमोघवर्ष हे राष्ट्रकुट अथवा राठोर वंशाचे राजे होते. त्यावेळीं राष्ट्रकूट वंशाचें राज्य सर्व महाराष्ट्र व कर्नाटक प्रांतांत पसरलें होतें. प्रथम अमोघवर्षराजाच्या कारकीर्दींत राष्ट्रकूट वंशाची राज्यलक्ष्मी उन्नतीच्या व सुधारणेच्या शिखरास जाऊन पोंहोचली होती. मान्यटखेड नगर ही त्यांची राजधानी होय. प्रथम अमोघवर्ष हे एक त्या कालचे महान् पराक्रमी राजाधिराज असून त्यांचें धवल यश चोंहोकडे पसरलें होतें. अंग, वंग मगध, मालव व वेंगी या देशाचे राजे याच्यापुढें नम्र होत असत असें एका शिलालेखा (इंडियन एण्टिक्वेरी. पु० १२ पृ. २१८) वरून समजते. हे सर्व राजे अमोघवर्षाचे माडलिक होते. अमोघवर्ष हे चांगले विद्वान् असून त्यांनीं संस्कृत व कानडी भाषेंत अनेक ग्रंथ लिहिले आहेत. यानीं प्रश्नोत्तररत्नमालेशिवाय कविराजमार्ग नावाचा एक सुंदर अलंकारग्रंथ कानडी भाषेंत लिहिला आहे. ह्याची त्या भाषेंतील उत्तम ग्रंथात गणना केली जाते.

अमोघवर्षानें शक संवत ७३६ पासून तो ७९९ पर्यंत (इसवी सन ८१५ पासून तों सन ८७७ पर्यंत) राज्य केलें ही गोष्ट इतिहासज्ञांनीं निश्चित केली आहे. जिनसेनाचार्यांचा स्वर्गवास अजमासें शकसंवत ७६५ मध्यें झाला. यावरून जिनसेन स्वामी परलोकवासी झाले तेव्हा अमोघवर्ष महाराज राज्य करीत होते हें ठरतें. शकसंवत ८०० मध्यें

अमोघवर्ष महाराजांनीं राज्याचा त्याग केला होता. त्यावेळीं गुणभद्रस्वामी हे आचार्यपदावर विराजमान झाले होते. असो. या विवेचनावरून खालील गोष्टी निश्चित होतात. जिनसेनाचार्यांचा जन्म शकसंवत ६७५ मध्यें व मृत्यु ७७० मध्यें झाला; व त्यांच्यानतर गुणभद्राचार्य हे निदान शकसंवत ८२० पर्यंत तरी हयात होतें हें आह्मी वर दाखविलेंच आहे. या मधल्या काळांत ह्मणजे शकसंवत् ६७५ पासून तो शकसंवत् ८२० पर्यंत राष्ट्रकूटवंशाचे चार पांच राजे होऊन गेले. त्यापैकीं तिघाची नावें व त्यांचा काल खालीं दिला आहे. श्रीवल्लभ-राजा शकसंवत ७०५ पासून तों ७३६ पर्यंत. अमोघवर्ष ७३६ पासून तों ७९९ पर्यंत; व अकालवर्ष शकसंवत ८०० पासून तो ८३३ पर्यंत. याप्रमाणें भगवान् जिनसेन व गुणभद्र यांच्या समकालीन असलेल्या राष्ट्रकूटवंशाच्या राजाची माहिती अगदीं संक्षेपानें देऊन, हें आचार्यद्वयाचें साधु व दिव्य चारित्र त्यांना भक्तीनें शतशः प्रणाम करून पुरें करितों.

## पूर्वीचे कवि व आचार्य.

जिनसेनाचार्यांनीं महापुराणाच्या भूमिकेंत ज्या आचार्यांचा व कवींचा नामनिर्देश केला आहे त्यांचा या चारित्रांत उल्लेख करणें हें ऐतिहासिक दृष्टीनें उपयुक्त व आवश्यक आहे, असें वाटल्यावरून आह्मी त्या पुराणाच्या आधारानें त्याच्यासंबंधीं खालील माहिती देत आहोंतः—

१ सिद्धसेनकविः—यांना ' प्रवादिकरिकेसारि ' असें विशेषण दिलें आहे. हे मोठे नैयायिक, तार्किक व जाडे पंडित होते. हे सुप्रसिद्ध तार्किक ' सिद्धसेन दिवाकर ' असावेत असेंहि कांहीं लोकांचें अनुमान आहे. सिद्धसेन दिवाकर यांनीं अनेक विद्वत्तापूर्ण न्यायग्रंथ लिहिले आहेत.

समन्तभद्रः—' कवी, वादी, गमक व वाग्मीजैन यांचे शिरोमणि ' अशी यांची स्तुति केली आहे. यांनीं गन्धहस्ति-महाभाष्य, रत्नकरंडश्रावकाचार, देवागम वगैरे ग्रंथांची रचना केली आहे. हे न्यायशास्त्रात चांगले निष्णात होते.

३ श्रीदत्तः—यांना ' मोठे तपस्वी व मिथ्यामतवादि-रूपी हत्तींचें सिंहासारखे भेदन करणारे ' असें विशेषण दिलें आहे.

४ यशोभद्रः—विद्वज्जनसभेंत यांचें नांव ऐकतांच वादी-लोकांचा गर्व नाहींसा होत असे, असें याच्यासंबंधीं आचा-र्यांनीं म्हटलें आहे.

५ प्रभाचंद्रकविः—यांनीं चन्द्रोदय ( न्यायकुमुदचंद्रो-दय नामक ग्रंथ लिहून ) करून जनतेला आल्हादित केलें. हे ' प्रमेयकमलमार्तंड ' या ग्रंथाचे कर्ते होत.

---

१ जेणेंकरून जय प्राप्त होईल असें भाषण करणारे ते ' वादी ' होत.

२ कवींच्या कृतींतील मर्म शोधून काढणारे ते ' गमक ' होत.

३ उत्तम व अस्खलित वक्तृत्व ज्याच्या अंगीं आहे त्याला ' वाग्मी ' असें म्हणतात.

६ शिवकोटिमुनीश्वरः— यांच्या आराधनाचतुष्टयांचें (भगवती आराधना ग्रंथाचें) आराधन केल्यामुळें हें जग मोक्षमार्गांत प्रवृत्त झालें असें यांच्यासंबंधीं म्हटलें आहे.

७ जटाचार्यः—' काव्याचें चिंतन करतांना यांच्या इकडे तिकडे वळलेल्या जटा जणूं काय अर्थाचें व्याख्यान करित आहेत अशा दिसत. ' असें यांचें वर्णन महापुराणांत केलें आहे. जटाचार्यांचें दुसरें नांव सिंहनन्दि असें होतें.

८ काणभिक्षुः—यांनीं ' कथालंकार ' हा ग्रंथ लिहिला.

९ देवाचार्यः—यांना ' कवींचे तीर्थंकर ' असें म्हटलें आहे. बहुतकरून देवनन्दि आचार्यांचेंच हें संक्षिप्त नांव असावें.

१० भट्टाकलंक, ११ श्रीपाद, १२ पात्रकेसरीः— यांनीं आपल्या निर्मल सद्गुणांनीं व अगाध विद्वत्तेनें विद्वज्जनांचीं अंतःकरणें आकर्षून घेतलीं होतीं असें म्हटलें आहे.

१४ वीरसेनः—हे जिनसेनाचार्यांचे गुरु, सुप्रसिद्ध कवि आणि भट्टारक व सिद्धान्तग्रंथाचे टीकाकार होते. यांना लोकस्वरूपाचें ज्ञान फार उत्तम होतें. यांचें वक्तृत्व बृहस्पतिवत् होतें.

१५ जयसेनः—तपस्वी, शांतमूर्ति, शास्त्रज्ञ, पंडितामणी अशीं विशेषणें यांना दिलीं आहेत.

१६ कविपरमेश्वरः—कवींना पूज्य; वाणी व तिचा अर्थ यांचा संग्रह ज्यांत आहे अशा पुराणाचे कर्ते.



# प्रार्थना.

जयतुभगवानास्तां धर्मः प्रसीदतु भारती ।
वहतु जगती प्रेमोद्गारं तरन्त्वशुभं जनाः ॥
अयमपि मम श्रेयान्गुम्फस्तनोतु मनोमुदं ।
किमधिकमितस्त्यक्तावेगा भवन्तुविपश्चितः ॥

अर्थः—भगवान् जिनेंद्रदेवाचा जयजयकार असो! धर्म स्थित राहो; अर्थात् धर्माची चिरस्थिति असो! सरस्वतीदेवी प्रसन्न होवो! जगात प्रेमबुद्धि वृद्धिंगत होवो! लोक पापापासून मुक्त होवोत! विद्वज्जन निराकुल होवोत, आणि हा माझा ग्रंथ सर्वांना आनंद देणारा होवो! यापेक्षा अधिक काय सांगावें?



समाप्त.



श्री परमात्मने नमः

# महापुराणामृत.

## ( पूर्वार्द्ध. )

## पर्व १ लें.

### कथामुखव्यावर्णन.

श्रीमते सकलज्ञानसाम्राज्यपदमीयुषे ।
धर्मचक्रभृते भर्त्रे नमः ससारभीमुषे ॥ १ ॥

अर्थः–ग्रंथकार भगवज्जिनसेनाचार्य आरंभिलेलें कार्य निर्विघ्नपणें समाप्त होण्याकरितां किंवा शिष्टसंप्रदायाच्या परिपालनार्थ ग्रंथारंभीं इष्टदेवास नमस्काररूप मंगलश्लोक सांगतातः-

बहिरंग ( गर्भावतारादि पाच 'कल्याण, चौतीस अतीशय, अष्ट महाप्रातिहार्य वगैरे ) व अंतरंग ( अनंतज्ञान, दर्शन, व वीर्य सुख इत्यादि ) अशा भेदानें दोन प्रकारची

जी श्री ह्मणजे संपत्ति तिचा अधिपति, केवलज्ञानाचें जें साम्राज्यपद ह्मणजे सार्वभौमपदवी तीप्रत पावलेला, धर्मचक्रसहित असणारा व चतुर्गतिभ्रमणरूप जो संसार त्यापासून प्राप्त होणाऱ्या भीतींचें हरण करणारा असा जो वीतरागप्रभु त्यास माझा नमस्कार असो.

पुढें आचार्य धर्मसाम्राज्याचे अधिपति असे जे श्रीऋषभनाथापासून महावीरापर्यंतचे चोवीस तीर्थंकर त्यांना व गणधरांना पुन्हा नमस्कार करून, व देवगुरुशास्त्र यांचें स्तवनरूप मंगल करून, ६३ महापुरुषांचें ( वृषभादि महावीरपर्यंत २४ तीर्थंकर, १२ चक्रवर्ती, ९ बलदेव, ९ वासुदेव व ९ प्रतिवासुदेव ) पुराण संक्षेपानें सांगतात. या पुराणांत महापुरुषांचें चरित्र वर्णिलें आहे ह्मणून किंवा वृषभादि महापुरुषांनीं याचा उपदेश केला आहे ह्मणून अथवा मोठ्या श्रेयाची ( ऐहिक व पारलौकिक सुखाची ) प्राप्ति कशी करून घ्यावी हें सांगितलें आहे ह्मणून यास महापुराण ह्मटलें आहे. जें पुराण गणधरांनीं सांगितलें आहे तेंच पुराण मी केवळ महापुरुषांच्या गुणाविषयीं असलेल्या भक्तीच्या प्रेरणेनें सांगतों असें आचार्य येथें मोठ्या विनयानें सांगतात याप्रमाणें जिनवचनाम अनुसरून कथेचें मुख दाखविलें.

आतां आचार्य येथून कथेच्या अवताराचा संबंध सांगतात.

जगत्प्रसिद्ध असा पुत्र श्रीवृषभ तीर्थंकर हा सहज विहार करीत करीत कैलास पर्वतावर येऊन तेथें त्यानें वास केला असें फार प्राचीन कालापासून गुरुपरंपरेनें ऐकण्यांत येत आहे. त्या जिनेश्वराच्या दर्शनानें देवेंद्र अत्यंत संतुष्ट झाला; व त्यानें 'समवसरण' सभेची रचना करविली. तेव्हां भगवद्भक्त भरतराजा त्या ठिकाणीं आला. व त्यानें तीर्थंकरास साष्टांगप्रणिपतनपूर्वक नमस्कार करून दोन्ही हस्त जोडून भगवंताची खालीं लिहिल्याप्रमाणें प्रार्थना केली, "हे जिनेश्वरा, तुझ्या दर्शनानेंच मी पुनीत झालों आहे. त्यांतून धर्मोपदेशमय तुझी वाणी ऐकून तर मी फारच कृतार्थ झालों आहे! तथापि तुझ्या वचनामृताचें पुनः पुनः पान करावें अशी पबळ इच्छा असल्यामुळें आणखी कांहीं विचारावें असें मला वाटतें. हे भगवन्, सर्व प्रकारचें सुख प्राप्त करून देणारा असा जो धर्म त्याचा ज्यांत संग्रह केला आहे असें महापुरुषांचें पुराण ऐकण्याची मी इच्छा करितों; करितां प्रसन्न हो व मजवर दया कर. हे जिनश्रेष्ठा! तीर्थंकर किती? चक्रवर्ती किती? बलदेव किती? वासुदेव, व प्रतिवासुदेव किती? त्यांचें भूत, भविष्यत् व वर्तमान कालीन चरित्र कसें आहे? ते कोणत्या युगांत झाले? मनु (१४ कुलंकर) कोण? लोक (जग) वर्णन, कालाचा अवतार, क्षात्र[१],

१ टीपः—ब्राह्मण वर्ण भरत राजानें स्थापित केला आहे म्हणून त्याविषयीं प्रश्न केला नाहीं.

वैश्य व शुद्र या तीन वर्णांची उत्पत्ति होण्याचें कारण काय? हें सर्व तुझ्या मुखानें ऐकण्यांची माझी इच्छा आहे. करिता हे जिनसूर्या, माझा सशयरूपी अंधःकार तुझ्या वचनरूपी किरणांनीं नाहींसा कर." याप्रमाणें भरत प्रश्न करून आपल्या जागीं जाऊन बसला. भरताचा हा प्रश्न ऐकून भगवान् आदि तीर्थंकरांनीं अत्यंत गभीर अशा वाणीनें फार प्राचीन कालचा वृत्तात सागण्यास आरंभ केला. भगवान् हे वीतराग असल्यामुळें बोलण्याची इच्छा करीत नसूनही त्याच्या मुखापासून दिव्य वाणीचा प्रसार झाला. तसेंच एकाच रूपानें प्रकट झालेली ती स्वयंभूंची भाषा अनेक प्रकारच्या श्रोत्याजवळ जाऊन अनेक स्वरूपास पावली.

आदिब्रह्मचानें प्रथमच उत्सर्पिणी कालात होऊन गेलेल्या महापुरुषाचें चरित्र सागितलें. नतर या अवसर्पिणी कालातील ही कथा सागण्याकरिता प्रथम पुराणाची पीठिका सागितली. चतुर्थ कालाच्या आरंभीं आदिब्रह्मचानें फार प्राचीन काळचा जो इतिहास दिव्यध्वनिद्वारा सागितला तोच इतिहास त्याच्या समवसरणातील मुख्य गणधर वृषभसेन यानीं अर्थरूपानें ( तत्कालीन भाषेंत ) लोकास निवेदन केला. त्यानंतर

---

१ टीप स्वयभूच्या मुखापासून निघालेली भाषा ज्या त्या श्रोत्यास आपापल्या भाषेसारखी ऐकावयास मिळणें हा त्याचा इत्यर्थ होय व अशा प्रकारचा अतिशय या भाषेंत आहे म्हणूनच स्वयभूच्या वाणीस **दिव्यध्वनि** असें नाव आहे

वृषभसेनगणधरानें स्वयंभूची वाणी अवधारण करून तदर्थ बोधक अशा पुराण ग्रंथाची रचना केली. त्याचप्रमाणें बाकीच्या सर्व तीर्थकरांनीं व त्यांच्या गणधरांनीं ६३ महापुरुषांचें चरित्र सांगितलें. त्यानंतर चतुर्थ युगाच्या शेवटीं सिद्धार्थ राजाचा पुत्र भगवान् महावीर तीर्थंकर हा विपुलाचल नामक पर्वतावर एकेवेळीं आला असतां त्यास श्रेणिक राजानें ६३ पुण्यपुरुषाचीं चरित्रें सांगण्याची विनंति केली.

तेव्हा श्रेणिकावर स्वामींचा अनुग्रह झालेला आहे असें जाणून गौतम गणधरांनीं वृषभनाथ तीर्थंकरापासून क्रमाक्रमानें महावीर तीर्थंकरापर्यंत सर्व तीर्थंकर व गणधर याच्या द्वारा चालत आलेल्या या पुण्यपुरुषाचीं चरित्रें श्रेणिक राजास सांगितलीं. महर्षि गौतमांनीं तींच चरित्रें सुधर्मस्वामीस सांगितलीं. तीं तशींच सुधर्मांनीं जंबूस्वामीस सांगितलीं. जंबूस्वामीपासून अविच्छिन्न अशा गुरुपरंपरेनें आलेलें हें पुराण आम्हीं यथाशक्ति प्रकाशित करितों.

पुराणाचें प्रतिमुख होय. या प्रतिमुखात कथेचा संबंध सुचविला आहे. या महापुराणांत सांगितलेली ही कथा सर्वस्वी सत्य आहे असें सिद्ध करण्यास उपयोगी पडावें ह्मणून हें प्रतिमुख आह्मी आरंभीं वर्णिलें आहे

हें पुराण गौतमगणधर वगैरे ऋषींनीं सांगितलें आहे, यावरून हें सत्य मानण्यास योग्य आहे. आचार्य ह्मणतातः—

इदं पुण्यमिदं पूतमिदं मांगल्यमुत्तमम् ।
इदमायुष्यमग्र्यं च यशस्यं स्वर्ग्यमेवच ॥
इदमर्चयतां शान्तिस्तुष्टिः पुष्टिश्च पृच्छताम् ।
पठतां क्षेममारोग्यं शृण्वतां कर्म निर्जरा ॥

# पर्व २ रें.

## कथेचा उपोद्घातविस्तार.

त्रिजगद्गुरु आदिब्रह्मयास नमस्कार करून आचार्य त्याच्या पुराणाच्या उपोद्घाताचा विस्तार सांगतात.

महावीर तीर्थंकराच्या समवसरण सभेंत श्रेणिक राजा गौतम गणधरास ह्मणाला "हे भगवन्, स्वयंभूच्या दिव्यध्वनिद्वारें ऐकलेलें सर्व पुराण सविस्तर ऐकून पुनीत व्हावें अशी माझी इच्छा आहे. प्रभो, अहाहा! धन्य !! धन्य !!! या तुझ्या पुण्याश्रमांत हत्तीण सिंहाच्या बालकांस दूध पाजवीत आहे; आणि हत्तीचे छावे सिंहिणींचें व गायींचें स्तनपान करित आहेत! असा महिमा अन्यत्र कोठेंहि नाहीं. हे जिनेश्वरा, मीं पूर्वी अज्ञानामुळें वाईट आचरण करून फार मोठें पातक केलें आहे. त्या पापाच्या क्षालनार्थ मला महापुरुषांची कथा मुळापासून सांग." श्रेणिकराजाचा हा प्रश्न ऐकून समवसरणातील दिगंबर मुनी श्रेणिकाची अत्यंत प्रशंसा करून ह्मणाले, "श्रेणिका, आतां तू विचारलेलाच प्रश्न पूर्वी चतुर्थ युगाच्या आरंभीं श्रीवृषभनाथ तीर्थंकरास भरतचक्रवर्तीनें विचारला होता. त्यानंतर अजित तीर्थंकरास सगरचक्रवर्तीनें

करून ह्मणाले, "हे गणधरा, तूं भव्यजनाला मोक्षमार्गाला नेणारा आहेस. तूं बुद्ध आहेस. तूं श्रुतकेवली आहेस. करितां हे देवा, राजर्षि अशा श्रेणिकासह आह्मा सर्व श्रोतृवृंदावर ६३ महापुरुषांचें पुराण सांगण्याचा अनुग्रह कर." याप्रमाणें भगवान् गौतमाची अत्यंत प्रशंसा करून, पुराण ऐकण्याकरितां एकचित्त होऊन तो मुनिसमाज तटस्थ राहिला असतांना, भगवान गौतम गणधर हे अत्यंत गंभीर, अस्खलित व मधुर वाणीनें पुढें लिहिल्या प्रमाणें बोलूं लागले, "हे श्रेणिका, पुर्वी चतुर्थ युगाच्या आरंभीं आदितीर्थंकरानीं भरतराजास जें पुराण सांगितलें तेंच पुराण मी तुला सांगतों. श्रुतस्कंधाचे चार मोठे अधिकार वर्णिलें आहेत. त्यांना अनुयोग अशी संज्ञा आहे. त्या पैकीं तीर्थंकर वगैरे महापुरुषांचें जें पुराण तो हा पहिला अनुयोग होय. **प्रथमानुयोग** ह्मणजे महापुरुषांचें चरित्र ज्यांत वर्णिलें आहे तो अथवा प्रथम ह्मणजे अव्युत्पन्न लोक व त्यांच्या करितां जो अनुयोग तो प्रथमानुयोग होय.

तस्कंधाच्या दुसऱ्या अधिकारास करणानुयोग ह्मणतात. त्यांत तीन लोक, भरत, विदेह, भोगभूमि वगैरे क्षेत्रें यांचीं संख्या व स्वरूप सांगितलें आहे. तिसऱ्या अधिकारास चरणानुयोग ह्मणतात. त्यांत अत्यंत शुद्ध असा ‐‐र वर्णिला आहे. व चवथा अधिकार द्रव्यानुयोग आपापल्या त्यांत जीवादिक द्रव्यांचें, सप्ततत्वांचें वगैरे विवेचन प्रकारचा अतिरि‐‐श्रुतस्कंधाच्या चारी अनुयोगांत हा ( महा‐ असें नांव आहे

पुरुषांचें चरित्र ज्यांत वर्णिलें आहे तो ) पहिला आहे म्हणून यास **प्रथमानुयोग** अशी अन्वर्थ संज्ञा आहे. यांत तीर्थंकर, चक्रवर्ती, इंद्र, बलदेव व केशव यांची संपत्ति व मुनीश्वरांची ऋद्धि हीं जीवांस कशानें प्राप्त होतात हें सांगितलें आहे. तसेंच संसारीजीव, मुक्तजीव, बंध, मोक्ष, बंधमोक्षाचें कारण, सहा द्रव्यें व नऊ पदार्थ या सर्वांचें स्वरूप यांत दाखविलें आहे. तसेंच जगाची उत्पत्ति व नाश कोणत्या प्रकारानें होतो याचेंहि यांत वर्णन केलें आहे. धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारी पुरुषार्थांचा जितका विस्तार आहे तितका सर्व या पुराणांत सांगितला आहे. याप्रमाणें महापुरुषांच्या चरित्रांचा व महत्पदार्थांचा संग्रह यांत केला आहे म्हणून यास 'महापुराण' असें नांव प्राप्त झालें आहे. यांत वर्णिलेल्या महापुरुषांची संख्या ६३ आहे म्हणून ऋषींनीं या पुराणाचे ६३ अधिकार सांगितले आहेत. तीर्थंकराच्या पुराणांतच चक्रवर्ती, बलदेव वगैरे महापुरुषांच्या चरित्रांचा संग्रह केलेला असतो म्हणून कित्येकांनीं २४ पुराणें मानिलीं आहेत. पुराण पहिलें वृषभनाथाचें, २ रें अजितनाथाचें, ३ रें संभवनाथाचें, ४ थें अभिनंदनाचें, ५ वें सुमतीचें, ६ वें पद्मप्रभाचें, ७ वें सुपार्श्वाचें, ८ वें चंद्रप्रभाचें, ९ वें पुष्पदंताचें, १० वें शीतलनाथाचें, ११ वें श्रेयान् तीर्थंकराचें, १२ वें वासुपूज्याचें, १३ वें विमलनाथाचें, १४ वें अनंताचें, १५ वें धर्मनाथाचें, १६ वें शांतिनाथाचें, १७ वें कुंथूचें, १८ वें अरपरमेश्वराचें, १९ वें मल्लिजिनाचें, २० वें

मुनिसुव्रताचें, २१ वें नमिनाथाचें, २२ वें नेमिनाथाचें, २३ वें पार्श्वनाथाचें, २४ वें महावीराचें ( वर्धमान, सन्मति ), अशा क्रमानें २४ पुराणें आहेत. हे या महापुराणाचे अर्थाधिकार होत. या चोवीस पुराणांस महापुराण असें मुख्य नांव आहे." पुढें गौतम गणधर ह्मणतात, "आमचा गुरुबंधु श्रुतकेवली सुधर्मास्वामी माझ्यानंतर हें पुराण माझ्याप्रमाणेंच संपूर्णपणें सांगेल. नंतर या भरतक्षेत्रातलें पंचमकालांतील शेवटचे केवलज्ञानी जंबूस्वामी हें पुराण प्रकाशित करतील. संपूर्णपणें श्रुतज्ञानाचे धारक असे १ आह्मी ( गौतम ) २ सुधर्म व ३ जंबूस्वामी एकामागूनएक अशा क्रमानें केवल ज्ञानी होउं व मोक्षास जाऊं. भगवान् महावीर तीर्थंकराच्या मोक्षानंतर ६२ वर्षांत आह्मी तिघेजण होऊन जाऊं.

मुनिसुव्रताचें, २१ वें नमिनाथाचें, २२ वें नेमिनाथाचें, २३ वें पार्श्वनाथाचें, २४ वें महावीराचें ( वर्धमान, सन्मति ). अशा क्रमानें २४ पुराणें आहेत. हे या महापुराणाचे अर्थाधिकार होत. या चोवीस पुराणांस महापुराण असें मुख्य नांव आहे. " पुढें गौतम गणधर ह्मणतात, " आमचा गुरुबंधु श्रुतकेवली सुधर्मास्वामी माझ्यानंतर हें पुराण माझ्याप्रमाणेंच संपूर्णपणें सांगेल. नंतर या भरतक्षेत्रांतलें पंचमकालांतील शेवटचे केवलज्ञानी जंबूस्वामी हें पुराण प्रकाशित करतील. संपूर्णपणें श्रुतज्ञानाचे धारक असे १ आह्मी ( गौतम ) २ सुधर्म व ३ जंबूस्वामी एकामागूनएक अशा क्रमानें केवल ज्ञानी होऊं व मोक्षास जाऊं. भगवान् महावीर तीर्थंकराच्या मोक्षानंतर ६२ वर्षांत आह्मी तिघेजण होऊन जाऊं.

त्यानंतर क्रमानें १ विष्णुमुनि, २ नंदिमित्र, ३ अपराजित, ४ गोवर्धन, ५ व भद्रबाहु हे पांच आचार्य चवदापूर्व शास्त्राचे पारंगत होऊन हें पुराण संपूर्णपणें प्रकाशित करतील. या पांच आचार्यांचीं मिळून १०० वर्षें लोटल्यावर पुढें १८३ वर्षांत क्रमानें १ विशाखाचार्य, २ प्रोष्ठिलाचार्य, ३ क्षत्रियाचार्य, ४ जयाचार्य, ५ नागसेनाचार्य, ६ सिद्धार्थाचार्य, ७ धृतिषेणाचार्य, ८ विजयाचार्य, ९ बुद्धिमान् आचार्य, १० गंगदेव व ११ धर्मसेन हे अकरा आचार्य दहा पूर्व शास्त्राचे पाठी होतील. ते हें पुराण

विशाखादि अकरा आचार्यांची १८३ वर्षे लोटल्या नंतर २२० वर्षेपर्यंत १ नक्षत्राचार्य, २ जयपालाचार्य, ३ पांडु, ४ ध्रुवसेन, व ५ कंसाचार्य हे अकरा अंगशास्त्राचे पारंगत असे मुनीश्वर होतील. नक्षत्राचार्य प्रभृति पांच आचार्यांच्या वेळीं हें पुराण तीनचतुर्थांश प्रमाणानें प्रसिद्ध होऊन राहील. कारण, त्या वेळेस कालदोषामुळें मानवांची बुद्धि कमी झाल्यामुळें संपूर्ण पुराण लक्षांत राहणार नाहीं. एकादशांग शास्त्र जाणणाऱ्या नक्षत्राचार्यादि पांच आचार्यांचीं २२० वर्षे लोटल्यावर पुढें ११८ वर्षांत १ सुभद्र, २ यशोभद्र, ३ भद्रबाहु, व ४ लोहाचार्य हे चार आचार्य एक अंगशास्त्राचे पाठी होतील. व ते पुराणाचा चवथा भाग प्रकाशित करतील. त्यानंतर पुढें हें पुराण मानवांच्या अल्पबुद्धिमुळें फारच थोड्या लोकांच्या लक्षांत राहिल. तथापि त्याकाळीं सुद्धां ज्ञानसंपन्न अशा गुरुपरंपरेनें ऐकत आलेलें जिनसेन प्रभृति कवीश्रेष्ठ हें पुराण ज्या ज्या वेळेस जितकें ऐकतील तेवढें सर्व लक्षांत ठेवून यथावत् प्रकाशित करण्यास समर्थ होतील. उपरिनिर्दिष्ट गुरुपरंपरेनें चालत आलेलें व आरंभीं सर्वज्ञ महावीरतीर्थंकरांनीं उपदेशिलेलें ह्मणून हें पुराण प्रथम प्रमाण होय. करितां हे श्रेणिका, हें पुराण भव्यजीवांनीं पुन्हा पुन्हां ऐकावें व याचें मनन करावें. ह्मणजे क्रमानें मोक्षप्राप्ति होणारच.

या पुराणांत प्रथम आदितीर्थंकराच्या पुराणाच्या संग्रहांतील कारिका सांगितल्या आहेत.

जो काल त्याचा अंश. या समयापासूनच लव, पळें, घटिका, दिवस, महिना, वर्ष, पल्य व सागर इत्यादिक कालाचें परिमापन होतें. ह्मणून काल हा अनंतसमय असून त्याचें भ्रमण ही अनंत आहे. कालाचे उत्सर्पिणी व अवसर्पिणी असे दोन भेद आहेत. उत्सर्पिणी कालांत मनुष्यांचें बळ, बुद्धि, आयुष्य, देह, व आकार हीं वाढत्या प्रमाणानें असतात; व अवसर्पिणी कालांत तीं दिवसेंदिवस कमी होत जातात. हल्लीं या आमच्या भरत-क्षेत्रांत अवसर्पिणीचा पंचम काल आहे. हे दोन्ही काल मिळून एक कल्प होतो. वर जे दोन काल सांगितले आहेत त्यांतील प्रत्येकाचे सहा विभाग आहेत. त्यांचीं नांवें:– १ सुषमासुषमा, २ सुषमा, ३ सुषमादुःषमा, ४ दुःषमासुषमा, ५ दुःषमा, ६ अतिदुःषमा. असे हे सहा भेद अवसर्पिणी कालाचे आहेत. आतां, याच्या उलट प्रकारानें गणिले ह्मणजे उत्सर्पिणी कालाचे सहा भेद समजतात. ते असेः– १ अतिदुःषमा, २ दुःषमा, ३ दुःषमसुषमा, ४ सुषमदुःषमा, ५ सुषमा व ६ सुषमासुषमा. कालाचा जो विभाग त्यास 'समा' असें नांव आहे. व सु ह्मणजे चांगला व दुः ह्मणजे वाईट. तेव्हां 'समा' शब्दास सु व दुः हे उपसर्ग जोडले ह्मणजे सुषमा (चांगला विभाग) व दुः (वाईट विभाग) अशीं नांवें शब्दांच्या अर्थास अनुसरून प्राप्त झालीं आहेत. कालचक्राच्या परि-भ्रमणानें वरील सहा समा ( विभाग ) फिरतात तेणेंकरून उत्स-र्पिणी व अवसर्पिणी हे दोन्ही काळ शुक्लकृष्णपक्षाप्रमाणें एका-मागून एक येतात व जातात.

पूर्वी या अवसर्पिणी कालांत भरत क्षेत्रांतील मध्यम खंडांत अवसर्पिणी कालाचा पहिला विभाग जो ' सुषमासुषमा ' झाला त्याची मर्यादा सागरोपम कोटीच्या संख्येनें चार कोटी वर्षांची असते. तात्कालीन स्थितीचें वर्णन खाली संक्षेपानें केलें आहे. " निषध पर्वत व नीलपर्वत या दोहोंच्या मध्यें आणि पूर्वसमुद्र व पश्चिमसमुद्र या दोन समुद्रांच्या मध्यें विदेहक्षेत्र आहे. त्याचे चार भाग आहेत. मेरु पर्वतापासून पूर्वेस जें क्षेत्र आहे तो पूर्व विदेह. मेरुच्या पश्चिमेस अपर ( पश्चिम ) विदेह. मेरूच्या दक्षिणेस जीं पांच क्षेत्रें आहेत त्यांचीं नांवें देवकुरु व मेरूच्या उत्तरेस असलेल्या क्षेत्रांचीं नांवें उत्तरकुरु अशीं आहेत. त्या ठिकाणीं जिनधर्माचा नाश केव्हांही होत नाहीं. तेथें निरंतर धर्मप्रवृत्ति असते. तेथील स्थिती विदेही ( देहरहित, किंवा सिद्ध ) होण्याला अत्यंत अनुकूल असल्यामुळें त्या क्षेत्राला विदेह अशी संज्ञा आहे. त्यांत देवकुरु व उत्तरकुरु ह्मणून जीं क्षेत्रें आहेत तेथील स्थिति जशी आहे त्यासारखी स्थिति अवसर्पिणी कालाच्या पहिल्या भागांत ( सुषमासुषमा ) ह्मणजे युगाच्या आरंभीं या भरतक्षेत्रांत होऊन गेली. ती अशी. त्या काळीं मनुष्याचें आयुष्य तीनपल्योपम वर्षांचें असतें. व मनुष्याच्या देहाची उंची सहा हजार धनुष्यांच्या उंची इतकी असते. तात्कालीन मनुष्यांचे अस्थिबंध वज्राप्रमाणें बळकट असून मुकुट, कुंडल व यज्ञोपवीत वगैरे अलंकार त्यांच्या अंगावर नित्य असतात. त्यांना तीन दिवसांनीं भोजनाची इच्छा होते. तेव्हां ते बोरीच्या फळाइतकें दिव्य अन्न

## पर्व ४ थें.

### श्रीमहाबलाभ्युदयवर्णन.

**गौतम गणधर श्रेणिक राजास** ह्मणतातः—

आतां प्रथम पुराणाची पीठिका स्थापन करून नंतर **श्री वृषभतीर्थंकराचें** चरित्र सांगतों.

### सृष्टिकर्तृत्वमीमांसा.

अनेक प्रकारचे जीव वगैरे पदार्थ जेथें राहतात त्या ठिकाणास '**लोक**'[1] अशी संज्ञा आहे. यास 'क्षेत्र' असेंही नांव आहे. लोक ह्मणजे जग. याचा कर्ता कोणीही नाहीं. हें स्वभावानेंच उत्पन्न झालेलें आहे. यांत जीव वगैरे पदार्थ भरलेले आहेत. याचा कधींही नाश होत नाहीं. हें अनत आकाशाच्या पोकळींत राहिलें आहे. कांहीं लोक या जगाचा ईश्वर ह्मणून कोणीएक कर्ता आहे असें ह्मणतात. पण तें चुकीचें आहे. कारण सृष्टिकर्ता ह्मटला ह्मणजे तो सृष्टीच्या बाहेर कोठें तरी असला पाहिजे. यावरून तो सृष्टीच्या बाहेर असेल असें म्हणावें तर तो कोठें राहून हें जग उत्पन्न करितो? त्याला कोणाचाही आश्रय नसून तो पदार्थ समुदायांत राहून हें जग उत्पन्न करितो असें म्हणावें तर उत्पन्न केलेलें जग कोठें ठेवितो? याप्रमाणें दूषणें येतात. ईश्वर जर एक आहे तर त्याच्या एकट्याच्या हातून हें जग उत्पन्न होणें शक्य नाहीं. तसेंच ईश्वर निराकार आहे असें कांहींचें म्हणणें आहे; पण निराकार ईश्वरापासून हें साकार जग कसें उत्पन्न होईल? सृष्टि उत्पन्न

---

१ **लोकः**—लोक्यन्ते जीवादयः यस्मिन् स लोकः ।

करण्यास तिला लागणारी सामुग्री अगोदर असली पाहिजे. ती जर सृष्टीच्या पूर्वी नाहीं तर ईश्वरानें सृष्टि केली कशी ? प्रथम साधनें उत्पन्न करून नंतर केली असें म्हणावें तर सामुग्री उत्पन्न करण्यास दुसरी सामुग्री पाहिजे; तिच्या उत्पत्तीस तिसरी पाहिजे; याप्रमाणें अनवस्था दोष येतो. सामुग्री स्वतः सिद्धच आहे असें जर तुमचें म्हणणें असेल, तर जग देखील स्वतः सिद्धच आहे असें म्हणण्यास काय हरकत आहे ? सृष्टिकर्ता ईश्वर स्वत' सिद्ध मानतां तर त्याच्याबरोबर हें जगही स्वतः सिद्धच आहे असें कबूल करणें भाग पडतें. जर ईश्वर साधनावांचून केवळ इच्छेनेंच हें जग निर्माण करितो असें म्हणाल तर प्रथम ईश्वर कृतार्थ आहे की अकृतार्थ आहे हें सांगा. जर तो कृतार्थ असेल तर त्यास सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा होणार नाहीं. जर अकृतार्थ असेल तर त्यास हें जग उत्पन्न करितां येणार नाहीं. कारण जग उत्पन्न करण्याचें चातुर्य कृतार्थामध्येंच असूं शकतें. तुम्ही ईश्वरास सर्वव्यापक, निष्क्रिय व अमूर्त असें मानतां ना ? मग अशा प्रकारचा ईश्वर हें जग कसें उत्पन्न करूं शकेल ? ईश्वर निर्विकार आहे तर त्यास जग निर्माण करण्याचा इच्छारूप विकार होणें शक्य नाहीं. ईश्वर सिद्ध आहे, असें जर मानतां तर त्यास सृष्टि उत्पन्न करण्यात फळ कोणतें? सृष्टि निर्माण करणें ही एक लीला आहे असें ह्मणाल तर त्यापासून ईश्वरामध्यें अज्ञानपरपरा सिद्ध होते. कारण अज्ञ जीवाच्या ठायींच क्रीडा सभवते. ईश्वर पूर्वकर्माच्या अनुरोधानें त्या त्या जीवास उत्पन्न करितो असें ह्मणाल तर ईश्वराकडे पारतन्त्र्य येतें.

उलट तुह्मी तरि ईश्वर स्वतंत्र ह्मणता. जग हें अनादि असून त्या त्या जीवाच्या कर्मानुरूप तें उत्पन्न होतें, ईश्वर फक्त निमित्त-मात्र आहे असें जर तुमचें ह्मणणें असेल तर कर्मानेंच सिद्ध झालेलें हें जग ईश्वरानें निर्माण केलें असें का ह्मणता ? जर ईश्वर मुक्त आहे असें ह्मणावें तर तो उदासीन अर्थात् प्रवृत्ति निवृत्ति शून्य असा असला पाहिजे. मग तो सृष्टि करण्याचा यत्नच करणार नाहीं. जर ससारी ह्मणावें तर ही सृष्टि कर-ण्याचें सामर्थ्य त्यास असू शकणार नाहीं हें उघड आहे ईश्वर जर सृष्टि उत्पन्न करितो तर तिचा नाश तो का करितो ? जर नाश तोच करीत असेल तर ' विषवृक्षोऽपि सवर्ध्य स्वय छेत्तुम साप्रतम् । ' या न्यायानें तो अधर्मी ठरतो. कोणी तरी बुद्धिमान असा कर्ता असल्याशिवाय एवढी प्रचड सृष्टि होणें शक्य नाहीं असें ह्मणालें तर एवढ्यावरूनच ती ईश्वरानें निर्माण केली असें

रितां येत नाहीं; व याचा नाशही कोणाच्यानें होऊं शकत नाहीं. तर याची स्थिति स्वभावानेंच नियत झालेली आहे.

या जगाचे **अधोलोक, तिर्यग्लोक** व **उर्ध्वलोक** असे तीन भेद आहेत. अधोलोकाचा आकार वेताच्या खुर्चीप्रमाणें आहे. मध्यलोकाचा आकार झल्लरी ( झांजे ) प्रमाणें आहे, व उर्ध्वलोकाचा आकार मृदंगाप्रमाणें आहे. पाय पसरून कमरेवर हात टेंकून उभा राहिलेला पुरुष जसा दिसावा तसा हा लोक (जग) दिसतो. आकाशाच्या मध्यभागाचा आश्रय करून असणारा हा लोक घनोदधि, घनवात व तनुवात अशा तीन प्रकारच्या वायूंनीं वेष्टिलेला आहे. मध्यलोकाचा विस्तार एक रज्जु प्रमाणाचा आहे. अधोमध्यउर्ध्वलोक मिळून सर्व लोक १४ रज्जु उंचीचा आहे. या मध्यम लोकाच्या मध्यभागीं **जंबूद्वीप** आहे. जंबूद्वीपाच्या मध्यभागीं मेरुपर्वत आहे. जंबूद्वीप उत्तम गोलाकार असून त्याच्या भोंवतीं लवणोद नांवाचा समुद्र आहे. हा जंबूद्वीप १ भरत, २ हैमवत, ३ हरि, ४ विदेह, ५ रम्यक, ६ हैरण्यवत व ७ ऐरावत अशीं सात क्षेत्रें, १ हिमवान्, २ महाहिमवान्, ३ निषध, ४ नील, ५ रुक्मि व ६ शिखरीपर्वत असे सहा कुलपर्वत आणि १ गंगा, २ सिंधु, ३ रोहितास्या, ४ रोहित्, ५ हरिकांता, ६ हरित्, ७ सीतोदा, ८ सीता, ९ नरकांता, १० नारी, ११ रुप्यकूला, १२ सुवर्णकूला, १३ रक्तोदा व १४ रक्ता अशा १४ नद्या यांहींकरून विभागला गेला आहे. (सात क्षेत्रें, सहा कुलपर्वत व चौदा नद्या यांचें सविस्तर वर्णन महापुराणांतून जिज्ञासू वाचकांनीं अवश्य पहावें..)

या जंबूद्वीपात मेरूच्या पश्चिमेस अपरविदेह नांवाचें एक क्षेत्र असून तेथें गंधिल नांवाचा एक मोठा देश आहे. तेथें सर्वदां मुनिजन कर्मांचा संपूर्णपणें नाश करून मुक्त होतात म्हणून त्या क्षेत्रास ' विदेह ' अशी संज्ञा आहे. त्या गंधिल देशांतील प्रजेस अवश्यक असे सुखोपभोगाचे पदार्थ अनायासें मिळत असल्यामुळें ती नेहमी आनंदांत असते. याप्रमाणें सपत्तीनें सुशोभित व सुखदायक अशा गंधिल देशाच्या मध्यभागीं **विजयार्द्ध** या नावाचा एक मोठा पर्वत आहे. तो रुप्यासारखा आहे. या विजयार्द्ध पर्वताच्या उत्तरश्रेणीवर *अलका या नांवाची उत्तम नगरी आहे. या अलका नगरीचा* अधिपति **अतिवल** या नावाचा एक विद्याधरांचा नीतिपरायण राजा होता. त्याच्या राणीचें नांव **मनोहरा** असें होतें. या दांपत्त्यास **महाबळ** या नांवाचा एक पुत्र होता. तो आपल्या गुरूजवळ चार प्रकारच्या राजविद्या शिकून त्यात मोठा निष्णात झाला. पुत्राच्या अंगचे अनेक सद्गुण पाहून राजानें त्याला युवराजपद दिलें. एके दिवशीं अतिवल राजास वैराग्य उत्पन्न झालें. त्यावेळीं तो मनांत विचार करू लागला की, " तारुण्य हें क्षणभंगुर आहे. हे विषयोपभोग कितीही सेविले तरी तृप्ति म्हणून नाहींच. शरीर हें नाशवत आहे. बधुजन हे मोहपाशांत बांधून टाकणारे बंधनच आहेत. धन हें दु ख देणारें आहे. व पंचेंद्रिय विषय हे विप-

**टीपः**— १ जबू नावाचा वृक्ष या द्वीपात आहे म्हणून याचें नाव जबूद्वीप. पित्याच्या आज्ञेनें राज्य चालविणें यास युवराजपद म्हणतात.

मिश्रित अन्नाप्रमाणें विषम आहेत. लक्ष्मी अत्यंत चंचल आहे. सारांश, या संसारांत सर्व अस्थिर आहे. याकरितां राज्य सोडून द्यावें हें बरें." याप्रमाणें विचार करून अतिबल राजानें आपल्या पुत्रास सर्व राज्य दिलें व त्यानें स्वतः पुष्कळ विद्याधरांसह दीक्षा घेतली. व दिगंबररूप धारण करून त्यानें फार दिवस तपश्चरण केलें. इकडे महाबळ राजा अत्यंत दक्षतेनें, न्यायानें व दयाळुपणानें राज्यशकट हाकूं लागला. महाबळराजाचे महामति, संभिन्नमति, शतमति व स्वयंबुद्ध या नांवाचे अत्यंत बुद्धिमान्, विवेकी व दूरदर्शी असे चार मंत्री होते. त्या चौघांमध्यें स्वयंबुद्ध मंत्री सम्यग्दृष्टी होता,. व बाकी तिघे मिथ्यादृष्टी होते. तथापि ते सर्व स्वामीच्या हिताविषयीं झटणारे असे होते. त्या कर्तव्यदक्ष मंत्र्यांवर राज्यभार टाकून त्या महाबळ विद्याधरानें अनेक प्रकारचे भोगविलास आपल्या स्त्रियांबरोबर पुष्कळ कालपर्यंत भोगिले.

---

# पर्व ५ वें.

## ललितांगस्वर्गभोगवर्णन.

नंतर एके दिवशीं त्या महाबल राजाच्या वाढदिवसाचा उत्सव होता. त्यावेळीं त्यानें मोठी टोलेजंग अशी सभा भरविली होती. महाबल विद्याधर राजसिंहासनावर विराजमान झाले होते व मंत्री, कारभारी, सेनापति, पुरोहित, प्रतिष्ठित नागरीक व इतर अधिकारी हे सगळे त्या सभेच्या ठिकाणीं राजाच्या सिंहासना-

भोंवतीं आपापल्या दर्जाप्रमाणें बसले होते. त्यावेळीं **स्वयंबुद्ध** मंत्री अत्यंत गंभीर वाणीनें म्हणाला, " हे विद्याधराधीश, मी तुम्हाला स्वर्ग व क्रमानें मोक्ष ही जेणेंकरून प्राप्त होतील असें कांहीं सांगतों. पूर्वजन्मींच्या पुण्यानेंच आपण विद्याधर झाला आहात. धर्मापासून अर्थ, काम व मोक्ष हीं प्राप्त होतात. धर्मा-शिवाय कोणतीहि सुखसंपत्ति प्राप्त व्हावयाची नाहीं. म्हणून मी त्याचें विशेष स्वरूप सांगतों.—

**दयामूलो भवेद्धर्मो दयाप्राण्यनुकम्पनम् ।**
**दयायाः परिरक्षार्थं गुणाः शेषाः प्रकीर्तिताः ॥**

अर्थः—दया हें धर्माचें मूळ आहे. म्हणजे सर्व जीवांवर दया करणें यालाच धर्म म्हणतात. प्राणीमात्रांवर अनुकंपा करणें याचें नाव दया. दयेच्या रक्षणाकरिताच इतर सगळे गुण (चा-रित्र पाळणें, क्षमाभाव धारण करणें वगैरे) सांगितले आहेत. तसेंच इंद्रियदमन करणें, क्षमाभाव धरणें, हिंसा न करणें, तप करणें, दान देणें, शील पाळणें, ध्यान धरणें व संसारसुखापा-सून विरक्त होणें ही सर्व त्या अहिंसाधर्माचींच चिन्हें होत. जीव-हिंसा न करणें, सत्य भाषण करणें, चोरी न करणें, स्त्रीसंग सो-डणें व परिग्रहरहित असणें अशा स्वरूपाचा हा सनातन धर्म आहे; म्हणून हे महाभागा! या अहिंसाधर्माच्या ठिकाणीं आ-पली बुद्धि स्थिर करून शक्तीप्रमाणें या धर्माचें आचरणही कर."
याप्रमाणें धर्मपर असें भाषण करून तो **स्वयंबुद्ध** मंत्री आपल्या ठिकाणीं बसला. नंतर बाकींच्या तीन मिथ्यादृष्टि मंत्र्यांपैकीं म-हामति मंत्री म्हणाला, " अहो, आत्माच जर नाहीं तर धर्माचें

फळ कशानें व कोणास होणार ? देहापासून जीव भिन्न आहे असें जें तुम्हां जैनांचें मत आहे तें चुकीचें आहे. तसेंच परलोक नाहीं. जीव नित्य नसून देह नाश होण्याबरोबर तोही नाश पावतो. म्हणून प्रत्यक्ष अनुभवास येणारे भोग सोडून परलोकच्या सुखाची इच्छा करणें मूर्खपणाचें आहे." याप्रमाणें भूतवादाचा ( भौतिक ) आश्रय करून लौकायतिक मताची प्रशंसा करून महामति मंत्र्यानें आपलें भाषण संपविलें. नंतर संभिन्नमंत्र्यानें विज्ञानाचा आश्रय करून जीव नाहीं असें प्रतिपादन केलें. नंतर शतमति मंत्री नैरात्म्यवादाचा आश्रय करून म्हणाला, ' जग हेंच जर शून्य आहे तर मग जीव कोठला आणि परलोक तरी कोठला ? म्हणून परलोक भोगाची इच्छा करणें मृगजलवत् आहे." मिथ्यादृष्टि मंत्र्यांचीं हीं मतें ऐकून स्वयंबुद्ध मंत्री पुनः बोलूं लागला. तो म्हणालाः—

" हे भूतवादिन्, तूं आत्माच नाहीं असें जें म्हणतोस तें खोटें आहे. चैतन्य हें भूतांहून[1] अगदीं निराळें आहे. चैतन्य हें शरीररूपी नाहीं व शरीरही चैतन्यरूपी नाहीं. कारण ज्ञानात्मक असणारें चैतन्य व अज्ञानात्मक असणारें शरीर या दोहोंचे धर्म एकमेकांविरुद्ध आहेत. शरीर हें आधार व आत्मा हा आधेय असल्यामुळें ते परस्पर भिन्न आहेत. शरीर हें सावयव आहे, व चैतन्य म्हणजे विज्ञान तोच आत्मा हा निरवयव आहे. म्हणून सावयव व निरवयव या दोहोंचा भेद मानिला पाहिजे. तसेंच, जीव हा क्षणिक नाहीं. भूत, वर्तमान व भविष्यत् या

१ टीप—पृथ्वी, जल, अग्नि व वायु यांस 'भूतें' असें नांव आहे.

तिन्ही कालीं निरनिराळ्या जातींच्या भिन्न भिन्न देहांत जीव एकच आहे. कारण, मागील पर्यायाचें स्मरण वर्तमान देहीं कित्येकांना असतें. जर जीव एकच नसता तर अतीत पर्यायाचें स्मरण वर्तमान देहीं कसें होईल? सबब, जीव सर्व ( भूत, वर्तमान व भविष्य ) देहीं एकच मानावा लागतो. व जीव जातो व येतो असा निश्चय होतो यावरून तिन्ही शरीरांत जीवैकत्वानुमान ( जीव एकच आहे असें अनुमान ) सिद्ध होतें. " याप्रमाणें स्वयंबुद्ध मंत्र्यानें भूतवाद्याचें व इतराच्या मतांचेंही खंडन केलें. आत्म्याच्या अस्तित्वासंबधीं शंका दूर करणारें हें स्वयंबुद्धाचें भाषण ऐकून ती सभा व महाबल राजा हे संतुष्ट झाले. नंतर स्वयंबुद्ध मंत्री त्या प्रशांत व गंभीर अशा सभेंत पुन बोलूं लागला. त्यानें आर्त, रौद्र, धर्म व शुक्ल या चार ध्यानाचें स्वरूप व फळ दृष्टान्त देऊन समजावून सांगितलें. त्यांत प्रथमचीं दोन आर्त व रौद्र हीं ध्यानें पाप उत्पन्न करणारीं म्हणून अशुभ होत, व धर्म आणि शुक्ल हीं उत्तम फल देणारीं म्हणून शुभ होत असें प्रतिपादन करून तो पुन्हां म्हणाला, " महाराज, तुमच्याच वंशांतील अरविंद नांवाचा एक विद्याधर रौद्रध्यानामुळें नरकास गेला; आणि दडविद्याधर यास आर्तध्यानामुळें तिर्यंच गति प्राप्त झाली. तसेंच आपले पणजे सहस्रबल हे धर्मध्यानामुळें क्रमानें केवलज्ञान प्राप्त करून घेऊन मोक्षास गेले, व हल्लीं आपले वडिल तपश्चरण करीत आहे. त्यानाही शुक्लध्यानामुळें निर्वाणपदाची प्राप्ति होणारच. म्हणून आपण ही यथार्थ उपदेश करणारा सर्वज्ञ वीतराग भगवान ह्याच्या उपदेशानें धर्माधर्मफलाचा

निश्चय करून जिनधर्माचें सेवन करावें." स्वयंबुद्धाचें हें भाषण ऐकून जीव, इहलोक, परलोक वगैरे आहेत; तसेंच स्वयंबुद्धानें प्रतिपादिलेलें तत्वच **अर्हत्प्रणित तत्व** होय अशी तेथें जमलेल्या सर्व लोकांची खात्री झाली. महाबल विद्याधरानेंही त्याच्या उपदेशाचा अंगीकार करून त्याचा मोठ्या संतोषानें सत्कार केला.

पुढें एके दिवशीं तो **स्वयंबुद्धमंत्री** जिनचैत्यालयांची वंदना करण्याकरितां महामेरुपर्वतावर गेला होता. तेथील अकृत्रिम व भव्य अशीं जिनालयें पाहून त्यास फार आनंद झाला स्वयंबुद्ध तेथें गेल्यावर चैत्यालयांस प्रदक्षिणा घालून व विधिपूर्वक पूजा, नमस्कार वगैरे करून क्षणपर्यंत बसला होता; इतक्यांत त्यानें पूर्वविदेह क्षेत्रांतील महाकच्छ देशांत जें अरिष्ट नांवाचें नगर आहे तेथून आलेले दोघे गगनचारण ( आकाशांत चालणारे ) मुनि अकस्मात् पाहिले. त्यांपैकीं एकाचें नांव **आदित्यगति** व दुसऱ्याचें नांव **अरिंजय.** स्वयंबुद्धमंत्र्यानें त्या मुनीश्वराजवळ जाऊन त्यांची पूजा केली; व त्यांना नमस्कार करून प्रश्न केला कीं, "हे भगवन्, आमचा महाबल विद्याधर अभव्य आहे किंवा त्याला पुढें मोक्षप्राप्ति होईल हें मला सांगा." याप्रमाणें स्वयंबुद्ध प्रश्नाचा उपन्यास करून बसला. तेव्हां **आदित्यगति** नांवाचे अवधिज्ञानी मुनीश्वर म्हणाले, "हे भव्या, महाबल हा भव्य आहे. तुझ्या उपदेशावर विश्वास ठेवील. इतकेंच नव्हे, तर तो येथून पुढें दहाव्या जन्मीं तीर्थंकरपदवी पावेल. याच जंबूद्वीपामध्यें भारतवर्षांत भविष्यत् युगाच्या आरंभीं तो भगवान् आदितीर्थ-

कर या नावानें प्रसिद्धीस येईल. **महावल** विद्याधराचें पूर्वजन्म तुला सागतो ऐक."

"या जबूद्वीपातच मेरूच्या पश्चिमेकडील विदेहक्षेत्रात जो गधिल नावाचा देश आहे त्यामध्यें असलेल्या सिंहपूर नगरात **श्रीषेण** या नावाचा राजा होऊन गेला त्याच्या स्त्रीचें नाव सुदरी असें होतें. त्या दापत्यास **जयवर्म** (महावल) या नावाचा ज्येष्ट पुत्र होता. व **श्रीवर्म** हा त्याचा कनिष्ट बधु असून तो मातापित्यास व सर्व लोकासही प्रिय झालेला होता. कारण 'प्राय प्रजात्वसाम्येऽपि क्वचित्प्रीति प्रजायते' म्हणजे प्रजा या नात्यानें सारखेपणा असला तरी आईबापाचीसुद्धा प्राय प्रीति ही एकावरच असते. पित्यानें श्रीवर्मावर प्रजेची प्रीति आहे असें जाणून त्यासच गादीवर बसविलें. या प्रकाराबद्दल जयवर्म यास फारच वाईट वाटून त्यानें स्वयप्रभ या नावाच्या गुरूजवळ जिनदीक्षा घेऊन उग्र तपश्चरण केलें. एके दिवशीं आकाशातून महीधर या नावाचा विद्याधर आपल्या लवाजम्यासह मोठ्या थाटानें जात असलेला पाहून ह्या जयवर्म मुनीनें असें निदान केलें कीं, 'महीधर विद्याधराचे सर्व सुखोपभोग मला अन्य जन्मी प्राप्त होवोत!' अशा प्रकारें तो निदान करीत आहे तोंच सर्पानें त्यास दश केला. भोगाची इच्छा धरून मरण पावल्यामुळें **जयवर्म** मुनि हा या जन्मीं **महावल** विद्याधर होऊन विद्याधरास योग्य अशा विषयसुखाचा अनुभव घेत आहे. आता हा महावल विद्याधर तुझा उपदेश ऐकून लोकरच विरक्त होईल. आजच्या रात्रीस त्या महावलानें स्वप्नात असें पाहिलें कीं, आप-

णास तिघे मंत्री ज्यांतून निघतां यावयाचें नाही अशा चिखलांत बलात्कारानें बुडवित आहेत, इतक्यांत तुझ्याकडून त्या चिखलांतून आपण वर निघालों व सिंहासनावर बसून आपणास अभिषेक झाला; तसेंच एक लखलखीत ज्वाला पेटलेली आहे व ती कमी होत होत विजेप्रमाणें चंचल झाली आहे. अशा प्रकारचीं दोन स्वप्नें त्याला पहाटेस पडलीं. तो आतां तुझ्या येण्याची वाट पहात आहे. करितां तूं जा व त्या महाबलास बोध कर. हीं दोन स्वप्नें तूंच प्रथम त्याला सांग. महाबलाला पडलेल्या दोन स्वप्नांपैकीं प्रथमचें स्वप्न त्याला पुढें प्राप्त व्हावयाच्या पुण्यैश्वर्याचें सूचक आहे व दुसरें त्याचें आयुष्य आतां फारच थोडें असल्याचें द्योतक आहे. आतां त्या महाबलाचें आयुष्य फक्त एक महिन्याचें उरलें आहे. ह्मणून तू त्याला प्रबुद्ध करून त्याच्या आत्महिताची खटपट कर." याप्रमाणें बोलून त्या स्वयंबुद्धास धर्मवृद्धि असा आशीर्वाद देऊन ते मुनिद्वय तेथून निघून गेले. स्वयंबुद्धही लौकरच नगरास परत गेला. व महाबलाला स्वप्नफलापर्यंतची चारणऋषींनें सांगितलेली सर्व हकीकत सांगून त्यानें जैनधर्माचा त्याला उपदेश केला. तो उपदेश त्याच्या मनावर ठसून त्यानें आपलें आयुष्य आतां फार थोडें राहिलें आहे असें जाणून अतिबल नांवाच्या पुत्रास गादीवर बसविलें, व सिद्धकूट जिनमंदिरास जाऊन तेथें त्यानें संन्यास ग्रहण केला. सुखदुःखांविषयीं समताभाव, व सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं मैत्री ठेवून त्यानें सर्व परिग्रहांचा त्याग केला. पंचपरमेष्ठींचें नित्य चिंतवन केलें. त्यानें मस्तकाच्या ठिकाणीं लोकश्रेष्ठ अशा

द्वास व हृदयाच्या ठिकाणीं अरहंतास स्थापन केलें. तो भव-समुद्रांतून तरून जाण्याच्या इच्छेनें ज्ञान-दर्शन-चारित्र—वीर्य ह्या चार आराधनारूपी नौकेंत बसून पैलतीरास जाण्यास प्रवृत्त झाला. याप्रमाणें बावीस दिवसपर्यंत सल्लेखनाविधि करून व परमात्मभावनेचें चिंतवन करून ह्या महाबलानें मरणसमयीं पञ्च-परमेष्ठींचें ठिकाणीं आपलें मन दृढ केलें, व देहापासून जीव भिन्न आहे अशी भावना करीत करीत त्या स्वयंबुद्धमंत्र्यासमोर प्राण सोडिला.

मरणानंतर महाबल हा **ऐशानकल्पांत श्रीप्रभ** नांवाच्या विमानामध्यें उपपादशय्येवर (जन्म घेण्याचें स्थान) **ललितांग** नावाचा देव होऊन जन्मला. तेथील सर्व विभूति व ऐश्वर्य पाहून तो क्षणपर्यंत अत्यंत आश्चर्यचकित झाला. इतक्यांत त्याला अवधिज्ञान उत्पन्न झालें. व त्यायोगानें **स्वयंबुद्धमंत्र्याच्या** हि· तोपदेशानें आपणास हें दिव्यपद प्राप्त झालें इत्यादि सर्व वृत्त त्यानें जाणिलें. नानाप्रकारच्या रत्नकिरणांनीं प्रकाशमान अशा शय्येवर सुखानें तो ललितांग देव बसला आहे इतक्यात स्वर्गा-तले देव येऊन नम्रपणानें पुढें लिहिल्याप्रमाणें त्याजपाशीं सत्कार-युक्त भाषण करूं लागले, "हे ईशा ! तू येथें विजयी होऊन नाद, तूं अभिवृद्ध हो ! हे प्रभो, मंगलस्नानाची सामुग्री तयार आहे, तरी स्नान आटोपून पुण्यबंधास कारण अशी जिनेंद्राची पूजा कर. इकडे या नाट्यशाळेंत नृत्य करणाऱ्या वारांगना पहा. हे प्रभो, सुदर वस्त्रालंकार परिधान केलेल्या या देवींचा सत्कार कर." तें ऐकून ललितांगानेंही त्याच्या विनंतीप्रमाणें तें तें सर्व कृत्य

केलें व तो देवलोकींचे अनेक भोग भोगूं लागला. **ललितांग**-देव हा देहस्थितीकरितां एक हजार वर्षांनीं एकदां मानसाहार घेत असे. १५ दिवसांनीं एकदां उच्छ्वास सोडित असे. स्वर्गांत प्रवीचार ( सुरतसौख्यानुभव ) कायिक म्हणजे मनुष्यलोकांतल्याप्रमाणें असतो. तेथील देवांच्या देहाची छाया कधीं म्लान होत नाहीं. त्यांच्या कंठांतील पुष्पहार म्लान न होतां उज्वल राहतो. ललितांगदेवास चार हजार देवी होत्या. त्यांत मुख्य चार महादेवी होत्या. याप्रमाणें त्या चार हजार स्त्रियांबरोबर स्वर्गलोकींचे दिव्यभोग अनुभवीत असतां ललितांगाचा पुष्कळ काळ लोटला. ललितांगदेव आपल्या स्वयंप्रभा देवीसह कधीं नंदनवनांनीं युक्त व जेथें मनोरम असे चंद्रकांतशिलातल आहेत अशा मंदारपर्वतावर, कधीं भोगभूमी वगैरे रम्य प्रदेशांत क्रीडा करीत सुखानें पुष्कळ कालपर्यंत उत्तम उत्तम दिव्यभोग भोगीत असे. येथें **गौतम गणधर** उपदेश करितात, " आर्यहो, ललितांगदेव अनुभवित असलेली ही सर्व दिव्य विभूति त्याला तपश्चरणाच्या प्रभावानें मिळाली आहे. म्हणून **कुरुत तपसि तृष्णां भोगतृष्णामपास्य।** म्हणजे भोगाची आशा सोडून देऊन तप करण्याची बळकट इच्छा धरा. आणि धर्मोपार्जन करा. निष्कलंक अशा जिनप्रभूची पूजाअर्चा वगैरे करा. त्याच्या वचनावर श्रद्धा ठेवा. व कुमतांचें भेदन करणाऱ्या आणि पुरुषार्थाचें समर्थन करणाऱ्या अशा जैनधर्माची सेवा करण्याचा यत्न करा म्हणजे आपोआपच सुखप्राप्ति होते. सुखाकरितां निराळी खटपट करणें नको आहे. "

# पर्व ६ वें.

## ललितांगस्वर्गच्यवनवर्णन.

याप्रमाणें तो ललितांगदेव ऐशानकल्पांत तेथील दिव्यभोग अनुभवित होता; पुढें पुष्कळ वर्षे लोटल्यावर सहा महिन्यांचें आयुष्य उरलें असतांना त्याच्या रत्नादि अलंकारांची व देहाची कांति मंद झाली व जन्मापासून त्याच्या वक्ष:स्थलावर लोंबत असलेली माळ सुकून गेली. त्याच्या राहण्याच्या ठिकाणी असलेला कल्पवृक्षही कंपायमान होऊं लागला, त्यामुळें ललितांगाला त्याचप्रमाणें ऐशानकल्पांतील इतर सर्व देवांस फार दु:ख झालें. हें पाहून सामानिक देव ( मंत्रीपुरोहितासारखे ) त्या ललितांग देवाजवळ येऊन त्यास म्हणाले, " हे धीरा, धैर्य सोडूं नको. शोक करूं नकोस; कारण या संसारचक्रांत असेतोंपर्यंत जन्मजरामरणाच्या फेऱ्यांत कोण बरें सांपडला नाही ? येथें जन्मास आलेल्या सर्व देवांस शेवटीं येथून च्युत व्हावें लागतें; आणि अशी प्रच्युति होणें सर्वसाधारण आहे. ज्याचें मरण जवळ आलें आहे अशा देवांस येथें जें दु:ख वाटतें तसें नारकीजीवांस देखील वाटत नसेल. उदय पावलेल्या सूर्याचा अस्त होणें हें जसें पूर्वी ठरलेलें असतें तद्वतच जीवास स्वर्गांत प्राप्त झालेला अभ्युदय नाहींसा होणें हें निश्चितच आहे. म्हणून हे देवा, कुयोनिचक्रांत पाडणारा शोक तूं करूं नकोस. सद्गतीकरितां जैनधर्माचे ठिकाणीं तूं आपलें लक्ष लाव. कारण, 'धर्मो हि शरणं परम.' म्हणजे धर्मच सर्व प्रकारें रक्षण करणारा आहे. " या-

प्रमाणें त्या सामानिक देवांच्या उपदेशानें धैर्य धरून ललितांगदेवानें १५ दिवसपर्यंत समस्त जिनमंदिरांची पूजा केली. नंतर अच्युतकल्पांतील समस्त जिनबिंबांची पूजा करून, आयुष्याच्या अवसान कालीं णमोकार मंत्राचें सतत ध्यान करीत तेथून तो ललितांग देव अदृश्य झाला.

या जंबूद्वीपांतील महामेरु पर्वताच्या पूर्वेकडील बाजूस जें विदेह नांवाचें क्षेत्र आहे तेथें पुष्कलावती नांवाचा एक देश असून त्यामध्यें उत्पलखेट नांवाचें नगर आहे. तेथें **वज्रबाहु** नांवाचा राजा राज्य करित असे. त्याला **वसुंधरा** नांवाची स्त्री होती. त्या उभयतांस तो **ललितांगदेव वज्रजंघ** नांवाचा पुत्र होऊन जन्मला. शत्रूरूपी सूर्यविकासीकमलांस संकुचित करणारा तो बालचंद्र प्रतिदिवशीं एकेक कलेनें वाढत चालला. त्यानें सर्व प्रकारच्या शास्त्रांमध्यें उत्तम प्रकारचें नैपुण्य संपादिलें. ललितांग देव स्वर्गांतून चवून अदृश्य झाल्यावर त्याच्या अत्यंत प्रीतींतली स्वयंप्रभा देवी त्याच्या वियोगामुळें दुःखी होऊन फार शोक करूं लागली. तेव्हां तिचा अंतःपुरांतील परिचारक दृढधर्म नामक एक देव होता. त्यानें तिला धर्म मार्गांत दृढ केलें. तिनें सहा महिनेपर्यंत जिनपूजा मोठ्या भक्तीनें केली. व शेवटीं जिनमंदिरांत पंचपरमेष्ठींचें स्मरण करीत, ती स्वयंप्रभा स्वर्गापासून च्युत होऊन एकाएकी अदृश्य झाली.

पूर्व विदेह क्षेत्रांत पुंडरीकिणी नगरींचा **वज्रदंत** नामक राजा होता. त्याच्या पट्टराणीचें नांव **लक्ष्मीमति**. त्या उभयतांच्या पाटीं स्वर्गांतून चवून आलेल्या **स्वयंप्रभेचा** जन्म झाला.

त्यांनीं तिचें नांव **श्रीमती** असें ठेविलें. ती अत्यंत लावण्यवती होती. तिनें आपल्या यौवनदशेंत चैत्रमासांतील चंद्रकलेप्रमाणें सर्व लोकांस संतुष्ट केलें. एके दिवशी रात्रौ श्रीमती आपल्या महालांत निजली असतां, इकडे त्याच नगरींत **यशोधर** मुनीस केवलज्ञान उत्पन्न झालें होतें. तेव्हा यशोधर मुनींची पूजा करण्याकरितां स्वर्गवासी देव आपापल्या विमानांत बसून तेथें आले. त्यावेळीं दुदुंभींच्या घोषानें दशदिशा व्यापून गेल्या. हा सर्व आनंदोत्सव पहाटेस चालला होता. तेव्हां त्या दुदुंभी वगैरेंचा ध्वनि ऐकून **श्रीमती** जागी झाली. त्यावेळीं देवांचें आगमन पाहून तिला पूर्वजन्माचें स्मरण झालें. व ललितांगाची ( पूर्वजन्मीचा पति ) आठवण होऊन ती वरचेवर मूर्च्छित होऊ लागली. तिच्या सखींनीं कांहीं उपाय करून तिला शुद्धीवर आणिलें, तरी पुनः ती खालीं तोंड करून बसली व मैत्रिणींनीं विचारिलेल्या कोणत्याही प्रश्नाचें उत्तर देईना. तेव्हां निरुपायामुळें त्यानीं हा सर्व वृत्तांत तिच्या आई बापास कळविला. तें ऐकून तिचे आईबाप तत्क्षणीं तेथें आले व तिची ती अवस्था पाहून शोक करूं लागले. वज्रदंत राजानें तिच्याशीं भाषण करण्याचा बराच प्रयत्न केला; परतु ती जेव्हां प्रश्नाचें काहींच उत्तर देईना तेव्हां अशी स्थिति होण्याचें कारण काय असावें हें चट्कन त्या बुद्धिमान् राजाच्या ध्यानांत आलें. व तो लक्ष्मीमतीस ह्मणाला, ' ही तुझी कन्या यौवन दशेस पावली आहे. इला जो आतां विकार झाला आहे त्यापासून कांहींच दु:ख होणार नाहीं. इच्या पूर्वजन्मीच्या कोणत्या तरी

एका अनुभवाचें अथवा संस्काराचें इला स्मरण झाल्यामुळें हिची अशी अवस्था झाली आहे. यांत भिण्याचें मुळींच कारण नाहीं.' असें बोलून कन्येजवळ **पंडिता** नावाची धात्री ठेवून 'वज्रदंत राजा आपल्या पत्नीसह तेथून निघून गेला. त्यावेळीं वज्रदंत राजास एकदम दोन कर्तव्यें उपस्थित झालीं होतीं.एक, यशोधर मुनीस केवलज्ञान झालें होतें त्यामुळें त्यांच्या दर्शनास जाणें; व दुसरें, आयुधशाळेंत चक्ररत्न उत्पन्न झालें त्यामुळें दिग्विजयाकरितां निघणें. हीं दोन्ही कर्तव्यें एकदम उपस्थित झालेलीं पाहून यांतलें प्रथम कोणतें करावें याबद्दल क्षणपर्यंत तो विचारांत पडला. तथापि धर्मकार्यच प्रथम केलें पाहिजे असा निश्चय करून त्यानें प्रथम पुण्यबंधास कारण अशी यशोधर मुनींची पूजा केली. त्या मुनीश्वराच्या पदकमलाच्या ठिकाणीं नम्र होतांच त्या राजास अवधिज्ञान झालें. कारण ' **विशुद्धपरिणामेन भक्तिः किं न फलिष्यति** । ' अर्थात् निर्मल अशा अंत.करणानें केलेल्या भक्तीचें फळ हें मिळालेंच पाहिजे. त्या अवधिज्ञानानें त्यास असें कळून आलें कीं, आपण पूर्वजन्मीं अच्युत कल्पांत इंद्र होतो. व ललितांग देवाची महादेवी **स्वयंप्रभा** ही आपली कन्या **श्रीमती** होउन जन्मली आहे. नंतर पुन एकवार मुनीस वंदन करून तो तेथून दिग्विजयाकरितां निघाला. दुसरे दिवशीं ती पंडिता ( श्रीमतीची धात्री ) श्रीमतीस ह्मणाली, "अग श्रीमते, तुझ्या आईत व माझ्यांत कांहीं भेद नाहीं. मी तुझी धात्री असून अत्यंत जिवलग सखीही आहे. करितां तुझ्या मौनाचें खरें कारण मला सांग." याप्रमाणें पं-

आतां हे भद्रे, तूं जिनेंद्रगुणसंपत्ति व श्रुतज्ञान हीं दोन व्रतें घे. **तीर्थंकरत्व** प्राप्त होण्यास जें पुण्य अवश्य आहे त्याचीं कारणें सोळा आहेत. त्यांस **षोडशकारणभावना** ह्मणतात. त्या ह्या,(१) **दर्शनविशुद्धि** (जिनभक्ति किंवा तत्वार्थश्रद्धान याला सम्यग्दर्शन ह्मणतात. तें शुद्ध ह्म० आठ अंगांनीं युक्त, आठ मदांनी रहित व सहा अनायतनें व तीन मूढता यांनीं रहित असलें पाहिजे.)(२) **विनयसंपन्नता** ( रत्नत्रय व रत्नत्रयमंडित मुनि यांच्याशीं विनयानें वागणें. ) (३) **अनतिचारशीलव्रत** ( अतिचार रहित शील व व्रतें पाळणें.) (४) **अभीक्ष्णज्ञानोपयोग** (जीवादिपदार्थांचें स्वरूप व आत्मतत्वाचें निरूपण करणारें असें जें सम्यग्ज्ञान, त्याच्या प्राप्तीकरितां सतत उद्योग करणें. ). (५) **संवेग** ( संसारदुःखास निरंतर भिऊन असणें. ) (६) **शक्तितस्त्याग** ( सत्पात्रास यथाशक्ति दान देणें किंवा चार कषायांचा त्याग करणें. ) (७) **शक्तितस्तप** ( शक्तीप्रमाणें जैनमार्गानुसार कायक्लेश करणें. ) (८) **साधुसमाधि** ( यतीजनांस कांहीं विघ्न आल्यास तें नाहींसें करणें. ) (९) **वैयावृत्त्य** ( गुणीजनांचें व व्रतधारी मुनींचें दुःख दूर करणें किंवा त्यांची शुश्रूषा करणें. ) (१०) **अर्हद्भक्ति** ( अरहंतांचा अभिषेक, पूजा वगैरे करणें. ) (११) **आचार्यभक्ति** ( आचार्यांस अपूर्व उपकरण ह्मणजे पिंछी, कमंडलु, पुस्तक वगैरे देणें, त्यांची पादपूजा वगैरे करणें.) (१२)**बहुश्रुतभक्ति** (ज्ञानी मुनींचा भक्ति करणें.)(१३)**प्रवचनभक्ति** ( रत्नत्रयाचें स्वरूप ज्यात प्रतिपादन केलें आहे अशा जिनशास्त्राची भक्ति करणें. ) (१४)**आवश्यकापरिहाणी** ( सा-

डितेनें विचारल्यावर श्रीमती लाजत लाजत मोठ्या नम्रतेनें ह्मणाली, "हे पंडिते, मला परवां यशोधर मुनीच्या केवलज्ञानकल्याणकरितां आलेल्या देवांची विभूति पाहून माझ्या पूर्वजन्मींच्या चरित्राचें स्मरण झालें आहे. तें तुला सांगतें ऐक:—"

" विदेह क्षेत्रांत गंधिल नांवाचा देश आहे. त्या देशांतील पाटली नांवाच्या गांवांत नागदत्त नांवाचा वणिक् राहत असे. त्याला सुमती नांवाची एक स्त्री होती. त्या दांपत्यास पांच पुत्र व तीन कन्या होत्या. त्यांपैकीच मी एक होय. माझें नांव **निर्नामा** असें होतें. तीच मी **श्रीमती** होय. एकेवेळीं सुदैवानें सहज माझी व **पिहिताश्रव** नांवाच्या अवधिज्ञानी मुनीची गांठ पडली. त्यांना पाहून मी ह्मणालें की, ' हे भगवन्, मी या दरिद्री कुलांत कोणत्या कर्मानें उत्पन्न झालें तें सांगा. ' तेव्हां ते मुनि मला ह्मणाले, ' हे कन्ये, याच गंधिल देशांतील पलालपर्वत नांवाच्या गावांत देविल नांवाच्या पाटलापासून सुमति नांवाच्या स्त्रीच्या उदरीं जन्म पावलेली धन्यश्री नामें कन्या तूं पूर्वजन्मी होतीस. तेव्हां एकेवेळीं तूं अज्ञानामुळें मृत कुत्र्याचें दुर्गंध शरीर **समाधिगुप्त** नांवाचे मुनि शास्त्र पठण करित असतां त्यांच्यापुढें टाकिलें. त्यावेळी मुनी तुला ह्मणाले कीं, " हे कन्ये , तूं अत्यंत अनुचित कर्म केलें आहेस. हें तुला परिणामीं अत्यंत कटु असें फल देईल." हें ऐकून तुला पश्चात्ताप होऊन तूं मुनीपाशीं क्षमा मागितलीस त्यामुळें तुला किंचित् पुण्य घडलें. व त्या पुण्यानें तूं आज येथें मनुष्यजन्मांत पण अत्यंत दरिद्र कुलांत उत्पन्न झालीस.

व परलोकीही दुःखें भोगावी लागतात." याप्रमाणें पिहिताश्रव मुनींनीं मला उपदेश केला. मी ( निर्नामा ) मुनीच्या उपदेशाप्रमाणें दोन्ही व्रतांचे उपवास करून त्या पुण्यामुळें, शेवटीं मरून स्वर्गास गेलें व तेथें ललितांग देवाची **स्वयंप्रभा** नांवाची देवी झालें. नंतर मी तेथून मध्यलोकीं येऊन प्रथम माझ्या गुरूची-पिहिताश्रव मुनीची-पूजा केली. ललितांगदेवासह स्वर्गांत अनेकप्रकारचे दिव्य भोग भोगून तेथून चवून येथें मी श्रीमती होऊन जन्मल्यें आहे. अशी माझी पूर्वजन्मीची कथा आहे." असें सांगून श्रीमती पुढें ह्मणाली, 'ललितांगदेवाचें स्मरण झाल्यामुळें त्याच्या शोधाकरितां मी यत्न करीत आहे. त्यांचा शोध लावण्यास तूंच समर्थ आहेस. कारण, '**स्त्रीणांविपत्प्रतीकारे स्त्रिय एवावलाम्बनम्**' ह्मणजे, स्त्रियांची विपत्ति दूर करण्यास स्त्रियाच आधार होत. करितां हे पंडिते, त्यांना शोधून आणून माझ्या प्राणांचें रक्षण कर. या कार्याच्या सिद्धीकरितां मी एक उपाय सांगत्यें तो ऐक. मी माझ्या पूर्वभवाच्या चरित्रासंबंधी कोठें कोठें गूढ अर्थाचा असा एक चित्रपट लिहून देतें. तो घेऊन तूं जा. जे लोक आपला खरा संबंध नसून ही माझ्या प्राप्तीकरितां आपणच इचे पति आहोंत असें ह्मणतील त्यांना या चित्रपटांतील गूढ अर्थाच्या संकटांत पाडून त्यांचा उपहास कर. ह्मणजे ते लज्जित होऊन माझ्याविषयीं विमुख होतील." याप्रमाणें श्रीमतीनें सांगितल्यावर पंडिता ह्मणाली, "मी तुझ्या पतीचा शोध करित्यें. तूं निर्भय ऐस. शोक करूं नकोस." याप्रमाणें तिला आश्वासन देऊन पंडिता श्रीमतीनें

मायिक, प्रतिक्रमाणादि पडावश्यक क्रिया वेळच्यावेळेस करणें.) (१५) **मार्गप्रभावना** (ज्ञान, दान, जिनपूजा, तपोऽनुष्ठान वगैरे करून जिनधर्माचा प्रकाश करणें.) (१६) **प्रवचनवत्सलत्व** (समानधर्मी लोकांशी स्नेहानें वागणें.) ह्या षोडशकारणभावनांचें चिंतन केल्यानें **तीर्थंकरत्व** प्राप्त होतें.

तीर्थंकराचीं पांच कल्याणें ह्मणजे १ गर्भावतरण, २ जन्म, ३ दीक्षा, ४ केवलज्ञान व ५ निर्वाण.

तीर्थंकराच्या समवसरण सभेंत विद्यमान असणारीं आठ प्रातिहार्यें ह्म० १ अशोकवृक्ष, २ देवकृत-पुष्पवृष्टि, ३ दिव्यध्वनि, ४ चौसष्टचामरें, ५ सिंहासन, ६ प्रभामंडल, ७ दुंदुभि व ८ छत्रत्रय. (एकावर एक अशीं तीन शुभ्र छत्रें.); चौतीस अतिशय ह्म० तीर्थंकरास जन्मतःच असणारे १०, घातिकर्मांच्या क्षयापासून प्राप्त होणारे १० व इंद्राच्या आज्ञेनें देवाकडून केले जाणारे १४ मिळून तीर्थंकराचे ३४ अतिशय गुण.

याप्रमाणें १६ भावना, ५ कल्याणें, ८ प्रातिहार्यें व ३४ अतिशय मिळून ६३ गुणांस उद्देशून जें अनुष्ठान करणें त्यास **'जिनगुणसंपत्ति'** ह्मणतात. जिनगुणसंपत्तीकरितां ६३ दिवसांचें उपोषण सांगितलें आहे. आतां श्रुतज्ञानोपवासाचें

र्यादा ज्यास आहे अशा प्रकारचें वृत्त समजतें. तुझ्या पूर्वजन्मीच्या पतीचें नांव **ललितांगदेव** होय. व तूं त्याची स्वयंप्रभा देवी होय. तो ललितांग होण्यापूर्वी **महाबल** या नांवाचा विद्याधर होता. त्याला स्वयंबुद्धमंत्र्याच्या उपदेशानें देवलोकींची लक्ष्मी भोगावयास मिळाली. तो महाबल मरून झालेला ललितांग स्वर्गांतून चवून मनुष्यलोकीं याच देशांत आमचा अगदीं जवळचा आप्त ह्मणजे माझ्या बहिणीचा पुत्र होऊन जन्मला आहे. तो तुझा पति होईल. आजपासून तिसऱ्या दिवशीं ललितांगाचा व तुझा समागम होईल. व त्यासंबंधानें वृत्तांत आजच पंडिता घेऊन येईल. आतां तुझी मामी येणार आहे. आह्मी तिला आणण्याकरितां सामोरें जातो." असें बोलून राजा तेथून निघून गेला. इतक्यांत, **पंडिता** तेथें येऊन श्रीमतीस म्हणाली, 'तूं मोठी भाग्यशाली आहेस. तुझे मनोरथ आज पूर्ण झाले. कारण, मी तुझ्या सांगण्याप्रमाणें चित्रपट घेऊन महापूत जिनालयांत जाऊन बसलें. तेथें चित्रपट पसरल्यावर पुष्कळ अहमन्य लोक त्या ठिकाणी येऊन त्या चित्रांतला आशय न समजल्यामुळें खिन्नमुखानें परत गेले. नंतर तुझ्या सासऱ्याचा पुत्र युवराज **वज्रजंघ** तेथें आला.प्रथम तो भव्यपुरुष त्या जिनमंदिरास प्रदक्षिणा घालून तसेंच स्तोत्र,नमस्कार,पूजा वगैरे करून नंतर त्या **पट्टशाळेंत** आला. तेथें तो चित्रपट पाहून म्हणाला कीं, ' यांतील हें सर्व चरित्र मी पूर्वी जाणिल्याप्रमाणें आहे. मला वाटतें कीं, मी त्या श्रीप्रभविमानाचा मालक ललितांगच आहे. अहो! यांतील कित्येक स्थळें गूढ ठेविलीं आहेत. त्याचें कारण मला

दिलेला चित्रपट घेऊन, महापूत जिनालयास गेली व तेथें ती श्रीमतीनें दिलेला चित्रपट उघडून ठेवून मंदिरांत आलेल्या लोकांची परीक्षा करण्याकरितां उभी राहिली. तिकडे दिग्विजयाकरितां गेलेला वज्रदंत चक्रवर्ती, समस्त राजे लोकांस व विद्याधरांस आपल्यापुढें नम्र करून, दिग्विजय करून परत नगरास जाण्याकरितां निघाला. बत्तीस हजार राजे लोकांनीं त्याला पट्टाभिषेक केला. दिग्विजय करून कृतार्थ झालेल्या त्या चक्रवर्तीनें कांहीं दिवसांनीं स्वसेनेसह आपल्या नगरांत प्रवेश केला. तेथें पट्खंड पृथ्वीचें उत्तम प्रकारें पालन करीत त्या पुण्यशाली चक्रवर्तीनें इहलोकीचे दशांग भोग पुष्कळ दिवस अनुभविले.

## पर्व ७ वें.

### श्रीमती–वज्रजंघसमागमनवर्णन.

नंतर त्या पुण्यशाली चक्रवर्तीनें आपल्या कन्येला बोलावून सांगितलें कीं, "बाळे, तूं शोक करूं नकोस. मौन सोडून दे. मी अवधिज्ञानानें तुझ्या पतीचा सर्व वृत्तांत सांगतो. यशोधर महामुनींच्या केवलज्ञानपूजेच्यावेळीं मला अवधिज्ञान प्राप्त झालें आहे. त्यायोगें मला द्रव्य, क्षेत्र, काल व भाव यांची म-

१ टीपः—१ चौदारत्नें, २ नऊ निधि, ३ देवी ( सुंदर स्त्रिया ) ४ नगर, ५ धान्य, ६ आसनें, ७ सैन्य, ८ भोजन, ९ पात्रें व १० नाटकें.

र्यादा ज्यास आहे अशा प्रकारचें वृत्त समजतें. तुझ्या पूर्वजन्मीच्या पतीचें नांव **ललितांगदेव** होय. व तूं त्याची स्वयंप्रभा देवी होय. तो ललितांग होण्यापूर्वी **महाबल** या नांवाचा विद्याधर होता. त्याला स्वयंबुद्धमंत्र्याच्या उपदेशानें देवलोकीची लक्ष्मी भोगावयास मिळाली. तो महाबल मरून झालेला ललितांग स्वर्गांतून चवून मनुष्यलोकीं याच देशात आमचा अगदीं जवळचा आप्त ह्मणजे माझ्या बहिणीचा पुत्र होऊन जन्मला आहे. तो तुझा पति होईल. आजपासून तिसऱ्या दिवशीं ललितांगाचा व तुझा समागम होईल. व त्यासबधानें वृत्तांत आजच पंडिता घेऊन येईल. आता तुझी मामी येणार आहे. आह्मी तिला आणण्याकरितां सामोरें जातो." असें बोलून राजा तेथून निघून गेला. इतक्यांत, **पंडिता** तेथें येऊन श्रीमतीस म्हणाली, 'तूं मोठी भाग्यशाली आहेस. तुझे मनोरथ आज पूर्ण झाले. कारण, मी तुझ्या सांगण्याप्रमाणें चित्रपट घेऊन महापूत जिनालयात जाऊन बसलें. तेथें चित्रपट पसरल्यावर पुष्कळ अहमन्य लोक त्या ठिकाणीं येऊन त्या चित्रातला आशय न समजल्यामुळें खिन्नमुखानें परत गेले. नंतर तुझ्या सासऱ्याचा पुत्र युवराज **वज्रजंघ** तेथें आला.प्रथम तो भव्यपुरुष त्या जिनमंदिरास प्रदक्षिणा घालून तसेंच स्तोत्र,नमस्कार,पूजा वगैरे करून नंतर त्या **पट्टशाळेंत** आला. तेथें तो चित्रपट पाहून म्हणाला कीं, ' यांतील हें सर्व चरित्र मी पूर्वीं जाणिल्याप्रमाणें आहे. मला वाटतें कीं, मी त्या श्रीप्रभविमानाचा मालक ललितांगच आहे. अहो! यातील कित्येक स्थळें गूढ ठेविलीं आहेत. त्याचें कारण मला

असें वाटतें कीं, ज्यांचा या चित्रांतील चरित्रांशीं संबंध नाहीं, अशा लोकांस मोह व्हावा ह्मणून हें चित्र कित्येक ठिकाणीं गूढार्थ ठेवून रेखाटिलें आहे. या ठिकाणीं ऐशानकल्प दाखविला आहे. त्यांत श्रीप्रभविमान असून त्या विमानाचा अधिपति जो ललितांग त्याच्याजवळ ही स्वयंप्रभा देवी दाखविलेली आहे. माझी तर अशी खात्री आहे कीं, अशा प्रकारचें चित्रकलेंतील नैपुण्य स्वयंप्रभेच्याच हातचें असलें पाहिजे.' याप्रमाणें तर्क करीत तो क्षणभर व्याकुळ व शून्य अंतःकरणाचा होऊन कांहींएक प्रकारचा विचार करूं लागला आहे तोंच त्यास मूर्च्छा आली. तेव्हां तात्काल त्याच्या परिचारकांनीं कांहीं उपाय करून त्यास सावध केलें. तथापि त्याला सर्व दिशा तन्मय दिसूं लागल्या. तेव्हां वज्रजंघानें मला विचारिलें कीं, 'हे भद्रे, या पटावर आमच्या पूर्वभवाचा संबंध कोणी लिहिला आहे ?' मी त्यास म्हणालें कीं, 'तुझ्या मामीची कन्या श्रीमती या नांवाची आहे. ती अजून स्वयंवर करणारी आहे. तिनें आपलें कलाचातुर्य या पटावर दाखविलें आहे. ती आपण होऊन ज्याअर्थीं तुझ्या प्राप्तीकरितां यत्न करीत आहे त्याअर्थीं तुझ्यासारखा पुण्यवान कोणी नाहीं.' हें ऐकून तो म्हणाला, 'पंडिते, तूं योग्य बोललीस. कारण पहा, अनुकूल विधि (दैव) पूर्वजन्मीं वियुक्त झालेल्या जीवांस पुनः दुसऱ्या जन्मीं एके ठिकाणीं आणून त्यांची सांगड घालतो हें मोठें आश्चर्य आहे! आपला इष्टार्थ द्वीपांतरांत असो, दिशांच्या शेवटीं ह्मणजे जेथें जातां यावयाचें नाहीं इतक्या दूरवर असो, कीं समुद्रांत असो, तरी अनुकूल झालेला

विधि आपणास त्याची गांठ घालून देतो. अशी ही दैवाची चमत्कारिक लीला आहे.' असें बोलून त्या वज्रजंघानें आमचा तो चित्रपट हातीं घेऊन, दुसरा आपला पट माझ्या हातीं दिला आहे. यांत तुझ्या चित्राप्रमाणें सर्व चरित्र स्पष्ट दिसत आहे. हें चित्र अर्पण करून याच्या द्वारें त्यानें तुझ्याविषयीं आपल्या मनांतील प्रेम अर्पण (व्यक्त) केलें आहे. नंतर मी वज्रजंघाचा निरोप घेऊन इकडे आल्यें." असें ह्मणून पंडितेनें श्रीमतीच्या पुढें तो चित्रपट ठेविला. तो पाहून तिला फार आनंद झाला. श्रीमतीला इच्छित वर प्राप्त होऊन ती आतां कृतार्थ होणार हें दाखविण्याकरितां ती पंडिता तिला म्हणाली, "अग श्रीमते, तूं लौकरच मंगलसुखास प्राप्त हो! तुह्मा दोघांचा योग्य संयोग करून विधि कृतार्थ होवो! तुझा प्राणनाथ वज्रजंघ हा राजाचा भाचा (बहिणीचा मुलगा) व राणीनाही भाचा (भावाचा मुलगा) होय. ते दोघेहि त्याला फार मानितात. तुझा वर आतां लौकरच येईल. करितां, तू धीर धर." पंडितेचें हें भाषण ऐकून श्रीमतीस फार समाधान वाटलें. इतक्यांत **वज्रदंत** चक्रवर्तीनें अर्ध्या वाटेंत सामोरे जाऊन **वज्रबाहु** राजास आणिलें. आपली बहीण **वसुंधरा**, तिचा पति वज्रबाहु व भाचा **वज्रजंघ** याना पाहून **वज्रदंत** चक्रवर्ती फारच संतुष्ट झाला; व त्यानें त्यांचा योग्य आदरसत्कार केला. नतर काहीं वेळपर्यंत सुखाच्या इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलून वज्रदंत चक्रवर्ती वज्रबाहूस म्हणाला कीं, "तुह्मी आपली पत्नी व पुत्र यांसह माझ्या घरीं आला त्यामुळें मला फार आज आनद झाला आहे.

असें वाटतें कीं, ज्यांचा या चित्रांतील चरित्रांशीं संबंध नाहीं, अशा लोकांस मोह व्हावा म्हणून हें चित्र कित्येक ठिकाणीं गूढार्थ ठेवून रेखाटिलें आहे. या ठिकाणीं ऐशानकल्प दाखविला आहे. त्यांत श्रीप्रभविमान असून त्या विमानाचा अधिपति जो ललितांग त्याच्याजवळ ही स्वयंप्रभा देवी दाखविलेली आहे. माझी तर अशी खात्री आहे कीं, अशा प्रकारचें चित्रकलेंतील नैपुण्य स्वयंप्रभेच्याच हातचें असलें पाहिजे.' याप्रमाणें तर्क करीत तो क्षणभर व्याकुळ व शून्य अंतःकरणाचा होऊन कांहींएक प्रकारचा विचार करूं लागला आहे तोंच त्यास मूर्च्छा आली. तेव्हां तात्काल त्याच्या परिचारकांनीं कांहीं उपाय करून त्यास सावध केलें. तथापि त्याला सर्व दिशा तन्मय दिसूं लागल्या. तेव्हां वज्रजंघानें मला विचारिलें कीं, 'हे भद्रे, या पटावर आमच्या पूर्वभवाचा संबंध कोणी लिहिला आहे?' मी त्यास म्हणालें कीं, 'तुझ्या मामीची कन्या श्रीमती या नावाची आहे. ती अजून स्वयंवर करणारी आहे. तिनें आपलें कलाचातुर्य या पटावर दाखविलें आहे. ती आपण होऊन ज्याअर्थीं तुझ्या प्राप्तीकरिता यत्न करीत आहे त्याअर्थीं तुझ्यासारखा पुण्यवान कोणी नाहीं.' हें ऐकून तो म्हणाला, 'पंडिते, तूं योग्य बोललीस. कारण पहा, अनुकूल विधि (दैव) पूर्वजन्मीं वियुक्त झालेल्या जीवास पुन: दुसऱ्या जन्मीं एके ठिकाणीं आणून त्यांची सांगड घालतो हें मोठें आश्चर्य आहे! आपला इष्टार्थ द्वीपांतरात असो, दिशाच्या शेवटीं म्हणजे जेथें जातां यावयाचें नाहीं इतक्या दूरवर असो, कीं समुद्रांत असो, तरी अनुकूल झालेला

विधि आपणास त्याची गांठ घालून देतो. अशी ही दैवाची चमत्कारिक लीला आहे.' असें बोलून त्या वज्रजंघानें आमचा तो चित्रपट हातीं घेऊन, दुसरा आपला पट माझ्या हातीं दिला आहे. यांत तुझ्या चित्राप्रमाणें सर्व चरित्र स्पष्ट दिसत आहे. हें चित्र अर्पण करून याच्या द्वारें त्यानें तुझ्याविषयीं आपल्या मनांतील प्रेम अर्पण ( व्यक्त ) केलें आहे. नंतर मी वज्रजंघाचा निरोप घेऊन इकडे आलें." असें ह्मणून पंडितेनें श्रीमतीच्या पुढें तो चित्रपट ठेविला. तो पाहून तिला फार आनंद झाला. श्रीमतीला इच्छित वर प्राप्त होऊन ती आतां कृतार्थ होणार हें दाखविण्याकरितां ती पंडिता तिला म्हणाली, "अग श्रीमते, तूं लौकरच मंगलसुखास प्राप्त हो! तुह्मा दोघांचा योग्य संयोग करून विधि कृतार्थ होवो! तुझा प्राणनाथ वज्रजंघ हा राजाचा भाचा ( बहिणीचा मुलगा ) व राणीनाही भाचा ( भावाचा मुलगा ) होय. ते दोघेहि त्याला फार मानितात. तुझा वर आतां लौकरच येईल. करितां, तूं धीर धर." पंडितेचें हें भाषण ऐकून श्रीमतीस फार समाधान वाटलें. इतक्यांत वज्रदंत चक्रवर्तीनें अर्ध्या वाटेंत सामोरे जाऊन वज्रबाहु राजास आणिलें. आपली बहीण वसुंधरा, तिचा पति वज्रबाहु व भाचा वज्रजंघ यांना पाहून वज्रदंत चक्रवर्ती फारच संतुष्ट झाला; व त्यानें त्यांचा योग्य आदरसत्कार केला. नंतर कांहीं वेळपर्यंत सुखाच्या इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलून वज्रदंत चक्रवर्ती वज्रबाहूस म्हणाला कीं, "तुह्मी आपली पत्नी व पुत्र यांसह माझ्या घरीं आला त्यामुळें मला फार आज आनंद झाला आहे.

करितां, माझ्या घरची आपणांस आवडेल ती वस्तु घ्या. माझ्या संपत्तीचा विनियोग करण्याची योग्य अशी सुसंधि आज आली आहे. ह्मणून, माझ्या विनंतीचा अव्हेर करू नका." हें ऐकून वज्रबाहु चक्रवर्तीस म्हणाला, "आपल्या प्रसादानें सर्व कांहीं मला आहे. आपल्या प्रेमदृष्टीनेंच मी पुण्यवान् व कृतार्थ झालों आहे. तथापि आपल्या आज्ञेस मान द्यावा म्हणून मी अशी प्रार्थना करितों कीं, आपली कन्या श्रीमती माझ्या वज्रजंघास द्यावी." वज्रबाहूची ती विनंति ऐकून चक्रवर्ती म्हणाला कीं, 'तुमच्या म्हणण्याप्रमाणें या तरुण दंपतीचा योग्य संबंध व्हावा.' चक्रवर्तीचें हें भाषण ऐकून वज्रबाहूला व महादेवी वसुंधरेला अत्यानंद झाला. नगरवासी जनांस तसेंच मंत्री, कारभारी, सामंत, राजे वगैरे लोकांना ही मंगलवार्ता ऐकून फार संतोष झाला. तात्काल चक्रवर्तीच्या हुकूमावरून विवाहमंडप रचण्यास आरंभ झाला. त्यावेळीं चक्रवर्तीनें महापूत जिनालयांत अष्टान्हिक व कल्पवृक्ष (या पूजेच्या वेळीं याचक लोकांस इच्छित वस्तु देऊन तृप्त करावयाचें असतें.) या नांवाच्या दोन पूजा मंगलाकरितां केल्या. सुमुहूर्तावर विवाहविधि जाणणाऱ्यांनीं पवित्र जलांनीं त्या वधूवरांस अभिषेक केला (मंगलस्नान घातलें). नंतर त्या दोघांनीं शुभ्र, सूक्ष्म व नवीन अशीं रेशमीवस्त्रें धारण करून मंगलकालीं योग्य असे रत्नादिकांचे अलंकार धारण केले. वरानें अंगास चंदनाची उटी लावून ललाटावरही चंदनाचा टिळा लाविला. याप्रमाणें अलंकारविधि झाल्यावर पूर्वींच जिची मंगलक्रिया केलेली आहे अशा रत्ननिर्मित वेदीवर त्या वधूवरांस त्यांच्या

त्यांच्या आसनावर बसविलें. त्यावेळीं दुंदुभि वगैरे वाद्यें वाजूं लागलीं व भोंवतालचे स्तुतिपाठक व मागध[1] मंगलाष्टकांचा पाठ ह्मणूं लागले. नंतर 'तुह्मी उभयतां चिरायु व्हा!' असें ह्मणत त्या चक्रवर्तीनें सुवर्णमय झारीनें वज्रजंघाच्या करपल्लवावर जलधारा सोडिली. याप्रमाणें त्या वधुवरांचा विवाह मोठ्या आनंदानें मातापिता वगैरे गुरुजनांसमक्ष झाला. दुसरे दिवशीं संध्याकाळीं वज्रजंघ व श्रीमती हें दांपत्य आपला विवाहोत्सव प्रकट करण्याकरितां महापूत जिनालयास गेलें. ईर्यापथ शुद्धि करून जिनमंदिरांत प्रवेश केल्यावर तेथें त्यांनीं दिगंबर मुनींस वंदन केलें. तसेंच आंत गंधकुटीमध्यें जाऊन तेथें त्या वधूवरांनीं सुवर्णमय जिनप्रतिमेचा अभिषेक करून तिची जलगंध वगैरे द्रव्यांनीं पूजा केली. वज्रजंघ राजानें जिनेश्वरास उद्देशून स्तुति[2] केली. ती अशीः—

"हे प्रभो! आज कर्मशत्रूंचा नाश करण्याच्या इच्छेनें मी तुझी आराधना करितों. तुझे गुण अनंत आहेत. त्यांचें वर्णन करण्यास गणधर देखील असमर्थ आहेत. तथापि मी भक्तीमुळें तुझें स्तवन करीत आहे. कारण भक्ति ही स्वर्गमोक्षादि प्राप्त करून देणारी आहे. जिनेश्वरा, तूं जें तत्त्व दाखविलें आहे तें संसाराचा समूळ नाश करणारें आहे. आत्महिताची इच्छा करणारे लोक तूं प्रकट केलेल्या धर्ममार्गानेंच चालतात. हे जिना, सिंहव्याघ्रादि हिंस्र पशु, तसेंच नदी, दावानल, सर्प, चोर, रोग, व बंध हे सर्व तुझ्या

---

१ टीपः—राजास वस्त्रेवर बोध करणारे, ह्मणजे उठता, बसता, चालता, सावध करणारे जे सेवक त्याना 'मागध' असें ह्मणतात

२ येथें संस्कृतज्ञ वाचकांनीं महापुराणांतील स्तुतिपर श्लोक पहावेत.

पदकमलांचें नित्य स्मरण केल्यानें शांत होतात. तिन्ही जगांस प्रकाशित करणारा असा ज्योतिःस्वरूप तूं एकच आहेस; तूं सर्वांचें हित करणारा आहेस. धर्मतीर्थाचा आदिकर्ता तूंच. जीवांस हितोपदेश देणारा आदि सद्गुरुहि तूंच. आतांपर्यंत तुझी स्तुति केली तेवढी पुरी आहे. हे जिनेंद्रा, तुला स्तुतिपूर्वक नमस्कार करून मी दुसरें कांहीं मागत नाहीं. मला तुझ्याच ठिकाणीं दृढ अशी भक्ति दे. तीच मला अभ्युदय व मोक्ष देईल." याप्रमाणें जिनेश्वराची स्तुति करून, पूजा, अर्चा वगैरे करून, तसेंच मुनिसंघाचीही पूजा करून त्या श्रीमान् वज्रजंघ राजानें श्रीमतीसह पुंडरीकिणी नगरींत मोठ्या आनंदानें प्रवेश केला. श्रीवज्रजंघ राजास सुप्रसिद्ध अशा ३२ हजार मुकुटबद्ध राजे लोकांनीं अभिषेक केला. त्या इंद्रपुरीसारख्या पुंडरीकिणी नगरींत त्या वज्रजंघानें अनेक प्रकारचे सुखोपभोग अनुभवित श्रीमतीसह जिनेंद्रपूजा करीत फार दिवस वास केला.

---

# पर्व ८ वें.

## श्रीमतीवज्रजंघपात्रदानानुवर्णन.

याप्रमाणें चक्रवर्तीच्या घरीं उत्तम प्रतीचे भोगोपभोग अनुभवित तसेंच जिनपूजा व पात्रदान इत्यादि मंगलकृत्यें करीत असतां, त्या वधूवरांचा पुष्कळ काळ लोटला. वज्रजंघाची लहान बहीण अनुंदरी नांवाची सुंदर कन्या होती. ती वज्रबा-

हूनें चक्रवर्तीचा पुत्र अमिततेज यास दिली. नंतर एके दिवशीं वज्रदंत चक्रवर्तीनें हत्ती, घोडे, रथ, देश, रत्नें, खजिना, वगैरे पुष्कळसें पैतृकधन देऊन त्या वधूवरांस आपल्या नगरास परत पाठविलें. वज्रजंघ आपल्या पत्नीसह पुढें चालला होता, व वज्रबाहु आणि वसुंधरादेवी हीं मागून चालली होतीं. बरोबर प्रचंड सैन्य होतें. याप्रमाणें तो वज्रजंघ आपल्या परिवारांसह उत्पलखेटक नगरास पोंचला. वज्रजंघ आपल्या पत्नीसह त्या श्रृंगारिलेल्या नगरांत प्रवेश करीत असतां नगरवासी स्त्रियांनीं त्यांच्यावर पुष्पवृष्टि केली. त्या नूतन वधूवरांस प्राजाजनांनीं पुण्यमय आशीर्वाद व पुष्पाक्षतांनीं युक्त असा प्रसाद दिला. नंतर गंभीर अशा वाद्यांच्या शब्दांनीं व्याप्त व उंच उंच तोरणांनीं श्रृंगारिलेल्या त्या नगराची अपूर्व शोभा पाहत राजानें राजवाड्यांत प्रवेश केला. तेथें अनेक प्रकारचे भोग अनुभवित कालक्रमण होत असतां श्रीमतीस शंभर पुत्र झाले. यानंतर एके दिवशीं वज्रबाहू आपल्या मंदिराच्या गच्चीवर बसला असतां त्यानें आकाशांत एखाद्या प्रासादाच्या आकाराचा होऊन उत्पन्न झालेला असा एक मेघ पाहिला. तो बघतां बघतां तात्काल अदृश्य ही झाला. हें पाहून त्या राजास वैराग्य उत्पन्न झालें. संसारांतील चराचर सर्व वस्तु अस्थिर व नाशवंत आहेत असें जाणून त्या वज्रबाहूनें वज्रजंघ पुत्रास अभिषेक करून राज्याधर बसविलें. व यमधरमुनीजवळ जाऊन त्यानें दीक्षा घेतली. त्याच्यावरोवर पांचशें राजे लोकांनींही दीक्षा घेतली. त्यांत वीरबाहु वगैरे श्रीमतीचे पुत्रही होते. वज्र-

बाहु मुनीश्वर वीरबाहु वगैरे मुनींसह विहार करीत क्रमानें केवलज्ञान प्राप्त झाल्यावर मोक्षास गेले. वज्रजंघ आपल्या प्रजेस व परिवारास सतुष्ट ठेवून मोठ्या न्यायानें व दक्षतेनें राज्यशकट हाकूं लागला.

इकडे, षट्खंडाधिपति महाराज वज्रदंत चक्रवर्ती एके दिवशीं मंत्रिजनासह राजसभेंत बसला असता, वनपालानें एक ताजें, सुगधि व प्रफुल्लित कमल आणून त्याच्या हातीं दिलें. चक्रवर्ती ते कमल हातीं घेऊन त्याचा वास घेऊं लागला. इतक्यांत, त्या कमलांतील गंधाच्या लोभानें त्यांत अडकून पडून मृत झालेला एक भ्रमर त्याच्या दृष्टीस पडला. तें पाहून तो राजा तात्काल विषयापासून विरक्त झाला. व मनाशींच विचार करूं लागला कीं, "अहो काय ही दुर्दशा! हा भ्रमर गंधास लुब्ध होऊन येथें रस-पान करीत आहे, इतक्यात सूर्यास्त झाल्यामुळें कमल मुकुलित होऊन त्यात सापडून हा बिचारा गतप्राण झाला. धिक्कार असो या विषयवासनेला! या संसारांत 'सुख पाहतां जवाएवढें, दुःख पर्वताएवढें' अशी जी साधूक्ति आहे ती अक्षरश खरी आहे. जें घराणें आज ऐश्वर्यसपन्न आहे तेंच उद्यां दरिद्रीही होतें; उलट, जेथें आज भयंकर दुःख आहे तेथेंच उद्या मंगलही नांदू लागतें. कोणत्याही वस्तूचा वियोग होणें हा सयोगाचा परिणाम (शेवट) आहे, आणि विपत्ति येणें हा संपत्तीचा परिणाम आहे. साराश सुख, दुःख किंबहुना हें सारें जग अशाश्वत आहे." याप्रमाणें उपरति झाल्यावर त्यानें अमिततेज नावाच्या पुत्रास राज्य

देण्याचें ठरविलें, परंतु, अमिततेजानें व त्याचप्रमाणें त्याच्या सर्व बधूंनीही तें नाकारिलें. अमिततेज ह्मणाला कीं, "हे देव, ज्याअर्थी आपण ह्या राज्याचा त्याग करिता त्याअर्थी यात काहीं तरी मोठा दोष आहेच. ह्मणून, मींही आपणाबरोबर तपोवनास येतो." याप्रमाणे त्याचा दृढनिश्चय जाणून चक्रवर्तीनें आपल्या वंशाच्या स्थितीकरिता अमिततेजाचा पुत्र जो **पुंडरीक** त्यास राज्याभिषेक केला. व **गणधर** मुनीजवळ त्या राजर्षीनें आपल्या स्त्रीपुत्रासह दीक्षा घेतली. चक्रवर्तीची राणी जी लक्ष्मीमति तिला, व अमिततेजाच्या वियोगानें अनुदरीस फार शोक झाला. लक्ष्मीमतीस तर मोठी चिंता उत्पन्न झाली कीं, हें राज्य अवाढव्य आहे. व याच्यावर स्थापिलेला पुडरीक बालक हा अज्ञान आहे. तेव्हा व्हावें कसें ? आपल्या भाच्याला वज्रजघाला ही हकीकत कळवावी असा पोक्त विचार करून तिनें तात्काल त्याच्याकडे लखोटा व नजराणा देऊन दोन चतुर व व्यवहारज्ञ असे दूत पाठविले. त्या पत्रातील मजकूर असा होता, "अज्ञान पुडरीकास राज्यावर बसवून आपल्या परिवारासह चक्रवर्ती तपोवनास गेले. आह्मी दोघी अबला आहोंत व पुडरीक हा अजून बाल आहे. याकरिता, या अवाढव्य राज्याचें पालन करणें तुमच्या शिरावर आहे ह्मणून लौकर यावें." तें पत्र घेऊन ते दोघे विद्याधर आकाशमार्गानें लौकरच उत्पलखेट नगरास पोंहचले. तेथें वज्रजघ राजास प्रथम नमस्कार करून त्याच्यापुढें पत्र, रत्नाचा करडा व नजराणा ठेविला वज्रजघानें तें पत्र वाचून पाहून त्यातील आशय श्रीमतीस ही कळविला. तात्काल तें दापत्य

पुंडरिकिणी नगरास जाण्यास आपले मतिवर आदि चार महामंत्री व चतुरंग सैन्य यासह निघाले मार्गांत वज्रजंघाच्या सैन्यांतील लोकांनीं एका रम्य अशा सरोवराच्या काठीं तळ दिला. सरोवराच्या कांठीं उभारिलेल्या आपल्या भव्य तबूत राजा सुखानें बसला आहे, तोंच त्यानें दोन महातेजस्वी चारणमुनी आकाशांतून खालीं येत असतांना पाहिलें. तात्काल, वज्रजंघ राजा व श्रीमती या उभयतानीं त्यांचें स्वागत करून त्याचेपुढें हात जोडून अर्घ्य दिलें, व पुनः शुद्ध भावानें नमस्कार करून मुनीश्वरांस भोजनगृहांत नेलें. तेथें त्याचें चरण प्रक्षालन करून त्यांस उच्चस्थानीं बसवून अर्घ्य दिलें, व पुन· मन, वचन व काय हीं शुद्ध करून प्रणाम केला. आणि त्या मुनीश्वरांस विधिपूर्वक आहार दिला. तेव्हां तेथें पात्रदानाचा महिमा व्यक्त होण्याकरितां पचाश्चर्य वृष्टि झाली. त्यावेळीं हे दोघे मुनीश्वर महाराजाच्या पुत्रांपैकीं सर्वांहून धाकटे पुत्र आहेत असें तेथील चोपदारांनीं राजास कळविलें. तें ऐकून राजानें मुनीस **सागारधर्माची** माहिती व तसेंच स्वतांची भवावली विचारली. तेव्हां **दमधर** मुनींनीं प्रथम सागारधर्म सांगून त्यांची भवावली सांगितली. ती अशी —

" हे राजा, गंधिल देशांत सिंहपूर नगरीचा **श्रीषेण** नामक राजा होऊन गेला. त्यांचा तूं येथून चौथ्या जन्मीं जयवर्म नांवाचा ज्येष्ठ पुत्र होतास. पुढें तू मुनिदीक्षा घेऊन लौकरच *मरण पावलास. मरतांना विद्याधराच्या राजाची पदवी आपणास* मिळावी असें निदान केल्यामुळें तूं अलका नगरींत **महाबल** या

नांवाचा विद्याधर राजा होऊन जन्मलास. तेथें पुष्कळ काळपर्यंत अनेक प्रकारचे सुखोपभोग अनुभविल्यानंतर, स्वयंबुद्ध मंत्र्याच्या उपदेशानें तुला उपरति झाली. व त्यामुळें संन्यासविधीनें देहत्याग करून, धर्मप्रभावानें तूं **ललितांग** नांवाचा देव झालास. तेथून चवून तूं हल्लीं **वज्रजंघ** भूपति झाला आहेस." याप्रमाणें आपली पूर्वभवसंबंधीं कथा ऐकून, राजानें आपल्या प्रियेच्या पूर्वभवाची कथा विचारल्यावरून तीही मुनींनीं त्यास सांगितली; आणि मुनीश्वर म्हणाले, " हे राजा, तूं येथून पुढें आठव्या जन्मीं अपुनर्भव ह्मणजे जन्म-मरणापासून मुक्त होशील. तोंपर्यंत, देव व *मनुष्यलोकसंबंधी अभ्युदयसुखाचा अनुभव घेऊन*, शेवटीं तूं आठव्या भवांत **तीर्थंकर** होशील. त्यावेळीं ह्या श्रीमतीचा जीव दानतीर्थाचा प्रवर्तक **श्रेयान्** राजा होऊन उत्तम श्रेय संपादन करील." याप्रमाणें त्या चारण मुनीश्वरांचें दिव्य वचन ऐकून, राजाच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले. नंतर राजा, श्रीमती व मंत्री वगैरे भक्तांनीं श्रीचारणमुनीश्वरांना वंदन केलें. ते दमधर व सागरसेन मुनी आकाशमार्गानें निघून गेले. नंतर राजाही कांहीं दिवसांनीं पुंडरीकिणी नगरीस पोहोंचला. तेथें, लक्ष्मीमतिदेवी व अनुंदरी ह्या शोकाकुल होऊन त्याच्या येण्याचीच उत्कंठेनें वाट पाहत होत्या. त्यांना उपदेशाच्या दोन गोष्टी सांगून त्यानें त्यांचें समाधान केलें; व पुंडरीकाच्या राज्यास कोणाचाही उपद्रव होणार नाहीं असा बंदोबस्त करून, त्याला गादीवर बसवून, राज्यकारभार चतुर व राजनीतिविशारद अशा पोक्त मंत्रीमंडळावर सोंपविला. आणि तो पुन: परत

उत्पलखेट नगरास गेला. तेथें आपल्या सुंदर मंदिरांत पूर्वपुण्यें-करून प्राप्त झालेले अनेक प्रकारचे भोगोपभोग अनुभवित व अहोरात्र जैनधर्म चिंतवन करित असता या दांपत्याचा पुष्कळ काळ मोठ्या आनंदांत गेला.

## पर्व ९ वें.

### श्रीमतिवज्रजंघार्यसम्यग्दर्शनोत्पत्तिवर्णन.

नंतर एके दिवशीं, श्रीमती व वज्रजघ हे दोघे कृष्णागरू-धूपाच्या सुगधानें व्याप्त अशा एका मनोहर शयनगृहांत निजलेले असताना तेथील खिडकीचें दार बंद होतें. त्यायोगें धूपाचा धूर तेथें कोंडून, ते दोघे गुदमरून मरण पावले. वाचकहो, या संसाराच्या स्थितीस व त्या रम्य परंतु परिणामीं प्राणघातकी अशा सुखोपभोगांस धिकार असो! विषयभोगांच्या एकेक अंशानें सुद्धा या संसारी जीवाची केवढी शोचनीय दुर्दशा होत असते ती पहा! या विषयभोगांपासून तुह्मांस काय सुख होणार? तुह्मी शाश्वत सुख इच्छित असाल तर जिनाजिवर प्रेम ठेवा. 'असो. याप्रमाणें त्या दोघांचा एकदम अंत झाल्यावर, पूर्वी चारणमुनींस विधिपूर्वक आहार देऊन प्राप्त झालेल्या पुण्यबळानें उत्तरकुरुक्षेत्रात त्यांच्या आयुष्याचा बंध झाल्यामुळें ते दोघे तेथें जन्म पावले. या आपल्या जंबुद्वीपाच्या मध्यभागीं महामेरु नांवाचा एक पर्वत

आहे. त्याच्या उत्तरेस जीं भोगभूमीचीं क्षेत्रें आहेत त्यांना उत्तरकुरु असें ह्मणतात. तेथें स्वर्गापेक्षां ही सुखसंपत्ति अधिक असते. तसेंच मद्य, वाद्य, अलंकार, माळा, दीप, प्रकाश, गृह, भोजन, पात्रें आणि वस्त्र हे दहा पदार्थ पुरविणारे दहा प्रकारचे अनादिनिधन कल्पवृक्ष तेथें आहेत. फल देणें हा त्यांचा धर्म आहे. तेथें हिंवाळा, पावसाळा व उन्हाळा हीं नाहींत. तसेंच, दिवस व रात्र असा विभाग; काळोख; चांदणें; वसंत, ग्रीष्म इत्यादि ऋतूंचा क्रम हीं तेथें नसून फक्त एकाच अवस्थेंत-असणारे अर्थात् ज्यांच्या स्वरूपांत व गुणांत कधीच अंतर पडत नाहीं असे पदार्थ तेथील प्राण्यांच्या सुखाकरितां असतात. तेथील मानवांस रोगपीडा, जरा, वियोग, शोक, अनिष्ट, संयोग, चिंता वगैरे कोणत्याच प्रकारचें दुःख ठाऊक नसतें. तेथील दीर्घायुषी माणसास अकालीं मरण येत नसून, तेथें उत्पन्न झालेले सगळे लोक सुंदर आकृतीचे, वज्राप्रमाणें स्थिर अस्थिबंधाचे व कांतीनें देवाप्रमाणें असतात. येथपर्यंत वर्णिल्याप्रमाणें जेथें अत्यंत सुख आहे अशा त्या उत्तरकुरुक्षेत्रांत, श्रीमती व वज्रजंघ या उभयतांचा पात्रदानाच्या प्रभावानें जन्म झाला. यानंतर एके समयीं वज्रजंघ आर्य आपल्या कांतेसह भोगभूमींतील कल्पवृक्षांची शोभा पहात असतां, त्यांनीं

---

**टीप १:**-- ऊस, लिंबू व इतर अनेक औषधि द्रव्यापासून हे तयार करितात. अर्थात् त्यात निरनिराळ्या प्रकारच्या वृक्षांचे रस असतात त्या रसांत काम उद्दिपन करण्याचा गुण असतो. ह्मणून त्याना मद्य असे येथें उपचारानें ह्मटलें आहे. भोगभूमींत कल्पवृक्षापासून मिळणारे जे मद्य आहे ते खरोखर मद्य नसून वृक्षाचा रस आहे

सूर्यप्रभ नांवाच्या देवाचें विमान पाहिलें. त्यायोगें त्या दोघांना पूर्वजन्माचें स्मरण होऊन आपण कोण हें समजलें. इतक्यांत, वज्रजंघानें दोघे चारणमुनीश्वर आकाशातून खालीं आपल्याकडे येत आहेत असें पाहिलें. मुनींच्या चरणकमलांस अर्घ्य देऊन त्या दांपत्यानें भक्तीभावानें नमस्कार केला. नंतर वज्रजंघानें मुनीश्वरास प्रश्न केला कीं, " हे भगवन्, आपण कोठें जन्मलांत ? कोठें असतां ? आपल्या आगमनाचा हेतु काय ? आपणांस पहातांच माझ्या मनांत स्नेहभाव उत्पन्न झाला याचें कारण काय ? हें सगळें वृत्त मला कृपा करून सांगा."

तें ऐकून त्या दोघांपैकीं श्रेष्ठ मुनी ह्मणाले, " हे वज्रजंघ-आर्या, तूं मला ओळख. तूं महाबल विद्याधर होतांस तेव्हां मी स्वयंबुद्ध मंत्री होतों. माझ्या उपदेशानें तूं प्रबुद्ध झालास. त्यायोगें संपूर्णकर्मांचा नाश करणाऱ्या ह्या जैनधर्माचें तुला ज्ञान झालें. पुढें तुझा व माझा वियोग झाला. व मी जिनदीक्षा घेतली. मरणानंतर मी सौधर्म कल्पांत देव होऊन जन्मलों. तेथील आयुष्य संपल्यावर तेथून च्यवून, पुनः भूलोकीं या पूर्व विदेहक्षेत्रातील पुष्कलावती देशांतल्या पुंडरीकिणी नगरीचा राजा जो प्रियसेन, त्याच्या सुंदरी नांवाच्या देवीच्या उदरीं प्रीतिंकर नांवाचा ज्येष्ठ पुत्र होऊन जन्मलों. हा दुसरा महातपस्वी मुनी प्रीतिदेव नांवाचा माझा कनिष्ठ बंधु होय. पुढें आह्मी दोघांनीं स्वयंप्रभ जिनाजवळ दीक्षा घेतली. त्यानंतर आह्मास तपश्चर्येच्या बळानें अवधिज्ञान व आकाशांतून चाल-

---

टीप १:—मर्यादित क्षेत्रांतील रूपी पदार्थांना प्रत्यक्ष जाणते त्याला अवधि-ज्ञान म्हणतात]

ण्याची ऋद्धि हीं प्राप्त झाली. अवधिज्ञानानें तुझा शोध करून, तूं येथें आर्य होऊन जन्मला आहेस असें समजतांच, तुला बोध करण्याकरितां आह्मी येथें आलों आहोंत. हे आर्या, तुझें **सम्यग्दर्शन** शुद्ध नव्हतें, तरी तूं **सत्पात्रदानाच्या प्रभावानें** या कुरुक्षेत्रांत येऊन जन्मला आहेस. तूं महाबल होतास तेव्हां माझ्या उपदेशानें देहाविषयीं निस्पृह झालास; पण त्यावेळीं भोगाच्या ठिकाणीं तुझी आसक्ति असल्यामुळें, तुला सम्यग्दर्शनाच्या ठिकाणीं शुद्धि मिळाली नाहीं; ह्मणजे, तूं फक्त तेव्हां दार्शनिक झालास. परंतु, स्वर्गमोक्षाचें साधन असें जें '**सम्यग्दर्शन**' तें तुला झालें नाहीं; तें तुला व्हावें ह्मणून आह्मीं येथें आलों आहोंत. आतां तूं प्रथमचें ह्मणजे उपशमसम्यक्त्व ग्रहण कर. तें प्राप्त होण्याला आतांच तुझा काल अनुकूल आहे. कारण, काललब्धिवांचून संसारी जीवांस सम्यक्त्व प्राप्त होत नाहीं. गुरूपदेश, काललब्धि वगैरे हीं जी सम्यक्त्व प्राप्त होण्याचीं बाह्यकारणें, व अंतरंग कारण म्ह० दर्शनमोहाचा उपशम, क्षयोपशम किंवा क्षय अशी दोन प्रकारची सामुग्री जमली ह्मणजे भव्यात्मा जो आहे तो विशुद्धदृष्टि (सम्यग्दृष्टि) होतो. अनादिकालापासून जडलेल्या मिथ्यात्वकलंकानें ज्याचा आत्मा कलुषित झाला आहे अशा प्राण्याच्या दर्शनमोहकर्माचा उपशम होऊन, तो जें सम्यक्त्व ग्रहण करितो तें 'उपशमसम्यक्त्व' होय. मोहाचा उपशम झाला ह्मणजे जीवादिक पदार्थ यथार्थ दिसूं लागतात. आणि त्यायोगें त्याला सम्यग्दर्शन प्राप्त होतें. मिथ्यात्वरूपी अंधःकाराचा नाश केल्यावांचून सम्यग्दर्शन उद-

यास येत नाहीं. आप्त ह्मणजे सर्वज्ञ, वीतराग, आगम ( वीतरागाच्या मुखांतून प्रकट झालेलें शास्त्र ), जीवादि सात तत्त्वें व नऊ पदार्थ यांचें श्रद्धान करणें याला 'सम्यग्दर्शन' ह्मणतात. हें सम्यग्दर्शन ज्ञान व चारित्र यांचें मूळ आहे. हें तीन मूढतारहित व आठ अंगांनीं युक्त असावें. प्रशम ( परम शांतभाव ), संवेग ( संसारपरिभ्रमणाची भीति ), आस्तिक्य ( आप्त, श्रुत व तत्व हीं आहेत असें समजणें ) व अनुकंपा ( दया ) हे सगळे गुण सम्यक्त्वी जीवास असले पाहिजेत. हे आर्या, १ तूं जैनमार्गात संशय बाळगूं नको; २ भोगांची इच्छा सोडून दे; ३ रत्नत्रयांनीं युक्त अशा सम्यग्दृष्टीच्या शरीरमलाविषयीं किळस करूं नको; ४ कुमार्गानें वागूं नको; ५ स्वधर्मी लोकाचे दोष उघडकीस न आणतां ते झांकून ठेव; ६ स्वधर्मांतला मनुष्य कदाचित् धर्मभ्रष्ट झाल्यास त्याला उपदेश देऊन पुनः सन्मार्गी लाव; ७ रत्नत्रयानें युक्त अशा जैनसंघावर वात्सल्य ठेव किंवा धर्मबंधूंवर प्रेम कर, व ८ जैनधर्माची प्रभावना यथाशक्ति करीत जा. या आठ अंगानीं तुझें दर्शन सम्यग्दर्शन होईल.

१ देवमूढ ( रागद्वेषपरिणामी देवाची पूजा ), २ पाखंडमूढ ( मिथ्या व मायाचारी तपस्वीची सेवा ) व ३ लोकमूढ ( जैनशास्त्राविरुद्ध लोकाचार ) अशी तीन प्रकारची मूढता आहे. ती तूं सोडून दे. मोक्षप्रासादावर चढण्यास सम्यग्दर्शन हें प्रथमचें

---

**टीप १** —निःशंका, निष्कांक्षा, निर्विचिकित्सता, अमूढदृष्टित्व, उपगूहन, स्थितिकरण, वात्सल्य व मार्गप्रभावना या आठ गुणांस सम्यक्त्वाचीं आठ अंगें ह्मणतात.

सोपान आहे. सम्यग्दर्शनी जीवाचा दुर्गतींत जन्म कधींच होत नाहीं. तात्पर्य, सम्यग्दर्शन प्राप्त झालें ह्मणजे हा अनंत असाहि संसार तत्काळ सांत ( संपणारा ) होतो. आसन्नभव्य असा तू पुढें होणारा तीर्थनायक आहेस. ह्मणून वा वज्रजंघा, तू जिनाची आज्ञा प्रमाण मानून अनन्यशरण ( जिनाशिवाय आपलें रक्षण करणारा दुसरा कोणीच नाहीं अशा बुद्धिचा ) होऊन सम्यग्दर्शनाचा स्वीकार कर. " नंतर ते मुनी श्रीमतीस ह्मणाले, " हे अंबिके, सम्यग्दर्शनाची आराधना करून तू ही स्त्रीत्वाचा उच्छेद कर. कारण, सम्यग्दृष्टी जीव स्त्री होऊन जन्मत नाहीं, नरकास जात नाहीं, किंवा अन्य कोणत्याही नीच योनींत जन्म पावत नाहीं. निर्ग्रंथ दीक्षा घेण्यास प्रतिबंध करणाऱ्या या स्त्रीत्वाचा धिक्कार असो ! ह्मणून, तू लौकर सम्यग्दर्शन प्राप्त करून घे. तुह्मी दोघे जेथें क्रमानें नरेंद्र, देवेंद्र व शेवटीं मोक्षगतीचा बंध ज्यांत होईल अशा कित्येक भवांनी ध्यानबळानें कर्मनाश करून निर्वाणपदास पोंहचाल. " याप्रमाणें प्रीतिंकर आचार्यांचें वचन प्रमाण मानून, त्या उभयतांनीं संतुष्ट चित्तानें सम्यग्दर्शनाचा स्वीकार करून, मोठ्या भक्तीनें मुनीश्वरास नमस्कार केला. नंतर ते आकाशातून विहार करणारे चारणमुनि, 'तू सद्धर्मास विसरूं नकोस.' असें पुनः पुनः सांगून व त्यांना आशिर्वाद देऊन तत्काळ तेथून अदृश्य झाले. त्यांच्या वियोगानें वज्रजंघास वाईट वाटलें. कारण, 'प्रेयसां विप्रयोगोहि मनस्तापाय कल्प्यते।' ह्मणजे, प्रिय माणसाच्या वियोगानें मनस्ताप हा होतोच. त्यावेळीं तो आपल्या मनाशींच ह्मणाला,

ज्याअर्थी गुरूच्या उपदेशानें आमच्या सम्यग्दर्शनाची शुद्धि झाली त्याअर्थी आह्मांस गुरुपदाची भक्ति जन्मजन्मांतरींही प्राप्त होवो.'' गुरुमाहात्म्याचें याप्रमाणें चिंतवन केल्यानें त्याच्या सम्यक्त्वाची भावना दृढ झाली. श्रीमतीही त्याच्याप्रमाणेंच भावना करून सम्यक्त्वानें त्याच्या बरोबरीची झाली. याप्रमाणें भोगभूमींतील कल्पवृक्षांपासून प्राप्त होणाऱ्या भोगांचा अनुभव घेणाऱ्या त्या दंपतीचें तीन पल्य प्रमाणाचें आयुष्य संपल्यावर त्यांनीं सुखानें प्राणत्याग केला. आणि तेथें अवशिष्ट राहिलेल्या पुण्यबळानें त्या दोघांचाही ऐशान कल्पांत जन्म झाला. येथें लक्षांत ठेवण्यासारखी मुख्य गोष्ट ही कीं, सत्पात्रीं दान देणाऱ्या महात्म्यानें भोगभूमींत पुष्कळ काळ अनायासें प्राप्त होणारा सुखानुभव घेतला तरी त्याचें पुण्य संपत नाहीं. तेव्हां उरलेल्या पुण्याचें फळ अनुभविण्याकरितां तो पुनः स्वर्गलोकीं जाऊन तेथेंही दीर्घ काल आपोआप प्राप्त होणारीं दिव्य सुखें अनुभवितो. हा सगळा **पात्रदानाचा प्रभाव** आहे. असो. वज्रजंघ हा ऐशान स्वर्गांतील श्रीप्रभ विमानांत **श्रीधर** नांवाचा देव झाला. व श्रीमतीचा जीव ही सम्यक्त्वप्रभावानें स्त्रीलिंग छेदन करून त्याच स्वर्गांतल्या स्वयंप्रभ विमानांत **स्वयंप्रभ** नांवाचा उत्तम देव झाला. धर्ममाहात्म्य दाखविण्याकरितां येथें आचार्य वाचकांना उपदेश करितातः—

**ऋते धर्मात्कुतः स्वर्गः कुतः स्वर्गादृते सुखम् ।**
**तस्मात्सुखार्थिनां सेव्यो धर्मकल्पतरुश्चिरम् ॥ ८८ ॥**

**अर्थः**—धर्माशिवाय स्वर्ग कोठून मिळणार? व स्वर्गाशिवाय

सुख कसें मिळणार ? ह्मणून, सुखाची इच्छा करणाऱ्यांनीं निरतर धर्मरूपी कल्पतरूची सेवा करावी. पुण्योदयाच्या योगानें स्वर्गसुख अनुभविणाऱ्या त्या **श्रीधर** आदि देवाचें रूप, सौंदर्य व भोग वगैरेंचें वर्णन पूर्वीं ललितांगाचें जें वर्णन केलें आहे त्याप्रमाणेंच जाणावें. अत्यंत निर्मल व देदीप्यमान शरीर धारण करणारा हा देवश्रेष्ठ भावी तीर्थंकर श्रीधरदेव आपल्या विमानांतील स्त्रियांसह अनेक प्रकारचे भोग अनुभवून संतुष्ट व तृप्त झाला.

## पर्व १० वें.

### श्रीमदच्युतेंद्रैश्वर्यवर्णन.

नंतर एके दिवशीं अवधिज्ञानाच्या योगानें या श्रीधर देवास असें कळून आलें कीं, आपल्या उपदेशदात्या गुरुला श्रीप्रभ नांवाच्या पर्वतावर केवलज्ञान प्राप्त आलें आहे. तेव्हां आपल्या जन्मजन्मांतरींच्या गुरूची ( प्रीतिंकर ) पूजा करण्याकरितां तो निघाला. तेथें गेल्यावर प्रथम त्यानें सर्वज्ञ मुनींचें पूजन करून धर्मश्रवण केलें. नंतर त्यानें त्या सर्वश्रेष्ठ मुनीस विचारिलें कीं, 'हे भगवन्, मी महाबल विद्याधर असतांना माझे जे मिथ्यादृष्टि तिघे मंत्री होते ते हल्लीं कोठें जन्मले

टीप १:—त्रैलोक्यांतील सर्व पदार्थांचें हस्तामलकवत् विशद व पूर्ण ज्ञान होणें याला जिनागमांत '**केवलज्ञान**' असें ह्मटलें आहे व हें ज्ञान ज्यांना प्राप्त झालें आहे त्यांस 'केवलि' मुनि असें ह्मणतात.

आहेत ? व ते कोणत्या गतीस पावले आहेत ?' श्रीधरदेवाचा तो प्रश्न ऐकून सर्वज्ञ केवली मुनि ह्मणाले, "तूं महाबल मरून स्वर्गास गेल्यावर आह्मी दीक्षा घेतली. आणि ते तिघे मिथ्यादृष्टि मंत्री दुर्मरणानें दुर्गतीस गेले. त्या तिघांपैकीं संभिन्नमति व महामति हे दोघे गाढ व अंधःकारमय अशा निगोदास गेले. व तिसरा शतमति हा मिथ्यात्वपरिपाकानें दुसऱ्या नरकास गेला. मोक्षमार्गाचे विरोधी असे मिथ्यात्वी जीव दीर्घकालपर्यंत नीच योनींच्या फेऱ्यात सापडतात. सर्वज्ञ उक्ति अशी आहे कीं:—

धर्मेणात्मा व्रजत्यूर्ध्वमधर्मेण पतत्यधः ।
मिश्रस्तु याति मानुष्यमित्याप्तोक्तिं विनिश्चिनु ॥१३॥

ह्मणजे, हा आत्मा धर्मानें उर्ध्वगतीस पावतो; अधर्मानें नरकास जातो; व धर्म आणि अधर्म यांनीं मिश्र जो आत्मा तो मनुष्यगतीस जातो. ही आप्तोक्ति सत्य मान. आचार्य ह्मणतात,

धर्मात्सुखमधर्माच्च दुःखमित्यविगानतः ।
धर्मैकपरतां धत्ते बुधोऽनर्थजिहासया ॥ ॥ १४ ॥

अर्थात्, धर्मापासून सुख होतें व अधर्मापासून दुःख होतें हें अगदीं निर्विवाद आहे. ह्मणून, पंडित जो असतो तो अनर्थ ह्म० दुःख जिंकण्याकरितां धर्माविषयीं नेहमीं तत्पर असतो. आता येथें आगमकार धर्मलक्षण सांगतात:—

धर्मः प्राणिदया सत्यं क्षान्तिः शौचं वितृष्णता ।
ज्ञानवैराग्यसम्पत्तिरधर्मस्तद्विपर्ययः ॥ १५ ॥

---

टीप१:—कर्मांचें फळ जेव्हा उदयास येत् तेव्हा त्यास 'परिपाक' किंवा 'विपाक' असें ह्मणतात.

**अर्थः**—प्राणिमात्रांच्या ठायीं दया करणें, सत्य आचार विचार ठेवणें, क्षमाभाव धरणें, शुद्ध(निर्लोभ)असणें, विषयभोगांची तृष्णा कमी करणें, ज्ञानसंपादन करणें व संसारापासून विरक्त होणें याला '**धर्म**' ह्मणतात. याच्या उलट जो व्यवहार तो सगळा '**अधर्म**' होय. अधर्मी अर्थात् पापरत झालेला जीव नरकास जातो. नरकात दुःख कोणत्या प्रकारचें असतें, तेथें जीवाची उत्पत्ति कशामुळें होतें हें तुला सागतो तें ऐक—

हिंसा, चोरी, लबाडी, परस्त्रीगमन, अधिकपरिग्रह, मद्यपान, मिथ्या देवांची पूजा, क्रूरपणा, रौद्रध्यान, प्राण्यांच्या ठिकाणीं निर्दयता, धर्मद्वेष, अधर्म वाढविणें, सज्जनांशीं द्वेष, मात्सर्य, धर्मशील अशा दिगंबर मुनीवर विनाकारण रागावणें, हिंस्र पशु बाळगून त्यांना पोसणें, अत्यंत पापाचरण, मध व मांस भक्षण करणें व हिंसानंद हीं व आणखी अशाच प्रकारचीं पुष्कळ पातकें करणारा जीव पापभारानें नरकास जातो. नरक हें दुष्कृत्याचा परिपाक होण्याचें स्थान आहे. १ रत्नप्रभा, २ शर्करप्रभा, ३ वालुकप्रभा, ४ पंकप्रभा, ५ धूमप्रभा, ६ तमप्रभा व ७ तमस्तमःप्रभा अशा सात नरकभूमि एका खालीं एक अशाक्रमानें आहेत. नारकी जीव अधोमुख ( खालीं तोंड व वर पाय ) होऊन जन्मतात. उघडच आहे कीं, पापी जीवांस उन्नति कशानें मिळणार ? नरकांत गेल्यावर तेथें एका अंतर्मुहूर्त कालातच अत्यंत दुर्गंधानें भरलें आहे असें वाईट आकाराचें व चिळसवाणें शरीर नारकी जीव धारण करितात. त्यानंतर तेथील इतर नारकी जीव तीव्र अशा शस्त्रांनीं नवीन उत्पन्न झालेल्या

नारकी जीवांच्या शरीरांचे तुकडे तुकडे करितात ? याप्रमाणें छिन्नभिन्न झालेले ते तुकडे पुनः यष्टयाघातानें दुभंग झालेल्या जलाप्रमाणें एकवटून जाऊन शरीराच्या पूर्वरूपास पावतात. नारकी जीव पूर्वीचें एकमेकासंबंधीं वैर एकमेकांस सांगून तदनुरूप दंड एकमेकांस करीत असतात. पहिल्या चार नरकापर्यंतच्या नारकी जीवांना तेथील भयंकर असुर एकमेकांच्या पूर्वीच्या वैराची आठवण करून देऊन युद्ध करावयास लावितात. ज्यांनीं पूर्वी मांसभक्षण केलें होतें अशा जीवांस दुसरे बलिष्ठ नारकी जीव मिळून तीव्र शस्त्रांनीं त्यांच्या अंगातलें मांस काढून त्यालाच तें खावयास लावितात. तसेंच तापविलेल्या लोखंडाचा गोळा बलात्कारानें त्यांच्या घशांत घालितात. पूर्वजन्मीं परस्त्रीशीं संभोग केलेल्या जीवांस तापवून लाल केलेल्या लोखंडाच्या पुतळीजवळ बलात्कारानें नेऊन तिजबरोबर आलिंगन करवितात. सारांश, नारकी जीवांस निमिषमात्र सुद्धां सुख नसून उलट दुःसह अशी नरकांतील भयंकर यातना रात्रंदिवस सोसावी लागते. सातव्या नरकांपैकीं सहाव्या व सातव्या नरकभूमींत शीत आहे. पांचवींत शीत व उष्ण हीं दोन्हीं आहेत. व पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या व चौथ्या भूमींत उष्ण आहे. या सात नरकभूमीमध्यें नारकी जीवांचीं राहण्याचीं लाखों विळें आहेत. तीं फार मोठीं व सर्वदा तापलेलीं असतात. त्यांत नारकी जीवांची स्थिति एखाद्या भांड्यांत घालून शिजविल्याप्रमाणें होते. नारकी जीव विकल अंगाचे, चांभाराच्या घरांतील कोथळ्याच्या आकाराचा देह धारण करणारे, नपुंसक,

दुर्गंधी, कृष्णवर्णाचे, कर्कश स्वराचे व दुःस्पर्श असे प्राणी असतात. नारकी जीवांस विक्रिया असते, पण पापकर्माच्या उदयामुळें ती अपृथक् असते. ह्मणजे ते आपल्या देहासच पाहिजे त्या प्रकारचे विकार करण्यास समर्थ असतात. देवाप्रमाणें निराळें रूप धारण करण्यास ते समर्थ नसतात. त्यामुळें त्यांची ती देहविक्रिया कुरूप व दुर्गंध अशी होत असते. त्यांनीं शरीर पूर्णपणें गृहण केल्यानंतर त्यांना विभंग नांवाची अवधि प्राप्त होते. त्या विभंगावधीनें ते जीव अन्य जन्मींचें वैर स्मरण करून तें वारंवार मोठ्यानें घोकित असतात. हे नारकी जीव पूर्वजन्मीं पापकृत्यें करण्यांत अत्यंत निष्णात व दुराचारी असतात ह्मणून त्या सर्व पातकांचा तेथें भयंकर असा परिपाक होतो. हे श्रीधरदेवा, तुझा मिथ्यादृष्टी शतबुद्धि मंत्री पापकर्मानें दुसऱ्या नरकांत भयंकर दुःख भोगित आहे. हा भयंकर दुःखमय नरक ज्यांना नकोसा वाटतो त्यांनीं जिनधर्माची उपासना करावी. कारण,

धर्मः प्रपाति दुःखेभ्यो धर्मः शर्म तनोत्ययम् ।
धर्मो नैःश्रेयसं सौख्यं धत्ते कर्मक्षयोद्भवम् ॥ १०७ ॥

अर्थः—जिनधर्म हा दुःखांपासून सोडवून पालन करणारा आहे. संसारांतही सुख देणारा व शेवटीं कर्मक्षयापासून प्राप्त होणारें मोक्षसुखहि देणारा हा जिनधर्मच आहे. इंद्रपद, चक्रवर्तीपद, गणधरपद, तीर्थंकरपद व सिद्धपद हीं सर्व जिनधर्मापासूनच प्राप्त होतात. ह्मणून तूं ह्या धर्माच्या ठिकाणीं आपली बुद्धि ठेव." प्रीतिंकर जिनाचा हा उपदेश ऐकून श्रीधरदेव धर्मावर फारच प्रेम करूं लागला. नंतर तो गुरूच्या आज्ञेनें

दुसऱ्या नरकांत जाऊन तेथें शतबुद्धीस ह्मणाला, 'हे शतबुद्धे, मी महाबल विद्याधर आलों आहें. कुतर्कामुळें तुझें मिथ्यात्व फारच दृढ झालें होतें. त्या पातकाच्या भयंकर फळाचा आतां तूं प्रत्यक्ष अनुभव घेत आहेस. ह्मणून, आतां तरी सम्यग्दर्शनाचा स्वीकार कर.' श्रीधरदेवाचा हा उपदेश ऐकून शतबुद्धीनें सम्यग्दर्शनाचा स्वीकार केला. त्यामुळें त्याचा मिथ्यात्वमल दूर होऊन तो अतिशय शुद्ध झाला. नंतर नरकांतलें सगळें आयुष्य संपल्यावर, तो शतबुद्धि नांवाचा नारकी जीव पूर्वविदेह क्षेत्रांतील मंगलावती देशामध्यें असलेल्या रत्नसंचय नगरीचा राजा जो महीधर चक्रवर्ती, त्याच्या सुंदरी नामक देवीच्या उदरीं जन्म घेऊन जयसेन नांवाचा पुत्र झाला. पुढें त्याच्या विवाहसमयीं पुन: श्रीधरदेव तेथें येऊन त्यानें त्याला उपदेश केला. त्यामुळें त्यानें यमधर मुनिजवळ जिनदीक्षा घेऊन घोरतपश्चरण केलें. त्यानंतर अंत:कालीं समाधि (शुद्धपरिणामयुक्त) मरण साधून तो जयसेन मुनि ब्रह्मस्वर्गांत इंद्र झाला. पहा! तो नारकी जीव कोठें! व पुनः तोच हा इंद्रपदास पावलेला देव कोठें! कर्माची गति मोठी विचित्र आहे. नंतर ब्रह्मलोकाहून खालीं येऊन, त्या अवधिज्ञानी देवानें आपल्या हितोपदेश दात्या श्रीधर देवाची पूजा केली. श्रीधरदेव स्वर्गांतून चवून, जंबूद्वीपांतील विदेह क्षेत्रांत जो महावत्स देश आहे तेथील सुसीमा नगरींत सुदृष्टि राजाच्या सुंदरनंदा देवीच्या उदरीं सुविधि नांवाचा पुत्र होऊन जन्मला. तो मोठा बुद्धिवान् असल्यामुळें बालपणींच जिनोक्त धर्म जाणून त्यांत त्यानें नैपुण्य संपादिलें. त्यानें आपल्या वयाच्या योग्य-

कालीं पित्याच्या आग्रहामुळें राज्यलक्ष्मी व स्त्री इत्यादि परिग्रहांचा स्वीकार केला. सुविधिराजा हा अभयघोष चक्रवर्तीचा भाचा होय. त्याचें आपल्या मामाच्या ( अभयघोषाच्या ) मनोरमा नामक कन्येशीं लग्न झालें. ती सुशील व आज्ञाधारक असल्यामुळें त्या उभयतांचा पुष्कळ काळ मोठ्या आनंदांत लोटला. स्वर्गीं असलेला स्वयंप्रभ देव चवून यांचा केशव नामक पुत्र होऊन जन्मला. हा सुविधि राजा पूर्वीं एका जन्मांत वज्रजंघ होता. त्यावेळीं त्याची आवडती स्त्री जी श्रीमती तीच आतां याच्या पुत्रत्वास पावली. संसाराची स्थिति अशीच चमत्कारिक आहे ! असो.

१ सम्यग्दर्शन, २ निरतिचारव्रतें, ३ सामायिक, ४ प्रोषधोपवास, ५ सचित्तवस्तुत्याग, ६ दिवसा ब्रह्मचर्य, ७ सर्वदा ब्रह्मचर्य, ८ आरंभत्याग, ९ परिग्रहत्याग, १० अनुमतित्याग व ११ उद्दिष्टत्याग हीं गृहस्थांचीं अकरा स्थानें (प्रतिमा) जिनानें सांगितलीं आहेत. तो सुविधि राजा क्रमानें अकरा प्रतिमाधारी उत्कृष्ट श्रावक बनला. गृहस्थाश्रमी श्रावकास पांच अणुव्रतें, तीन गुणव्रतें व चार शिक्षाव्रतें मिळून बाराव्रतें जिनागमांत सांगितलीं आहेत. तीं अशीं:—

१ द्वींद्रियापासून पचेंद्रियपर्यंतच्या प्राण्यांची हिंसा न करणें, २ असत्य भाषण न करणें, ३ चोरी न करणें, ४ परस्त्रीसेवन न करणें व ५ धनधान्यादि पदार्थांची अधिक अभिलाषा न करणें हीं पांच अणुव्रतें होत. हीं अणुव्रतें स्थिर राहण्याक-

---

टीप १:—हिंसानृतस्तेयाब्रह्मपरिग्रहेभ्यो विरतिर्व्रतम् ।
( तत्वार्थसूत्र अ. ७. सूत्र १. )

रितां प्रत्येकाच्या पांच पांच भावना सांगितल्या आहेत. (उमास्वामीकृत तत्वार्थसूत्र अ. ७ वा. सूत्र ३ ते ८ पहा.)

१ दिग्विरति (दिशांची मर्यादा करून तिच्यापलीकडे न जाणें), २ अनर्थदंडविरति (विनाकारण एकेंद्रिय जीवांचा ही वध न करणें) व ३ देशविरति (अणुव्रतांत व गुणव्रतांत यावज्जीवपर्यंत ज्या मर्यादा केल्या त्यांतूनही अलीकडे इ० देश, नदी, पर्वत वगैरेंच्या मर्यादा करून त्या पलीकडे जाण्याचा त्याग करणें) अशीं तीन **गुणव्रतें** आहेत. भोग्य व उपभोग्य असे जे पदार्थ त्यांचें प्रमाण करणें हें ही भोगोपभोगपरिमाण नांवाचें तिसरें गुणव्रत होय. आतां चार शिक्षाव्रतांचें वर्णन करितों.

१ समताभाव धरणें अथवा त्रिकाल सामायिक करणें, २ प्रोषधोपवास करणें, ३ अतिथीकरितां आहाराचा विभाग करून ठेवणें, व ४ अंतकालीं शरीरभोगांविषयीं निस्पृह होउन संन्यासानें मरण साधणें हीं **चार शिक्षाव्रतें** सांगितलीं आहेत. येथपर्यंत दुर्गतीला प्रतिबंध करणारीं व स्वर्गमोक्षाला नेणारीं हीं जीं गृहस्थाचीं **बाराव्रतें** त्यांचें थोडक्यांत वर्णन केलें. असो. ह्या **सुविध** राजर्षीनें सम्यग्दर्शनानें शुद्ध अशीं हीं श्रावकांचीं बारा व्रतें पाळून, अंतसमयीं निर्ग्रंथदीक्षा घेऊन व सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र यांची उत्तम प्रकारें आराधना करून समाधीनें देहत्याग केला. त्यायोगें तो अच्युत कल्पांत सर्व प्रकारच्या ऋद्धींनीं संपन्न असा इंद्र झाला. त्याचा पुत्र जो केशव तोही अंतर व बाह्य परिग्रहांचा त्याग करून, मुनिदीक्षा घेऊन मरणानंतर अच्युत कल्पांतच प्रतींद्र झाला. अत्यंत

सुंदर असा वैक्रियक देह धारण केलेला तो अच्युतेंद्र तेथें नित्य आठ प्रकारचें ऐश्वर्य व दिव्य भोग अनुभवित असे. अच्युतेंद्राच्या उपभोगाकरितां १५९ विमानें असतात. या इंद्राच्या तीन सभा असतात. पहिली अंतरसभा, तेथें सेवेंत तत्पर असणारे १२५ देव असतात. मधल्या सभेंत २५० देव असतात. व बाहेरच्या सभेंत ५०० देव असतात. अच्युतेंद्राचा प्रवीचार ( रतिक्रीडा ) मानसिक असतो. ह्मणजे मनानें विषयांचें स्मरण केल्याबरोबर तृप्ति होते. त्यांचा आहारही मानसिकच. तेथें सुंदर देवांगना येऊन उत्तम अभिनय व हावभाव करून अच्युतेंद्राची करमणूक करित असतात. अच्युतेंद्रास पूर्वजन्मीं आचरिलेल्या धर्मानेंच हें पद मिळालें हें वाचकानीं येथें ध्यानांत ठेवावें. याप्रमाणें आपल्या विमानांत नाना प्रकारचें दिव्य भोग भोगणारा तो अच्युतेंद्र आपल्या प्रियेसह नित्य जिनेंद्रपूजा करित दीर्घकालपर्यंत तेथें रममाण झाला.

---

# पर्व ११ वें.

## भगवद्वज्रनाभिसर्वार्थसिद्धिगमनवर्णन.

नंतर स्वर्ग सोडून भूलोकीं यावयाच्या सुमारास त्या अच्युतेंद्राच्या अंगावरील पूर्वी कधींच म्लान न झालेली मंदार पुष्पमाला म्लान झाली. त्यावरून त्याची अशी खात्री झाली कीं, आतां आपण या स्वर्गांतून चवून भूलोकीं जाणार. आयुष्य महा

महिन्यांचें उरलें त्या दिवसापासून त्यानें अरहंताची पूजा करण्यास आरंभ केला. त्यानें आपलें बाकीचें आयुष्य पंचपरमेष्ठींच्या ठिकाणीं आपलें चित्त एकाग्र ठेवून घालविलें. स्वर्गाचे देव मोठे धैर्यशाली, अणिमा वगैरे ऋद्धींनीं युक्त व सर्वदा सुखांत असणारे असे असतात. तरी पण, तेही तेथून च्यवून भूलोकीं येतात! तेव्हां या संसाराच्या स्थितीस धिकार असो ! त्यानंतर तो अच्युतेंद्र तेथून च्यवून, पुष्कलावती देशांतील पुंडरीकीणी नगरीचा राजा जो वज्रसेन त्याच्या श्रीकांता नामक देवीच्या उदरीं **वज्रनाभि** या नावाचा पुत्र झाला. पूर्वी ह्मणजे हा वज्रनाभि जेव्हा सुविधि राजा होता त्यावेळीं त्याचा पुत्र जो केशव व त्यानंतर जो अच्युत स्वर्गांत प्रतींद्र झाला होता तो ही याच पुंडरीकीणी नगरींत कुबेरदत्त नांवाच्या राजश्रेष्ठीच्या अनंतमती स्त्रीच्या उदरीं **धनदेव** नावाचा पुत्र झाला हाच जीव पूर्वी वज्रजंघाची स्त्री श्रीमती होता. वज्रनाभीनें धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थांस साधनीभूत अशा चार राजविद्यांचा चांगला अभ्यास करून त्यांत प्राविण्य संपादिलें होतें. (१ आन्वीक्षिकी-आपल्या देहाचें रक्षण करणें वगैरे; २ त्रयी--धर्माधर्मविचार; ३ दंडनीति-- दोषास योग्य तितकाच दंड; व ४ वार्ता--असि, मसि वगैरे. ह्या चार राजविद्या होत. ) वज्रसेन राजानें याची योग्यता जाणून सगळें राज्य चालविण्याचा अधिकार यासच देण्याचें ठरविलें. व त्याप्रमाणें आपल्यासमक्ष **वज्रनाभीस** मुकुटबद्ध राजे व प्रधान मंडळी यांच्या हातून पट्टबंध व राज्याभिषेक करविला. त्यानंतर लौकांतिक देवांनीं बोध केल्या-

वर वज्रसेन महाराजानीं जिनदीक्षा घेतली. व ध्यानरूपी अस्त्रानें कर्मरूपी शत्रूचा नाश केला. इकडे, वज्रनाभीनें सपूर्ण पृथ्वी जिंकिली. नतर दीर्घकालपर्यंत या पट्खड पृथ्वीचें राज्य भोगून गुरूपदेश घेतला त्यामुळें हे साम्राज्य तृणवत् तुच्छ वाटून त्यानें वज्रदंत नावाच्या पुत्रास राज्य देऊन सोळा हजार राजे, एक हजार पुत्र, आठ बधु व धनदेव श्रेष्ठी याच्यासह आपल्या गुरूजवळ जिनदीक्षा घेतली. त्या दिगबर मुनीनें प्राणिवध, मिथ्याभाषण, चौर्य, परिग्रह व स्त्रीसग हीं पाच महापातकें मनवचनकायेनें यावज्जीव सोडिलीं. तसेंच त्यानें पाच समिति व तीन गुप्ति धारण केल्या. नतर निर्मल अशा सम्यग्दर्शनानें युक्त होऊन तो पृथ्वीवर एकटाच विहार करू लागला. पुढें त्या वज्रनाभि मुनीनें तीर्थंकरत्व प्राप्त होण्यास साधनीभूत अशा सोळा भावना उत्तम प्रकारें भाविल्या. तपश्चरणाच्या प्रभावानें त्याला अणिमा वगैरे गुणानीं युक्त अशी विक्रिया ऋद्धि, अक्षीण ऋद्धी (ज्याला ही ऋद्धि प्राप्त झाली आहे अशा मुनीनें आहार करून शेष राहिलेले अन्न त्यादिवशीं कितीही लोकानीं भक्षण केलें तरी तें सपत नाहीं असा या ऋद्धीचा प्रभाव आहे.) चलऋद्धी वगैरे अनेक प्रकारच्या ऋद्धी ही प्राप्त झाल्या. पुढें त्या मुनीनें आपल्या आयुष्याच्या अवसान कालीं श्रीप्रभ पर्वतावर जाऊन तेथें सन्यास धारण करून आहाराचा त्याग केला. मोक्षमार्गापासून च्युत होऊ नये व कर्मनिर्जरा व्हावी अशी

---

टीप.—षोडशकारणभावनचें वर्णन पुढें आलेच आहे
पान ४३ ते ४४ पहा

इच्छा बाळगणाऱ्या त्या वज्रनाभीनें भूक, तहान, थंडी, उष्ण, मशक वगैरेंचा दंश, नग्नपणा, अरति, स्त्रैण (स्त्रीसंबंधी) चर्या, शय्या, निषद्या, आक्रोश, वध, याचना, अलाभ, अदर्शन, रोग, तृणस्पर्श, प्रज्ञा, अज्ञान, मल व सत्कारपुरस्कार हे बावीस **परिषह** सहन केले. येथें आचार्य या परिषहांस जिंकण्याचा प्रकार सांगतात. तो असाः—

१ **क्षुत्परिषहजयः**—भूक लागली असतां त्यावेळीं निर्दोष असा आहार न मिळाल्यामुळें भूकेची वेदना नष्ट झाली नाहीं तरी ही अयोग्य कालीं किंवा अयोग्य ठिकाणीं आहार घेण्याची इच्छा न करितां ती वेदना सहन करणें, आहार न मिळाल्यामुळें व्याकुळता आली तरी ज्ञानाभ्यास व ध्यान करण्यांतच लीन होणें याला क्षुत्परिषहजय ह्मणतात.

२ **पिपासापरिषहजयः**—तीव्र तृष्णा लागली तरी तिच्या शांतीकरितां कांहींच उपाय न करून संतोषरूपी जलानें शांतवृत्तींत असणें याला पिपासापरिषहजय ह्मणतात.

३. **शीतपरिषहजयः**—पर्वताग्र, नदीतीर इत्यादि ठिकाणीं वास करून तेथें अतिशय थंडीची वेदना झाली तरी ती शांतपणें सहन करणें याला शीतपरिषहजय ह्मणतात.

४. **उष्णपरिषहजयः**— अत्यंत कडक उष्मा सहन करणें, त्याच्या प्रतिकारार्थ कांहीं ही उपाय न योजणें.

५. **दंशमशकपरिषहजयः**—सर्प, विंचू, माशा इत्यादि प्राण्यांनीं दंश केला तरी त्यांना उलट त्रास न देतां ती वेदना निमूटपणें सहन करणें.

६. **नाग्न्यपरिषहजयः**—दिगंबर होणें. सर्व परिग्रहांचा त्याग करून ब्रह्मचर्यव्रत दृढ ठेवणें.

७. **अरतिपरिषहजयः**—इंद्रियें व त्यांचे विषय यांचे विषयीं उद्यम न करणें, सर्व प्राण्यांवर सर्वदा करुणाभाव ठेवणें.

८. **स्त्रैणपरिषहजयः**—स्त्रियानीं आपल्या हावभावांनीं व नेत्रकटाक्षानी कितीही त्रास दिला तरी चित्तास विकारवश होऊं न देणें याला स्त्रैणपरिषहजय ह्मणतात

९. **चर्यापरिषहजयः**—गमनसमयीं अनवाणी असल्यामुळें पायास कंटकादिकांची बाधा होत असली तरी ती न मानणें, गृहस्थावस्थेंत योग्य अशा वाहनयानादिकांची इच्छा न करणें.

१०. **निषद्यापरिषहजयः**—देव, मनुष्य, तिर्यंच इत्यादिकांनीं केलेले उपसर्ग सहन करून आपण स्वीकारिलेल्या वीरासन वगैरे आसनांतून चलित न होणें.

११. **शय्यापरिषहजयः**—ज्ञानाभ्यास, ध्यान इत्यादिकांनीं किंवा मार्गगमनानें श्रम झाले ह्मणून रात्रीं एक प्रहर कालपर्यंत उंच, सखल, सकंटक, शीत, उष्ण अशा कोणत्याहि प्रदेशांत एका बाजूवरच दंडाप्रमाणें शयन करून हालचाल न करितां निद्रा घेणें, झोंप न आल्यास ज्ञानभावनेनें कालक्रमण करणें, अथवा सिंहादि हिंस्र पशू येथें आहेत तर आपण येथून निघून जावें हें बरें, ही रात्र केव्हां संपेल वगैरे कल्पना न करणें.

१२. **आक्रोशपरिषहजयः**—अज्ञ लोकांनीं केलेला अपमान वगैरे सहन करून त्याबद्दल आक्रोश न करणें, त्यांनीं केलेल्या उपद्रवाना प्रतिकार करण्याचें सामर्थ्य अंगीं असलें

तरी सतांच्या पापकर्माचा हा उदय आहे असा विचार करून त्याकडे दुर्लक्ष्य करणें, तपोभावनेंत तत्पर होऊन मनांत कषाय उत्पन्न होऊं न देतां शांतचित्तानें असणें.

१३. वधपरिषहजयः—शत्रूंनीं खड्ग वगैरे शस्त्रांनीं आघात केला तरी आपल्या कर्मांचेंच हें फळ आपणास भोगावें लागत आहे असा विचार करून त्यांच्यावर न रागावणें, तसेंच हा देह जलबुद्बुदाप्रमाणें क्षणभंगुर आहे, अशा या देहास हे शत्रू पीडा करितात, माझें सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यग्चारित्र हीं नाश करण्यास हे शत्रू समर्थ नाहींत असा विचार करून त्यांच्याविषयीं कांहींच विकार मनांत उत्पन्न न होऊं देणें.

१४. याचनापरिषहजयः—आहाराकरितां दीनभाषण व दीनवदन करून याचना न करणें.

१५. अलाभपरिषहजयः—मुनिवृत्तीस योग्य असा आहार योग्यकालीं योग्य असा दाता नसल्यामुळें पुष्कळ दिवसांनीं ही एकवेळ न मिळाला तरी अधिकच संतुष्ट चित्तानें असणें.

१६.रोगपरिषहजयः—देहाविषयीं निस्पृह होऊन रोगाची बाधा शांतपणें सहन करणें.

१७. तृणस्पर्शपरिषहजयः—हिंडतांना, निजतांना व बसतांना ही परजीवांस पीडा न होईल अशा प्रकारची सावधगिरी ठेवणें, व तृण, कंटक वगैरेंचा उपद्रव सोसणें.

१८. मलपरिषहजयः—जलकायिक जीवांस पीडा होऊं नये ह्मणून अस्नान व्रत धारण करणें.

१९. सत्कारपुरस्कारपरिषहजयः—मी मोठा तपस्वी

असून ही माझा कोणी सत्कार करित नाहींत ह्मणून त्याबद्दल वाईट वाटू न देणें.

२०. प्रज्ञापरिषहजयः–तर्क, साहित्य, अध्यात्म वगैरे शास्त्रात आपण प्रवीण असूनही त्याविषयीं मद न करणें.

२१. अज्ञानपरिषहजयः—आपण बुद्धिमान् असूनही कोणी दुष्टानें ' हा मूर्ख आहे ' असें ह्मणून आपला अपमान केला तरी तो निमूटपणें सहन करणें.

२२. अदर्शनपरिषहजयः—उत्कृष्ट अशा वैराग्यभावनेनें अतरग शुद्ध झाल्यावर सकल तत्वाचें ज्ञान झाल्यानतर प्रातिहार्य वगैरे ऐश्वर्य प्राप्त होतें, असें जें ह्मणतात तें खोटें आहे, कारण मला इतकें वैराग्य झालें असून ही अद्याप तसें काहींच फळ मिळालें नाहीं, सबब ही दीक्षा व हीं व्रतें निष्फळ होत अशा प्रकारची कल्पना न करणें त्यास अदर्शनपरिषहजय ह्मणावें.

या बावीस परिषहजयाचें हें वर्णन वाचलें ह्मणजे जैनाचा यतिधर्म असिधाराव्रतासारखा कसा कठीण आहे याची कोणासही सहज कल्पना येईल. असो

त्या वज्रनाभि मुनींनें उत्तम क्षमा, मार्दव, आर्जव, शौच, सयम, तप, त्याग, सत्य, आकिंचन्य व ब्रह्मचर्य हे जे गणधरासही समत असे दश धर्म त्याचा स्वीकार केला. ते असे ---

दशधर्म

१. क्षमाः–दुष्टानीं कोणत्याही प्रकारें आपणास त्रास दिला तरी त्याबद्दल मनास यत्किंचित् ही विकार होऊ न देणें याला क्षमाधर्म ह्मणतात उत्तम क्षमा ही रत्नत्रयाला धारण करणारी आहे.

२. मार्दवः—म० मृदुपणा, अर्थात् गर्व सोडणें व कठोरपणा न करणें.

३. आर्जवः—मन, वचन व काय हीं कुटील नसणें अर्थात् सरळ आचरण ठेवणें.

४. शौचः—मन, वचन व काय हीं पवित्र ठेवणें, निर्मळ शील पाळणें; लोभ नसणें.

५. संयमः—इंद्रियें स्वाधीन ठेवणें व प्राणीमात्रांस त्रास न देणें.

६. सत्यः—समस्त प्राणीमात्रांशीं हितमित व खरें वचन बोलणें.

७. तपः—कर्मांचा क्षय होण्याकरितां इच्छेचा निरोध करणें किंवा अनशनादि तपें करणें.

८. त्यागः—ज्ञानादि चतुर्विध दान देणें.

९. आकिंचन्यः—यत्किंचित्‌ही परिग्रह जवळ न ठेवणें.

१०. ब्रह्मचर्यः—स्त्रीसंग, स्त्रीकथा वगैरे न करणें, किंवा आत्म्याच्याच ठिकाणीं रममाण होण्याची इच्छा करणें.

या दशधर्माला 'उत्तम' हें विशेषण लाविण्याचें कारण हें कीं, हे धर्म धारण केल्यापासून आपली प्रतिष्ठा, ख्याति किंवा पूजा व्हावी या हेतूनें नव्हे तर यांपासून प्रतिष्ठादिकांची मुळींच इच्छा न करितां फक्त आत्मकल्याणाकरितांच हे धारण करावेत याच हेतूनें हें विशेषण येथें योजिलें आहे. असो.

ज्याची भावना शुद्ध आहे व ज्यानें अधिक निर्मळ लेश्या धारण केली आहे असा तो वज्रनाभि मुनी अनित्यादि द्वादश

भावना नित्य भावित असे. त्यांचें वर्णन येणेंप्रमाणें:—

## द्वादश भावना.

१. अनित्यः—आत्म्याशिवाय सुख, आयुष्य, बल व संपत्ति वगैरे सर्व ऐहिक वस्तु पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें अनित्य आहेत असें चिंतवन करणें.

२. अशरणः— जीवास जरा व मरण यांपासून भय प्राप्त झालें असतां त्यावेळीं रक्षण करणारा कोणी नाहीं, तसेंच संसारिक दुःखांपासून सोडविण्यास धर्माशिवाय कोणीही समर्थ नाहीं असें चिंतवन करणें.

३. संसारः— अनेक प्रकारच्या परिवर्तनांनीं दुःख देणें हा या संसाराचा स्वभावच आहे. सबब यातून मुक्त होण्याकरितां झटलें पाहिजे असें नित्य चिंतवन करणें.

४. एकत्वः— ज्ञान, दर्शन या स्वभावास पावणारा आत्मा हा एकटा आहे.

५. अन्यत्वः— देह, कलत्र, धन, बंधू, पुत्र ह्यांच्यापासून आत्मा हा भिन्न आहे अशी नित्य भावना भावणें.

६. अशुचिः— ज्याच्या नवद्वारांतून सर्वदा मळ गळत असतो असा हा देह अत्यंत अशुद्ध आहे असें चिंतन करणें.

७. आस्रवः— पुण्यपापस्वरूपाचीं कर्में येण्याचें द्वार आस्रव आहे. व आस्रव हा संसाराला कारण आहे असें चिंतणें.

८. संवरः— आस्रवाचा निरोध करणें याला संवर म्हणतात

९. निर्जराः— थोडा थोडा कर्मक्षय होणें.

१०. लोकः— हा लोक अनंत आकाशाच्या मध्यभागीं

आहे, अनादिनिधन आहे, स्वयंसिद्ध आहे, जीवादि पदार्थांनीं भरलेला आहे असें चिंतन करणें.

११. बोधिदुर्लभः— या संसारसमुद्रांत हिताहिताचें ज्ञान होणें, तसेंच सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र यांची प्राप्ति होणें हें अत्यंत दुर्लभ आहे असें नित्य चिंतन करणें.

१२. धर्मः—वीतरागप्रभूनें उपदेशिलेला 'अहिंसा धर्म' हाच संसारांतून मुक्त करण्यास समर्थ आहे असें चिंतन करणें याला धर्मभावना असें ह्मणतात. याप्रमाणें वर्णन केलेल्या या बारा अनुप्रेक्षांचें तो मुनी वारंवार चिंतवन करीत असे. अस्तु.

शेवटीं, ह्या वज्रनाभि मुनींनें शुक्लध्यान पूर्ण करून, उत्कृष्ठ अशा समाधीचा आश्रय करून देहत्याग केला. व एका क्षणांत सर्वार्थसिद्धि विमानास जाऊन तेथें उपपादशय्येवर अहमिंद्र देव झाला. तेथें उत्पन्न होणाऱ्या देवाचे सर्व पुरुषार्थ यत्नाशिवाय सिद्ध होतात ह्मणून त्या विमानास ' सर्वार्थसिद्धि ' अशी सार्थ संज्ञा आहे. अनुत्तर ह्म० उत्कृष्ठ किंवा ज्याच्या सारखें दुसरें नाहीं असें हें सर्वार्थसिद्धि नावाचें तें सर्वांच्या वरचें विमान त्रैलोक्याच्या अग्रभागास १२ योजनें सोडून खालीं आहे. तेथें उत्पन्न होताच या वज्रनाभि जीवाला एका क्षणांतच दोष व धातु वगैरे मलांचा ज्याला केव्हाही स्पर्श होत नाहीं असें सुलक्षणांनीं युक्त व पूर्ण यौवन प्राप्त झालें आहे असें रूप प्राप्त झालें. अणिमा वगैरे गुणांच्या योगानें वैक्रियक देह धारण करणारा हा अहमिंद्र देव जिनेश्वरांच्या प्रतिमांचें अष्टद्रव्यांनीं उत्तम प्रकारें अर्चन करीत व मोक्ष सुखाची ज्याला उपमा आहे

असें सुख अनुभवित आपल्या स्वर्गांत विहार करीत असे. मैथुन व्यवहारापासून जें सुख वाटतें त्याहिपेक्षा तो व्यवहार न करून ही अनत पटीनें अधिक सुख ज्यात आहे' व जें शुभकर्माच्या उदयापासून उत्पन्न होतें असें सर्वार्थसिद्धि स्वर्गांतील तें सुख तेथील देवाना अव्याहतपणें मिळत असतें. हें मैथुनव्यवहाररहित अहमिंद्र देवाचें दिव्य मानस सुख विपयसुखापेक्षा अनतपटीनें अधिक आहे हें सिद्धच आहे. निरुपम, अतींद्रिय व सिद्धपरमेष्ठीच्या सुखासारखेंच या अहमिंद्रदेवाचेंही सुख असतें असें ह्मटल्यास थोडासा अतिशयोक्तीचा दोप आह्मास लागेल एवढेंच. या संसारातील जीवास जें सुख व दु ख होतें तें कर्मबधानुरूप होतें असें जिनानीं सागितलें आहे. तें कर्म पुण्य व पाप या भेदानें दोन प्रकारचें आहे सर्वांत फार मोठें असें पुण्याचें फळ ( सुख ) सर्वार्थसिद्धि स्वर्गांत मिळतें व पापकर्माचें सर्वांत भयंकर असें फळ ( दु ख ) सातव्या नरकातील नारकी जीवास मिळतें. शाति, इद्रियनिग्रह व मरणापर्यंत निरातिचार व्रतें पाळणें याच्या योगानें पुण्यशाली पुरुपास श्रेष्ठ सुख ह्मणजे सर्वांहून मोठें असें सर्वार्थसिद्धींतील सुख प्राप्त होतें. आणि अशाति, इद्रियनिग्रह न करणें, व व्रतें न पाळणें इत्यादि दुष्कृत्यानीं सातव्या नरकात तीव्र दु ख भोगावें लागतें. ह्मणून, अतुल सुख मिळविण्याची इच्छा करणाऱ्यानें शम, दम व यम ( मरणापर्यंत पाळलीं जाणारीं व्रतें ) याच्या शुद्धी करिता श्रीजिनाज्ञेचें नित्य चिंतन करून त्याप्रमाणें वर्तन ठेविलें पाहिजे

# पर्व १२ वें.

## भगवत्स्वर्गावतरणवर्णन.

" सर्वार्थसिद्धींतील तो अहमिंद्र देव ( पूर्वींचा वज्रनाभि ) तेथील सुख अनुभवून, तेथून भूलोकीं अवतार करीत असतांना इहलोकीं जें वृत्त घडून आलें मी आतां सांगतों. " असें **गौतमगणधर** श्रोतृवृंदास ह्मणाले. तेव्हां त्या समवसरणांतील मुनींनीं त्या मुनिसंघाच्या नायकास ( गणधरास ) प्रश्न केला कीं,

" हे भगवन्, या भारतवर्षांत भोगभूमीची स्थिती नाहींशी होऊन कर्मभूमीची स्थिती प्राप्त होऊं लागली त्यावेळीं होत आलेली चौदा कुलधरांची उत्पत्ति तूं पूर्वींच वर्णन केली आहेस. त्या १४ मनूंमध्यें शेवटचा व क्षत्रिय कुलांतला श्रेष्ठ असा जो नाभिराज त्यानें धर्मसृष्टीचा कर्ता व इक्ष्वाकुवंशांत प्रथम अशा ऋषभ जिनास कोणत्या आश्रमांत उत्पन्न केलें? तसेंच त्या प्रथम जिनाचें गर्भावतार वगैरे पांच कल्याणाच्या वेळीं झालेलें ऐश्वर्य कोणत्या प्रकारचें होतें हें सर्व सांगण्याची कृपा कर." तें ऐकून **गौतमगणधरांनीं** ती हकीकत खालील प्रमाणें सांगितली.—

" या जंबूद्वीपांतील भरतक्षेत्रामध्यें विजयार्द्ध पर्वताच्या दक्षिणेस आर्यखंडांत पूर्वी होऊन गेलेले जे प्रतिश्रुति प्रभृति चौदा मनु यांचें वर्णन मी केलेंच आहे. त्या मनूंमध्यें शेवटचा पण त्या काळीं प्रथमचा असा **नाभिराज** या नांवाचा मनु होऊन गेला. त्याच्या स्त्रीचें नांव **मरुदेवी** असें होतें. तिचें रूप, लावण्य व

काति हीं इद्राणीप्रमाणें होती. एका पुण्यदिवशीं या नाभिराजानें आपल्या प्रियपत्नीसह अमरपुरीप्रमाणें सुदर अशा त्या **अयोध्या नगरीत** प्रवेश केला त्यावेळीं देवानीं पुण्याहघोषणा केली. तेथें ते दोघे मोठ्या आनदानें राहिले या दापत्यापासून सर्वज्ञ असा पुत्र पुढें होणार आहे ह्मणून इद्र त्याची महाभिषेकपूर्वक पूजा करित असे. त्या नाभिराजाचा पुत्र पुढें सहा महिन्यानीं उत्पन्न होणार असताना आधीं सहा महिनेपर्यंत दररोज देवानीं त्या राजाच्या पुण्यसदनात मोठ्या आनदानें स्वर्गांतून रत्नवृष्टि केली. पुढें आणखी नवमासपर्यंत कुबेरानें रत्न व सुवर्णवृष्टि केली. नतर प्रभू **श्रीऋषभदेव** यानीं जेव्हा मरुदेवीच्या उदरामध्यें गर्भरूपानें प्रवेश केला त्यावेळीं पृथ्वी रत्नगर्भा झाली, सर्व देव हर्षगर्भित झाले आणि सर्व जग आनदातिशयानें गजबजून गेलें. पुढें कोणे एके वेळीं गृहामध्यें राणी **मरुदेवी** आपल्या मृदु शय्येवर निजली असता, रात्रींच्या शेवटच्या प्रहरीं तिनें **श्री ऋषभदेवाचें** जन्म सुचविणारीं अशीं सोळा मगल स्वप्नें पाहिलीं रात्रींच्या सुस्वप्नदर्शनाच्या आनंदातिशयामुळें तिच्या देहावर रोमाच उभे राहिले. तदनतर, सुदर व मगल पोषाक करून मरुदेवी नाभिराजाकडे गेली. व त्याच्याजवळ राजासनावर बसून मोठ्या विनयानें त्याना ह्मणाली, "हे प्रभो, आज मीं पहाटेस सोळा स्वप्नें पाहिलीं. तीं अशीं — १ शुभ्र अगाचा ऐरावत गज, २ वृषभ, ३ सिंह, ४ जिला देवाचे हत्ती स्नान घालीत आहेत अशी लक्ष्मी, ५ लोंबत असलेल्या दोन माळा, ६ आकाशभर ज्याची प्रभा पसरली आहे असा चद्र,

७ नुकताच उगवलेला सूर्य, ८ दोन मत्स्य, ९ अमृतानें भरलेले दोन कलश, १० निर्मल जल व कमलें यांहींकरून पूर्ण 'असें सरोवर, ११ भरती आलेला समुद्र, १२ देदीप्यमान असें सुवर्णमय सिंहासन, १३ स्वर्गांतून खालीं येत असलेलें विमान, १४ पातालांतून वर आलेलें विमान, १५ देदीप्यमान रत्नांची रास व १६ प्रदीप्त अग्नि. याप्रमाणें हीं सोळा स्वप्नें पाहून, पुनः शेवटीं मी सुवर्ण रंगाचा एक मोठा वृषभ माझ्या मुखांत प्रवेश करीत आहे असें पाहिलें. हे देव, या स्वप्नांचें फळ मला सांगा. " हें ऐकून नाभिराजानें अवधिज्ञानाच्या बळानें तिला फलश्रुति सांगीतली. ती अशी:—"हे देवि, तूं स्वप्नांत हत्ती पाहिलास त्याचें फळ हें कीं, तुला सर्वप्रकारें श्रेष्ठ असा पुत्र होईल. मोठा बैल पाहिला त्याचें फळ सगळ्या जगांत तो श्रेष्ठ होईल. सिंह पाहिला तेणेंकरून तो अनंतवीर्य होईल. पुष्पमाला पाहिल्या त्याचें फळ तो उत्तम धर्मरूपी तीर्थाचा प्रवर्तक व लक्ष्मी पाहिली म्हणून मेरुपर्वताच्या मस्तकावर बसून देवांकडून त्याचा अभिषेक होईल. पुर्णचंद्रानें तो सर्व लोकांस आनंद देणारा; सूर्यानें त्याच्यासारखा तेजस्वी ; कुंभानें निधींचा अधिकारी व दोन मत्स्य पाहिलें त्याचें फळ तो सुखी असा होईल. सरोवर पाहिलें त्याचें फळ तो शुभ लक्षणांनी शोभणारा; समुद्र पाहिला तेणेंकरून तो केवली व सिंहासनानें तो जगद्गुरु होऊन त्या साम्राज्याचा अधिकारी होईल. स्वर्गलोकींचें विमान पाहिलें तेणेंकरून तो स्वर्गाहून येऊन तुझ्या उदरीं जन्म घेईल. पाताळलोकींचें विमान पाहिलें त्याचें फळ तो

अवधिज्ञानी आहे. रत्नराशी पाहिली तेणेंकरून तो सर्व सद्गुणाचा निधि होईल. व धूमरहित अग्नि दिसला म्हणून हा कर्मरूपी काष्टें जाळणारा होईल. शेवटीं, वृषभाचा आकार घेऊन तुझ्या मुखांत प्रवेश केला त्याचें फळ **प्रभू वृषभदेव** निर्मळ अशा तुझ्या गर्भांत येऊन राहील." याप्रमाणें स्वप्नफळ ऐकून मरुदेवीच्या सर्वांगावर आनंदातिशयानें रोमाच उभे राहिले. पुढें या अवसर्पिणीचा तिसरा काल चौऱ्याशी लक्ष पूर्व, तीन वर्षें, आठ महिने व पंधरा दिवस इतक्या सख्येच्या प्रमाणाचा उरला होता, त्यावेळीं तो सर्वार्थसिद्धि विमानांतील **वज्रनाभिचर अहमिंद्रदेव** तेथून खालीं येऊन, आषाढ महिन्याच्या शुक्लपक्षीं द्वितीया तिथीस उत्तराषाढा नक्षत्रावर या मरुदेवीच्या गर्भांत आश्रय करून सुखानें राहिला. त्यावेळीं, सगळे म्हणजे भवनवासी, व्यंतरवासी, ज्योतिर्वासी व कल्पवासी इद्र तीर्थंकरानें गर्भावतार केला हें जाणून तात्काल खालीं आले, आणि अयोध्या नगरीस प्रदक्षिणा करून त्यानीं तीर्थंकराच्या मातापित्यास

देखील पीडा करित नव्हता. आचार्य ह्मणतात, याचें कारण उघडच आहे कीं, 'दर्पणस्थोऽपि किं वन्हिर्दहेत्तं प्रतिबिंबितः।' अर्थात्, दर्पणामध्यें प्रतिबिंब स्वरूपानें असलेला अग्नि दर्पणालाच जाळील काय? अस्तु. शिवाय, इंद्रानें त्या मरुदेवीच्या गर्भाला येणाऱ्या विघ्नांच्या शांतीकरिता पाठविलेली शची देवी ही गुप्तपणें तिची सेवा करित असे. तसेंच, त्या देवांगना अनेक प्रकारच्या काव्यरचनेच्या चातुर्यांनीं मरुदेवीचें नित्य रंजन करित असत. याप्रमाणें त्या दिक्कन्यांकडून मोठ्या आनंदानें मिळालेलें मंगल धारण करणाऱ्या त्या भगवती मरुदेवीनें त्रिभुवनास आश्चर्य करणारें व अत्यंत सुखावह असें तेज धारण केलें; व नाभिराज मनु हा यापुढें तीर्थंकर होणाऱ्या पुत्ररूपी जिनसूर्याच्या दर्शनाची प्रतीक्षा मोठ्या सोत्कंठेनें करूं लागला.

---

# पर्व १३ वें.

—*—

## भगवज्जन्माभिषेकवर्णन.

पुढें नऊ महिने पूर्ण झाल्यानंतर, भगवती मरुदेवीच्या उदरीं चैत्र कृष्णपक्षाच्या नवमी दिवशीं सूर्योदयाच्या वेळीं प्रभू ऋषभदेवाचा जन्म झाला. त्यावेळीं स्वर्गांतील दुंदुभि आपोआप वाजूं लागले. कल्पवृक्षांनीं स्वर्गलोकांतून पुष्पवृष्टि केली.

टीपः—१ जिज्ञासू वाचकांनीं या ठिकाणीं मूळ महापुराणांत दिलेले कूटप्रश्न वगैरे अवश्य वाचावेत अशी आह्मी त्यांना सविनय प्रार्थना करितो.

पर्वतासह पृथ्वी हालूं लागली. इंद्रानें आपलें सिंहासन हालल्या-वरून, अवधिज्ञानानें ऋषभदेवाचा जन्म झाला असें जाणून, तीर्थंकरास जन्मनिमित्तक स्नान घालण्याचें मनांत आणिलें. कल्पवासी, ज्योतिर्वासी, व्यंतर व भवनवासी इंद्राच्या घरीं क्रमानें घंटानाद, सिंहनाद, भेरीनाद व शंखनाद हे एकाएकीं होऊं लागले. त्यावरून देवांनीही ऋषभदेवाचा जन्म झाल्याचें जाणिलें. नंतर, इंद्राच्या आज्ञेनें स्वर्गलोकापासून देवसेना निघून अयोध्यानगरीमध्यें प्राप्त झाली. सौधर्मेंद्रही मोठ्या ऐरावत हत्तीवर इंद्राणीसह बसून देवासहवर्तमान तेथें आला. नंतर इंद्राणीनें बाळंतिणीच्या गृहामध्यें जाऊन, पुत्रासह असलेल्या जिनमातेचें दर्शन घेऊन तिची स्तुति केली; व मग तिनें जिनमातेला मायेची निद्रा आणून, तिच्यापुढें दुसरें मायारूप बालक ठेवून, आपल्या दोन्ही हातानीं त्या जगद्गुरूस घेऊन त्याला इंद्राच्या स्वाधीन केलें. इंद्रानें प्रभूला मांडीवर विराजमान करून मेरुपर्वताकडे गमनाची खूण केली. त्यावेळेस सर्व देवानीं मोठा जयघोष केला. लौकरच ते सर्व इंद्र मेरुपर्वतास पोंहचले. इंद्रानें सर्व देवांसह मेरूस प्रदक्षिणा करून त्याच्या मस्तकावर जिनदेवास विराजमान केलें. मेरूच्या ईशान्येस अत्यंत शुभ्र अशी पांडुक नांवाची एक मोठी शिला आहे. तिजवर जिनाला अभिषेक होत असतो. पांडुकशिलेवरील सिंहासनावर पूर्वाभिमुख करून प्रभू ऋषभदेवास विराजमान करून इंद्रानें अभिषेक करण्यास आरंभ केला. त्यावेळीं सर्व आकाशभर देवदुंदुभि ध्वनि करूं लागले; व चोहोंकडे देवांगना नृत्य करूं लागल्या. देवानीं सु-

वर्णमय कुंभांनीं क्षीरसमुद्राचें निर्मल जल आणिलें. प्रथम सौधमेंद्रानें ' जय जय ' असा मंगलोच्चार करून जलधारा सोडिली. नंतर सगळ्या स्वर्गाच्या इंद्रानीं भगवताच्या मस्तकावर जलपूर्ण सुवर्ण कलशानीं जलधारा सोडिल्या. त्या जलधारांनीं मनुष्यलोक पवित्र झाला; संपूर्ण पृथ्वी शांत झाली; देश अनावृष्ट्यादि पीडारहित झाले. व सर्व प्रजा सुखी झाली. याप्रमाणें जलाभिषेक समाप्त झाल्यावर, इंद्रानें ऋषभदेवास गंधोदकाचा अभिषेक केला. नंतर देव जगाच्या स्वस्थतेकरितां शांतिकारक मंत्र ह्मणूं लागले. मग देवांनीं तें अभिषेकाचें उदक आपल्या मस्तकावर धारण करून सर्वांगास लाविलें. व राहिलेलें गंधोदक स्वर्गास नेलें. परमपूज्य अशा तेजोमय श्रीऋषभदेवाचा अभिषेक झाल्यावर सर्व देवानीं. त्याची पूजा केली. व पुन. प्रभूला इंद्र, इंद्राणी व सर्व देव यानीं मोठ्या भक्तीभावानें नमस्कार केला. या अभिषेकोत्सवांत इंद्र स्वत. स्नान घालणारा, स्वर्गांतील अप्सरा नृत्य करणाऱ्या, स्नानास बसावयाचा चौरंग हेमाद्री (मेरुपर्वत), सर्व देव चाकर व क्षीरसमुद्र स्नानोदकाचें पात्र, अशा प्रकारें मेरुपर्वतावर ज्याचा अभिषेकोत्सव झाला तो परमपवित्र ऋषभदेव व तो जिनविभूच्या जन्माभिषेकाच्या जलाचा पूर या जगाला पवित्र करून त्याचें रक्षण करो !!



# पर्व १४ वें.

## भगवज्जातकर्मोत्सववर्णन.

याप्रमाणें अभिषेकविधि पूर्ण झाल्यानंतर, इंद्राणीनें श्रीऋषभदेवाला रत्नालंकार घातले. त्यावेळची ती भगवंताची रूपसंपत्ति पाहण्याची इच्छा करणारा इंद्रसुद्धां अतृप्त झाल्यामुळेंच सहस्रनेत्राचा झाला कीं काय असा भास होतो. इंद्रप्रभृति देवांस पूज्य होणें हें एक तीर्थंकरत्वाचें पुष्कळसें प्रभुत्वच होय. असो. नंतर इंद्रानें आदिप्रभूची खालीं लिहिल्याप्रमाणें स्तुति केलीः—

" १ हे **महाबला**, ( विद्याधराचा राजा ) तुला नमस्कार असो ! २ हे **ललितांगा**, ( ऐशान स्वर्गांतील देव ) तुला नमस्कार असो ! ३ हे श्रीमान् **वज्रजंघा**, तुला नमस्कार असो ! ४ हे पात्रदानाच्या पुण्यानें भोगभूमींत जन्मलेल्या **आर्या**, तुला नमस्कार असो ! ५ हे **श्रीधरा**, ( ऐशान स्वर्गांतील श्रीप्रभ विमानांतला देव ) तुला नमस्कार असो ! ६ हे **सुविधि** राजा, तुला नमस्कार असो ! ७ हे **अच्युतेंद्रा**, तुला नमस्कार असो ! ८ हे **वज्रनाभि**, तुला नमस्कार असो ! ९ हे **सर्वार्थसिद्धींतील अहमिंद्रदेवा**, तुला नमस्कार असो! १० दहा अवतारांपैकीं या शेवटच्या अवतारांत उत्कृष्ट अशी औदारिकदेहाची कांति ज्याला आहे असा जो नाभिराजाचा पुत्र श्रीमान् आदि **परमेश्वर** त्या तुला आह्मीं नमन करितों. हे **जिनेंद्रऋषभदेवा**, आह्मी याप्रमाणें तुझी स्तुति करून दुसरें कांहीं मागत नाहीं; फक्त तु-

ऱ्याच ठिकाणीं आह्मांस दृढ अशी भक्ति असूं दे. " याप्रमाणें भगवंताची स्तुति करून ते इंद्र पुनः परत अयोध्येस जाण्यास निघाले. अयोध्येहून मेरूस जातांना ज्याप्रमाणें नगारे वाजविले होते व जयघोष केला होता त्याचप्रमाणें मेरूहून परत अयोध्येस जातांना नगारे वाजविले व जयघोष केला. इंद्रानें जिनास ऐरावताच्या स्कंधावर विराजमान करून परत अयोध्यापुरीस पोंचविलें. नंतर त्यानें जिनास घेऊन कांहीं देवांसह राजमंदिरांत प्रवेश केला; व तेथील सिंहासनावर त्या जिनबालकास विराजमान केलें. इंद्राणीनें मायानिद्रा दूर करून मरुदेवीस जागें केल्यावर, त्या मरुदेवीनें जिनसूर्यास संतुष्टचित्तानें पाहिलें. नाभिराज व मरुदेवी ह्या उभयतांना इंद्र व इंद्राणी यांना पाहून अत्यंत संतोष झाला. सौधर्मेंद्रानें सगळ्या देवांसह नाभिराज व मरुदेवी यांची पूजा करून अत्यंत स्तुति केली. व जन्मकल्याणसंबंधी उत्सवाची सर्व कथा सांगितली. पुनः जातकर्मोत्सव करावा ह्मणून इंद्राची संमति घेऊन, नाभिराज व मरुदेवी या उभयतांनीं सर्व नगरवासी लोकांसह मोठ्या ऐश्वर्यानें अयोध्यानगरांत तो उत्सव केला. त्यावेळीं त्या अयोध्यानगरींतील लोकांमध्यें दीन, दरिद्री व दुःखी असा कोणीच नव्हता. याप्रमाणें सर्व जगास आनंदमय करणारा तो महोत्सव ज्याप्रमाणें मेरुपर्वतावर झाला होता त्याप्रमाणेंच अयोध्यानगरींतही झाला. नगरवासी लोकांचा तो आनंद पाहून इंद्रानेंही साभिनय आनंदपर्यवसायी संगीत नाटक करून दाखविलें. त्यावेळीं इंद्रानें प्रथम धर्म, अर्थ व काम हें फळ जेणेंकरून प्राप्त होतें असें भग-

वंताच्या गर्भावताराचें नाटक करून दाखवून, नंतर जन्माभि-षेकसंबंधाचा नाटकप्रयोग करून दाखविला. तसेंच त्यानें भग-वंताच्या महाबल वगैरे दशावताराचें नाटकहि करून दाखविलें. त्यांत इंद्रानें स्वत: सूत्रधाराची भूमिका घेऊन, अनेक प्रकारच्या अंगविक्षेपानीं भिन्न भिन्न रस प्रकट करून तांडवनृत्य केलें. हें सर्व आश्चर्यकारक नृत्य पाहून नाभिराज व मरुदेवी याना मोठा संतोप झाला. अस्तु. हा जगज्ज्येष्ठ असा वृषभजिन जगाच्या हितास कारणीभूत अशी धर्मामृताची वृष्टि करील ह्मणून सगळ्या दे-वांनीं त्याचें नांव '**वृषभ**' असें ठेविलें. 'वृष' ह्म० पूज्य असा धर्म; तेणेंकरून हा तीर्थंकर 'भाति' ह्म० शोभतो ह्मणून याला इंद्रानें '**वृषभस्वामि**' या नांवानें बोलाविलें. याप्रमाणें नाम-कर्म विधि झाल्यावर, देवकुमारांस त्याची सेवा करण्यास सांगून सगळे इंद्र स्वर्गास गेले. इंद्रानें या जिनबालकाला स्नान, अलंकार, दुग्धपान इत्यादि करण्याकरितां देवांगनास धात्रीच्या कामीं योजिलें. प्रभू चंद्रकलेप्रमाणें दिवसेंदिवस वाढूं लागले; व त्याच्या देहाबरोबरच त्यांचे गुणही प्रतिक्षणीं वाढत चालले. मति, श्रुति व अवधि हीं तीन ज्ञानें त्याच्या जन्माबरोबरच त्यांस होतीं. त्यायोगें, त्यांनीं संपूर्ण विद्या व लोकस्थिति जाणिली. तो सर-स्वतीचा प्रभु असल्यामुळें सर्व प्रकारचें वाङ्मय त्याला प्रत्यक्ष झालें होतें. त्यायोगें तो वाचस्पति होऊन संपूर्ण जगाचा गुरु झाला. सर्व कलेमध्येंही तो अत्यंत निष्णात झाला. चरम ह्मणजे शेवटचा देह धारण करणाऱ्या त्या वृषभजिनाचें अखंड आयुष्य चौऱ्यांशीं लक्ष पूर्वसंख्येचें होतें. तो वृषभदेव कालास योग्य

अशी क्रीडा करीत देवकुमारांसह दिव्य सुखानुभव घेत असे.

## पर्व १५ वें.

### भरतोत्पत्तिवर्णन.

यानंतर या वृषभदेवास पूर्ण यौवन प्राप्त झाल्यावर, याचा देह फारच सुंदर दिसूं लागला. त्या आदिपरमेश्वराच्या शरीरांतील सर्व अस्थि वज्रमय असून, वज्राच्याच वेष्टनानें वेष्टिलेले आणि वज्राच्याच नाराचानें बसविलेले होते. त्यामुळें तें शरीर विष, शस्त्र वगैरेंनीं अभेद्य असें होतें. भगवताचें समचतुरस्र संस्थान होतें. तें उचीनें, परिघानें व विस्तारानें न्यूनाधिक नव्हतें. या जिनविभूच्या निर्मल अशा परमौदारिक देहावर दिव्य अशीं १०८ लक्षणें चकाकत होतीं. एके दिवशीं वृषभदेवाच्या यौवनावस्थेचा आरंभ पाहून, नाभिराज मनूच्या मनात त्यांचा विवाह करावा असें येऊन, ते स्वत शींच विचार करूं लागले कीं, "या जिनदेवाचें चित्त हरण करणारी अशी सुंदरी या जगांत कोण बरें असेल? बरें. यदाकदाचित् अशी स्त्री कोठें असली, तरी सुद्धा याला विषयप्रीति कमी असल्यामुळें हा वश होणेंही कठीण! तेव्हां

---

**टीप:**—१ अस्थिमधन्न पडण्याचें कीलक. २ शीशासमान शुद्ध अशा स्नान वाटोळें दिव्य म्हणजे सम व चतुरस्र असे ज्याचें मध्य न म्हणजे शरीराचा आकृति असणें त्याचें **समचतुरस्रसंस्थान** समजावें. दान शरीरांचे भाग वर, खालीं, मध्यें सारख्या प्रमाणानें बनून अवयवांची रचना होते.

विवाह करण्याचा माझा संकेत सिद्धीस जाणें दुर्घटच दिसतें. यानें धर्मतीर्थाच्या प्रवृत्तीकरितां फार मोठा असा उद्योग आरंभिला आहे. तेव्हां हा दीक्षा तर घेणारच. तथापि, तपश्चरण करण्यास योग्य अशी काललब्धि येईपर्यंत सांप्रदायाप्रमाणें याला शोभेल अशी स्त्री पाहिली पाहिजे." याप्रमाणें विचार करून नाभिराज वृषभजिनास ह्मणाले, "देवा, मी तुला कांहीं सांगूं इच्छितों; तें ऐक. तूं जगाचा प्रभु आहेस. ह्मणून त्वां जगास याकालीं उचित असा व्यवहार शिकवून लोकांवर उपकार केला पाहिजे. ज्याप्रमाणें सूर्य स्वतः उदयास येतो, पण उदयाचल हा त्याच्या उत्पत्तीस निमित्त असतो, त्याप्रमाणें तूंही स्वयं उत्पन्न झाला असून, आह्मी तुझे मातापिता ह्मणवून घेणारे निमित्तमात्र कारण आहोंत. तूं या कालाचा आदिपुरुष आहेस. ह्मणून तूं या जगाच्या उत्पत्तीस प्रवृत्त हो. अर्थात् तूं विवाह करून घेण्याविषयींची इच्छा कर. तुला पाहून हे लोकही तुझ्याप्रमाणेंच वर्तन करोत! तुझ्या अशा करण्यानें प्रजेचा वंशच्छेद होणार नाहीं. प्रजेची संतति जर विच्छेद पावली नाही, तरच धर्मसंततीची वृद्धि होते. ह्मणूनच आचार्यांनीं ह्मटलें आहे—

देवेमं गृहिणां धर्मं विद्धि दारपरिग्रहम् ।
सन्तानरक्षणे यत्नः कार्यो हि गृहमेधिनाम् ॥

भावार्थः—दारपरिग्रह करणें हा गृहस्थांचा धर्म आहे. कारण, गृहस्थांनीं आपल्या वंशाचें रक्षण करण्याविषयीं यत्न करावा. ह्मणून, विवाह करणें हा जो मनुष्यधर्म आहे त्याचा तूं अंगिकार कर. बाबारे, वडिलांच्या आज्ञेप्रमाणें वर्तन न करणं हें केव्हां

हीं शिष्टाचारसंमत होणार नाहीं." नाभिराजाचें हें भाषण ऐकून ऋषभदेव 'ॐ' ह्मणजे 'आपण ह्मणतां तसें होऊं द्या.' असें ह्मणाले. तेव्हां विवाह करून घेण्याविषयीं ऋषभदेवाची संमति आहे हें जाणून, नाभिराजानें इंद्राच्या संमतीनें कच्छ व महाकच्छ या दोघा राजांच्या **यशस्वती** व **सुनंदा** या नांवाच्या दोन सुशील, साध्वी, सुंदर, अनुद्धत व विवाहकालास योग्य अशा कन्येशीं आपल्या पुत्राचा विवाह केला. या प्रसंगीं देवांनीं मोठा मंगलोत्सव केला. मरुदेवीस सर्वांपेक्षां अधिक आनंद झाला. कारण, '**दारकर्मणि पुत्राणां प्रीत्युत्कर्षो हि योषिताम् ।**' अर्थात्, मुलांचा विवाह झाला ह्मणजे स्त्रीजातीस संतोष अधिक होतोच. या विवाहानें मनुष्य व स्वर्ग या दोन्ही लोकांत सर्वत्र आनंदीआनंद झाला. असो. नित्य नानाप्रकारच्या उत्सवांनीं त्या दोघीं देवींसह अनेक प्रकारचे भोग भोगत असणाऱ्या त्या वृषभजिनाचा फार मोठा असा काल एका क्षणाप्रमाणें लोटला. नंतर एके दिवशीं महादेवी **यशस्वती** ही आपल्या महालांत रात्रीं निजली असतांना, तिनें स्वप्नांत मेरूनें गिळलेली अशी पृथ्वी; मेरु; सूर्य; चंद्र; हंसांनीं युक्त असें सरोवर आणि चंचल लाटांनीं युक्त असा समुद्र हीं पाहिलीं. सकाळीं मंगलस्नान करून ती यशस्वती देवी रात्रीं पाहिलेल्या स्वप्नांचें फळ जाणण्याकरितां ऋषभदेवाकडे गेली. तेथें गेल्यावर मंगलासनावर बसून, तिनें रात्रीं पाहिलेलीं स्वप्नें सांगितलीं. तेव्हां त्या दिव्यज्ञानी वृषभदेवानें

पाहिलास, त्यामुळें तो प्रतापी होईल. चद्र पाहिलास, त्याचें फळ तो कातिमान् होईल सरोवर पाहिलेंस, त्याचें फळ तो लक्ष्मीवान् होईल व त्याच्या सर्वांगावर मच्छ, पद्म वगैरे शुभलक्षणें असतील मेरूनें भूमि ग्रासिली त्याचें फळ, तुझा तो चक्रवर्ती पुत्र सर्व जगाचें पालन करील व तू स्वप्नात समुद्र पाहिलास त्याचें फळ तो चरमाग ह्मणजे पुन देह न धारण करणारा अर्थात् मुक्तजीव होईल प्रिये, तुला होणारे जे शभर पुत्र आहेत त्यापैकीं हा इक्ष्वाकु कुलाला आनद देणारा असा श्रेष्ठ पुत्र होय." याप्रमाणें पतीमुखातून स्वप्नफळ ऐकून तिला अतिशय आनद झाला. त्यानतर सर्वार्थसिद्धींतील अहमिंद्रदेवानें तेथून चवून, यशस्वतीदेवीच्या गर्भी वास केला या वीरमातेचे डोहाळे फारच उदात्त होते ज्याप्रमाणें पूर्वदिशा तेज पुज सूर्यास प्रसवते त्याप्रमाणें नऊ महिने पूर्ण झाल्यानतर, यशस्वतीदेवीनें चैत्र महिन्याच्या नवमी तिथीस ज्याच्या अगावर साम्राज्यलक्षणें स्पष्ट दिसत आहेत अशा तेजस्वी पुत्रास जन्म दिला त्यावेळीं कोट्यावधि आनदभेरी वाजू लागल्या. स्वर्गांतून देवानीं पुष्पवृष्टि केली आकाशात 'जयजय' अशी दिव्यवाणी झाली. त्यासमयीं सगळी अयोध्यानगरी उत्सवयुक्त झाली होती नाभिराज व मरुदेवी याच्या आनदसमुद्रास तर भरती आली ऋषभदेवानें त्या जातकर्माच्यावेळीं एवढे मोठे दान केलें कीं, त्यावेळीं कोणीही दरिद्री राहिला नाहीं '**प्रमोदभरतः**' ह्म० आनदातिशयामुळें प्रेमयुक्त झालेले सर्व बधुजन मिळून सगळ्या भरतखडाचा अधिपति होणाऱ्या

अशा त्या पुत्रास 'भरत' या नांवानें संबोधूं लागले. त्या भरताच्याच नावानें आर्यलोकांचें ठिकाण हा भारतवर्ष याकाळीं प्रसिद्धीस आला आहे. महाहिमाचलापासून समुद्रापर्यंतचा जो पूर्णचक्रवर्तीच्या अमलांतला प्रदेश त्याला 'भारतवर्ष' म्हणतात. तो बालचंद्र बंधुजनरूपी कमलसमुदायास परम आनंद देत क्रमानें वाढूं लागला. तो जसजसा वाढूं लागला तसतसे त्याच्या अंगचे गुणही त्याच्याबरोबरच वाढूं लागले. अन्नप्राशन, चौल (चूडाकरण), उपनयन वगैरे संस्कारांचा विधि जाणणाऱ्या त्या ऋषभदेवानें आपल्या पुत्रास ते सगळे संस्कार स्वतः केले. त्यानंतर, क्रमानें बाल्य व कौमार या दोन्हीं अवस्थेच्या मध्यें होणाऱ्या ज्या अवस्था त्या सगळ्या उल्लंघून, भरत यौवनदशेस पोंचला. त्याची देहकांति, वाणी, भाषा, स्वभाव, शास्त्रानुभव हीं सर्व ऋषभदेवाप्रमाणेंच होतीं. सारांश, भरत हा सर्व गुणांनीं ऋषभनाथासारखाच असल्यामुळें **'पुत्र पित्याचा आत्मा होय.'** ही उक्ति त्यानें अगदीं सार्थ केली होती. चक्रवर्तीच्या क्षेत्रांत जितके म्हणून देव व मनुष्यें असतात त्या सर्वांचें मिळून जितकें बळ असतें त्यापेक्षांही अधिकपटीनें बळ भरतचक्रवर्तीच्या दोन्ही भुजांमध्यें होतें. त्याच्या रूपाला शोभेल अशीच त्याच्या अंगची गुणसंपत्ति होती. सत्य म्हणजे यथार्थ भाषण, शौच म्ह० अंतर्बाह्य शुद्धि, क्षमा म्हणजे सहनशीलता, त्याग म्ह० दान, बुद्धि, उत्साह, दया, दम (बाह्येंद्रियांचा निग्रह), प्रशम (मनोनिग्रह) व विनय हा सर्व गुणांस सत्वानुषंगी गुण म्हणतात. सत्व म्हणजे ज्ञान जेथें असतें तेथें असणारे

बळ व त्या बळाबरोबर असणारे किंवा त्या ज्ञानबळानें होणारे जे गुण त्यांना सत्वानुषंगी गुण ह्मणावे. तसेंच देहकांति, दीप्ति, लावण्य व मधुरभाषण हे सगळे शारीर गुण होत. याप्रमाणें मानसिक किंवा आत्मिक ह्मणजे **सात्विक गुण** व बाह्य जे **शारीर गुण** याहींकरून स्वभावानेंच सुंदर असा तो भरतराजा पुनः अलंकार घातल्यावर फारच शोभत असे. पूर्वजन्मीं केलेल्या पुण्याचा परिपाक झाला ह्मणजे इहलोकीं असा अभ्युदय प्राप्त होतोच. अत्यंत सुंदर व असाधारण असें भरताचें मुख पहात असतांना व त्याचें विनययुक्त मधुर भाषण ऐकत असतांना श्रीऋषभतीर्थंकरालाही अत्यानंद होत असें हें साहजिकच आहे.

---

## पर्व १६ वें.

—*—

### भगवत्साम्राज्यवर्णन.

भरतेश्वराच्या पाठीमागून यशस्वतीदेवीला **वृषभसेन**, **अनंतविजय**, **अनंतवीर्य** वगैरे चरमांगधारी व महातेजस्वी असे नव्याण्णव पुत्र झाले. त्यानंतर तिला **ब्राह्मी** या नावाची एक कन्या झाली. सुनंदा ह्मणून ऋषभनाथाची जी द्वितीय पत्नी होती, तिला इंद्रासारखा तेजस्वी **बाहुबली** या नांवाचा पुत्र झाला. हाही पूर्वजन्मीं अहमिंद्र होता. ऋषभनाथ हे पूर्वी एका भवांत वज्रजंघ असतांना त्यांची अनुंधरी नावाची एक भगिनी होती. ती यावेळीं ऋषभजिनाला सुनंदेपासून **सुंदरी** या नां-

चाची अत्यंत सुंदर अशी कन्या झाली. तरुण, सुस्वरूप व बलिष्ठ असा तो बाहुबली पुत्र त्यावेळचा कामदेव झाला. महाबाहु व तेजोनिधि अशा त्या बाहुबलीचे दोन्ही भुजाचें ठिकाणी अत्यंत बळ होतें ह्मणून लोक त्याला 'बाहुबली' या नांवानें बोलावित असत. सारांश, भरतराजाचे ते सगळे बंधु विद्येनें, कलेनें, प्रतापानें, कातीनें व सौदर्यानें भरतराजासारखेच होते. सहजमनोरम, अभिनवसुंदर व सर्वसद्गुणपरिपूर्ण अशीं त्याचीं शरीरें रत्नभूषणांनीं व प्रफुल्लित पुष्पमालांनीं अत्यंतच सुंदर दिसत असत. एके दिवशीं भगवान् ऋषभदेव सिंहासनावर मोठ्या आनंदानें बसले असतांना, त्यानीं आपल्या सर्व पुत्रांना कला व विद्या याचा उपदेश करण्याचें मनात आणिलें. इतक्यांत, त्यांच्या ब्राह्मी व सुंदरी या नांवाच्या दोन्हीं मुली मंगलवस्त्र धारण करून, त्याच्याजवळ आल्या. नंतर त्या दोघींनीं ऋषभदेवाला नमस्कार केल्यावर, प्रभु त्यांना ह्मणालेः— "हे मुलींनो, तुह्मी दोघी तरुण असूनही शीलानें व विनयानें वृद्ध आहांत. हें तुमचें सुंदर शरीर, हें वय व हें अद्वितीय शील जर तुह्मी विद्येनें विभूषित केलें, तरच तुमचा हा जन्म सफल होईल. कारण, विदुषी स्त्रीच स्त्रीसृष्टीच्या श्रेष्ठपदास पावते. विद्या ही कामधेनु आहे. तसेंच धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थांपासून उत्पन्न होणारी जी पुष्कळशी सुखसंपत्ति ती विद्येपासूनच प्राप्त होते. तिची आराधना उत्तम प्रकारें केल्यास ती इष्टार्थ पुरवून यश व सुखही देते. ह्मणून मुलींनो, विद्या शिकण्याचा यत्न करा. हें तुमचें वय विद्या शिकण्यास योग्य आहे." या-

प्रमाणें त्यांना उपदेश करून व आशीर्वाद देऊन ऋषभदेवांनीं सुवर्णपट्टावर आपल्या मनात असलेली श्रुतदेवी स्थापन केली. नंतर, भगवंतानीं आपल्या दोन्ही मुलींना 'ॐ नमः सिद्धं' हें मंगल जिला आहे अशी अक्षरावली व संयोगाक्षरें यांचें चागलें ज्ञान करून दिलें. त्यानंतर अनुक्रमानें अंक लिहून त्यांना संख्याज्ञानही करून दिलें. तसेंच, वाङ्मयाशिवाय शास्त्र व कला हीं नाहींत असा विचार करून, आदिब्रम्ह्यानें आपल्या मुलींना वाङ्मयहि शिकविलें. आतां वाङ्मयाची व्याख्या सांगतातः–

पदविद्यामथ छन्दोविचितिं वागलंकृतिम् ।
त्रयीं समुदितामेतां तद्विदो वाङ्मयं विदुः ॥

अर्थः–वाणीला भूषण अशी व्याकरणविद्या, अलंकारविद्या व छंदःशास्त्र या तिन्हींस मिळून विद्वान लोक **'वाङ्मय'** ह्मणतात. आदिप्रभूनें **'स्वायंभूव'** नांवाचें व्याकरणशास्त्र व छंदःशास्त्रही त्यांना शिकविलें. तसेंच, त्यानें उपमा वगैरे अलंकार, व त्या अलंकाराचे गौड व वैदर्भ असे दोन मार्ग आणि त्या मार्गांचे दशप्राण हे अलंकारसंग्रह शिकवितांना सांगितले. श्लेष, प्रसाद, समता, माधुर्य, सुकुमारता, अर्थव्यक्ति, उदारत्व, ओज, कांति व समाधि हे वैदर्भ मार्गाचे दहा प्राण होत. व ह्या दहांचा जो विपर्यास तोच प्रायः गौडमार्गांत असतो. याप्रमाणें व्याकरण ज्ञानरूपी दीपप्रकाशानें प्रकाशिलेल्या विद्या व कला यांमध्यें या दोघी मुलींनीं चागलें नैपुण्य संपादिलें. ऋषभदेवानें आपल्या पुत्रानाही क्रमपूर्वक व यथाशास्त्र सगळीं शास्त्रें शिकविलीं. नीतिशास्त्र, अर्थशास्त्र, संगीतशास्त्र, गंधर्वशास्त्र, शिल्पशास्त्र, वैद्य-

शास्त्र, चित्रकला, अश्वपरीक्षा, रत्नपरीक्षा, कामनीति वगैरे शास्त्राचें अध्ययन आपल्या पुत्राकडून करविलें. सारांश, लोकोपकारी ह्मणून जितकीं कांहीं शास्त्रें आहेत तितकी सर्व त्या आदिनाथानें आपल्या पुत्रास शिकवून त्यांत त्याना निष्णात केलें. प्रिय पुत्र, कलत्र व परिवार यासह सतत दिव्य असे भोग अनुभवित असता, या ऋषभनाथाचा वीसपूर्वलक्ष संख्येचा काल व्यतीत झाला. इतक्या अवधींत कल्पवृक्ष, दीप्तौषधि, सर्वौषधि वगैरे सर्व प्रकारची झाडें कालदोषामुळें नष्ट झालीं. कृषि ह्मणजे नांगरणें, पेरणें, खुरपणें, वगैरे न करूनही पिकणारी धान्यें क्रमानें भूमीवर विरल झालीं. त्यायोगें, प्रजा सगळी व्याकुळ होऊन नाभिराजाकडे गेली. तेव्हां त्यानें सांगितलें कीं, तुह्मी ऋषभनाथ तीर्थंकराकडे जा तें ऐकून ते सर्व लोक ऋषभदेवास शरण जाऊन म्हणाले, "हे प्रभो, जीवनोपाय दाखवून आमचें रक्षण कर. हे भगवन्! थंडी, ऊन व पाऊस ह्यापासून होणारा उपद्रव आह्मा निराश्रितास फार दुःख देत आहे. करितां, तत्प्रतिकारार्थ आह्माला उपाय सांग " याप्रमाणें त्याचें दीनवचन ऐकून, भगवान् आदिनाथानें मनाशींच असा विचार केला कीं, "पूर्व व अपरविदेह क्षेत्रामध्यें जी स्थिति प्रचालत आहे ती आज येथें प्रवृत्त केली पाहिजे तेथें जशी वर्णाश्रमाची स्थिति असून, असि, मषि वगैरे जशा सहा क्रिया आहेत व ग्राम, गृह वगैरेंची जशी निरनिराळी रचना आहे, तशीच येथील मनुष्याचीही स्थिति ठेवणें हें योग्य आहे कारण, कल्पवृक्ष नाहींसे झाले ह्मणून आज ही भरतभूमि कर्मभूमि झाली आहे. त्याकरिता

येथें सहा प्रकारचे उद्योगधंदे करून, प्रजेनें आपली उपजीविका करून घ्यावी हेंच उचित आहे. " याप्रमाणें एक क्षणपर्यंत विचार केल्यावर प्रभूनें प्रजेस ' भिऊं नका ' असें आश्वासन दिलें. नंतर भगवतानें इंद्राचें स्मरण केल्याबरोबर तो देवांसह तेथें आला. इंद्रानें शुभ मुहूर्त पाहून त्या दिवशीं अयोध्यानगरीच्या मध्यभागीं प्रथम मंगल करून तेथें व त्या नगराच्या भोंवतीं क्रमानें पूर्व, पश्चिम वगैरे सर्व दिशांत जिनमंदिरांची स्थापना केली; नंतर पृथ्वीवर चोहींकडे इंद्र, कोशल वगैरे मोठमोठे देश, साकेता वगैरे नगरी व गावें, खेडीं इत्यादिकांची रचना केली. त्यानंतर आपण रचिलेल्या ह्या निरनिराळ्या ठिकाणीं आदिकर्त्याच्या आज्ञेनें लोकांची वसति करून, प्रभूनें सांगितलेलें काम संपल्यावर इंद्र आपल्या ठिकाणास गेला. प्रजेच्या जीवनाकरितां असि, मषि, कृषि, विद्या, वाणिज्य व शिल्प हीं सहा कर्में योजिलीं. शस्त्र धारण करून जीवन करणें याला ' असिकर्म ' ह्मणतात. लिहून निर्वाह चालविणें याला ' मषिकर्म '; जमिन नांगरणें, खुरपणें याला ' कृषिकर्म '; शास्त्रावर उपजीविका करणें याला ' विद्याकर्म ': व्यापारधंदा करणें याला 'वाणिज्य ' व हस्तकौशल्य ( उदाहरणार्थ, चित्रें काढणें, पानें कोरणें वगैरे ) जें आहे त्याला ' शिल्पकर्म ' म्हणतात. त्यावेळीं ऋषभदेवानें क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे तीन वर्ण निर्माण केले. शस्त्रावर जे जगणारे ते ' क्षत्रिय '; कृषि, वाणिज्य, गुरें पाळणें इत्यादिक धंदा करून उपजीविका करणारे ते ' वैश्य ' आणि क्षत्रिय व वैश्य यांची सेवा करणारे ते ' शूद्र ' होत. याप्रमाणें

लोक आपापल्या योग्यतेप्रमाणें वर सांगितलेले धंदे करूं लागले. त्यांच्या विवाहाचा व जातिसंबंधाचा व्यवहार ऋषभदेवाच्या मताप्रमाणें होऊं लागला. निष्पाप असा जगांत जितका जीवनोपाय आहे, तितका सर्व या ऋषभदेवाच्या मतानेंच प्रवृत्त झाला. याप्रमाणें युगाचा आदिब्रम्हा जो ऋषभदेव त्यानें या प्रकारचें युग केलें म्हणून त्या युगाला 'कृतयुग' असें पुराणवेत्ते म्हणतात. आदितीर्थंकरानें आषाढ महिन्याच्या कृष्णपक्षांतील प्रतिपदा तिथीस कृतयुगाचा आरंभ केला. वर सांगितलेल्या सहा कर्मांचा विनियोग ( व्यवस्था ) करून कांहीं दिवस लोटलें. पुढें जेव्हां प्रजेची स्थिति चांगली होऊन जिकडे तिकडे क्षेम झालें, तेव्हां देवांनीं त्याला आधिराज्य पदावर अभिषिक्त केलें. त्यायोगें, त्याचें प्रभुत्व भूलोकीं व स्वर्गलोकीं ही पसरलें. त्यावेळीं नाभिराज प्रभृति राजांनीं, मागध, वरतनु व प्रभास या तिवां व्यंतरेंद्रांनीं व नगरवासी लोकांनीं आदिजिनाच्या पदकमलांचा अभिषेक केला. देवांनीं दिव्य अशा गंधोदकांनीं पुनः एकवार अभिषेक केला; व शेवटीं, सुवर्णरत्नादिकांचा त्याजवर वर्षाव केला. तदनंतर नाभिराजानें आदिनाथ हा **'राजाधिराज'** झाला म्हणून आपल्या हस्तानें त्यास किरिट अर्पण केलें; व त्याच्या ललाटावर पट्टबंध बांधिला. यानंतर इंद्र, देव व दैत्य हे सर्व भगवंताच्या पदसेवेमध्यें आपली चित्तवृत्ति ठेवून स्वर्गलोकीं गेले. ऋषभनाथ आधिराज्यपदावर आरूढ होऊन, नाभिराजाजवळ प्रजापालन करण्याविषयीं पुढें लिहिल्याप्रमाणें यत्न करूं लागला. प्रथमत त्यानें प्रजेच्या जीवनाचे नियम

करून, त्या त्या जातींच्या प्रजेनें आपापला धर्म उल्लंघूं नये असा त्यांना उपदेश केला. क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांना आपापलीं कर्तव्यें सांगून पुढें भरत हा ब्राह्मणवर्ण उत्पन्न करील असें ही सांगितलें. १ शिकणें, २ शिकविणें, ३ दान देणें, ४ दान घेणें, ५ पूजा करणें व ६ पूजा करविणें ह्या सहा क्रिया ब्राह्मणांच्या जीवनाच्या होत. आणि जलप्रदेश व स्थलप्रदेश याठिकाणीं जाऊन तेथें कृषि, पशुपालन व वाणिज्य वगैरे करून वैश्यांनीं आपली उपजीविका करावी. आतां प्रभु विवाह नियम सांगतात. शूद्रानें शूद्रकन्येशींच लग्न लावावें; क्षत्रिय वगैरेंच्या कन्येशीं लग्न करण्याचा त्याला अधिकार नाहीं. वैश्यानें वैश्य कन्येशीं आपला विवाह करावा; शुद्र कन्येशीं केला तरी हरकत नाहीं. क्षत्रियानें क्षत्रिय कन्येशीं, व इच्छा असल्यास वैश्य व शूद्र या दोन वर्णाच्या कन्येशीं विवाह करावा. व ब्राह्मणानें ब्राह्मणकन्येशीं विवाह करावा; तरी क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांच्या कन्येशीं विवाह करण्याचा त्याला अधिकार आहे. कृषि वगैरे सहा धंदे या आदिजिनेंद्रानें पूर्वी उत्पन्न केले होते. त्यामुळें, तेव्हांपासून भोगभूमि जाऊन ही कर्मभूमि झाली होती. उद्योगधंद्यावांचून जेथें निर्वाह चालत नाहीं तिला 'कर्मभूमि' असें ह्मणतात. सर्व वर्णांचें योगक्षेम नीट चालण्याकरितां आदिनाथानें 'हा! मा!! धिक्कार!!!' असा तीन प्रकारचा दंड करण्याची व्यवस्था सुरू केली. कांहीं राजांस त्यानें दंडधर केलें; ह्मणजे त्यांना दंड करण्याचा अधिकार दिला. जीवनाचा उपाय मनन केला ह्मणून लोक त्याआदिजिनेंद्राला ' मनु ' व ' कुलधर ' ह्मणूं लागले. तसेंच,

त्याला ' विधाता ' ' गौतम ' व ' इक्ष्वाकु ' या नांवानींही संबोधूं लागले. आदिदेवानें ६३ लक्षपूर्वकालपर्यंत राज्य केलें. पुत्रपौत्रादिकांसह अयोध्या नगरींत राज्यसुखानुभव घेत असतां व समग्र पृथ्वीचें योग्य पालन करित असतां त्याचा एवढा मोठा काळ सहज गेला. ऋषभदेवाची आज्ञा इंद्र, चंद्र, सूर्य आदि श्रेष्ठ देवसुद्धां पाळित असत; पण याच्यावर मात्र कोणाचीच हुकमत चालत नसे. वाचकहो, हें सर्व पुण्याचें फळ आहे. इंद्रपद, तीर्थंकरपद व शेवटीं सर्व श्रेष्ठ असें **मोक्षपद** हीं सगळी प्राप्त होण्यास पुण्यच कारण होय. ह्मणून, सर्वांना ज्ञानदान द्या; चतुर्विध संघांस आहारदान वगैरे द्या; तीर्थंकरांची स्तुति वगैरे करून त्यांची पूजा करा; शीलव्रतें पाळा; इंद्रियनिग्रह करा. दशधर्माचा अंगिकार करून अहिंसा धर्म पाळा; ह्मणजे तुह्मांस पुण्यबंध होऊन सुखप्राप्ति होईल.

## पर्व १७ वें.

### भगवत्परिनिष्क्रमण (दीक्षा) वर्णन.

यानंतर एकेदिवशीं ऋषभदेव राजसभेंत शेंकडों राजांच्या मध्यभागीं सिंहासनावर बसला असतांना, इंद्र त्याची पूजा करण्याकरितां अप्सरा व गंधर्व यांसह तेथें आला. आदिजिनेंद्राची आराधना करावी या हेतूनें इंद्रानें अप्सरांचें त्या ठिकाणीं नृत्य करविलें. तें पाहून प्रभूची चित्तवृत्ति त्यांत तल्लीन झाली. तेव्हां इंद्राच्या मनांत आलें कीं, भगवंतास राज्यभोगापा-

सून कसें विरक्त करावें ? याबद्दल थोडासा विचार करून, त्यानें **नीलांजना** नांवाची देवलोकीची सुंदर वारांगना नृत्य करण्यास उभी केली. ती अप्सरा हावभावयुक्त नृत्य करीत असतांना, तिच्या आयुष्यदीपाचा नाश झाल्यामुळें ती एकाएकीं तेथेंच अदृश्य झाली. तथापि, रसभंग होऊं नये ह्मणून इंद्रानें तथें तसेंच दुसरें एक पात्र स्थापन करून, पूर्वीप्रमाणेंच नृत्य चालू ठेविलें. भगवंतानी तें रूपांतर तात्काळ ओळखिलें. तें पाहून विषयभोगांपासून ते विरक्त होऊन, मनाशीच विचार करूं लागले की, "अहो, हें जग क्षणभंगुर आहे. हें यौवन, हें ऐश्वर्य, हा देह, ही लक्ष्मी इत्यादि सर्व क्षुद्र व चंचल आहेत; अहो, हे रत्नादिकांचे अलंकार ह्मणजे केवळ भार आहेत. खरोखर, आचार्यांची खालील उक्ति किती अर्थपूर्ण आहे पहाः—

**यद्यस्ति स्वगता शोभा किं किलालंकृतैः कृतम् ।**
**यदि नास्ति स्वतः शोभा भाररेभिस्तथापि किम् ॥४१॥**

**अर्थः**—जर जातींचेंच सुंदर आहे, तर तेथें अलंकारांचें काय काम आहे ? जर स्वत चेंच सौंदर्य नाहीं, तर केवळ भार अशा अलंकारांनीं कसली शोभा येणार ? या अलंकारादिकांपासून आत्म्याला काय उपयोग ? पण चमत्कार असा कीं, हा विचारा संसारी प्राणी हे सर्व पदार्थ स्थिर मानितो. निःसार असा हा संसार पापमय व दुःखमय आहे. नरकांत दुःख, तिर्यंच योनीमध्यें दुःख व मनुष्यपणांतही दुःखच. बरें, स्वर्गांत तरी सुख आहे असें ह्मणावें, तर स्वर्गलोकीं जन्मलेले जे संसारी प्राणी आहेत त्यांना तेथून मनुष्यलोकीं येतांना अत्यंत दुःख

वाटतें. शिवाय, तेथेंही इष्टवियोग होतो; आणि उच्च नीच हा भेद आहेच. त्यामुळें तेथील जीवांस सुद्धां मानसिक दुःख भोगावें लागतें. याप्रमाणें या संसारचक्रामध्यें सांपडलेला हा बिचारा प्राणी दुष्कर्माच्या उदयामुळें वारंवार दुःखच अनुभवितो. विषवेलीचीं फळें जशीं प्राणघातक असतात तसे विषयभोग प्राणघातक आहेत. ह्मणून, या असार संसाराला व या राज्यभोगांला धिक्कार असो !" याप्रमाणें भोगांपासून विरक्त झाल्यामुळें आदिजिनेंद्राला हें सगळें जग शून्य भासूं लागलें. त्यावेळीं सौधर्मेंद्रानें आपल्या अवधिज्ञानानें भगवंतास उपरति झाली आहे असें जाणिलें. त्यासमयीं प्रभूला बोध करण्याकरितां व दीक्षा कल्याण्याच्या वेळीं करण्याच्या पूजेकरितां ब्रह्मलोकापासून लौकांतिक देव तेथें आले. ब्रह्मलेकाच्या अंतभागीं हे देवर्षि असतात ह्मणून त्यांना 'लौकांतिक' असें नांव आहे. ह्यांची लेश्या (चित्तपरिणाम) शुभ असते. या देवर्षींनी कल्पवृक्षांच्या पुष्पांनीं भगवंताच्या पदकमलाची उत्तम प्रकारें पूजा करून, नंतर प्रभूचें खालीलप्रमाणें स्तोत्र गाण्यास आरंभ केला:—

"हे भगवन्, तूं उत्कृष्ट ज्योतिःस्वरूप आहेस. तूं वैराग्यरूपी खड्ग हातांत घेऊन कर्मशत्रूंस जिंकण्याचा उद्योग करित आहेस हें योग्यच आहे. आतां, तूं दाखविलेल्या धर्मतीर्थाचा आधार करून भव्य जीव भयंकर व दुस्तर अशा या संसारसमुद्रांतून सहज पलीकडे जातील. हे देवा, तूं मोक्षमार्ग स्वतः जाणिलास ह्मणून लोक तुला स्वयंभू ह्मणतात. हे प्रभो, तूं जगाला बोध करून त्याजवर उपकार करण्याचा उद्योग कर. तूं धर्मसृष्टि कर-

ण्यास योग्य आहेस. ह्मणून हे दयानिधान, तूं कर्मशत्रूंना जिंक. बावीस परिषह सहन करून मोहरूपी दैत्याचा पराभव कर. हे जगत्पते, तू आता मुक्ती करिता तयार हो. आतां, हे संसारांतील सुखोपभोग पुरे. कारण, हे वारंवार किती वेळांही भोगिले तरी याच्यामध्यें निराळा नवीन रस ह्मणून अनुभवास येत नाहीं." नंतर भगवंतास दीक्षा घेण्याचें स्मरण करून, कृतार्थ झालेले ते लौकांतिक देव स्वर्गास गेले. आदिजिनेंद्रानें ही दीक्षा घेण्याचा निश्चय केला. इतक्यांत, देवांचीं आसनें कंपायमान झाल्यामुळें भगवंताचें दीक्षाकल्याण जाणून,इंद्र प्रभृति देव प्रभूच्या दीक्षाकल्याणिकासाठीं तेथें आले. तदनंतर, सौधर्मेंद्रानें क्षीरसमुद्राच्या जलांनीं भगवंतास महाभिषेक करून, दिव्य वस्त्रें, अलंकार व माला यांहींकरून प्रभूचें शरीर सजविलें. यावेळीं आदिभगवान् हे जणूं काय मुक्तिवधूला वरण्यासाठीं निघालेल्या नवरदेवासारखेंच दिसूं लागले. नंतर आदितीर्थंकरानें साम्राज्यपदावर आपला श्रेष्ठ पुत्र जो भरत त्याला अभिषिक्त करून हें भारत वर्ष सनाथ केलें. व युवराजपद बाहुबलीला दिलें. भगवंताचें दीक्षाकल्याण व भरत भुजबलीचें राज्यपदग्रहण या दोन उत्सावांच्या योगानें त्यावेळीं स्वर्गलोक व भूलोक आनंदमय झाला. भगवंतांनीं बाकीच्या आपल्या सर्व पुत्रांसही ही सगळी पृथ्वी विभागून दिली. नंतर आदिभगवान् हे नाभिराज वगैरे इष्टजनांस विचारून, इंद्रांनीं निर्मिलेली दिव्य अशी जी सुदर्शन नांवाची पालखी तींत विराजमान झाले. प्रथमतः ती पालखी भूमिगोचरी राजेलोकांनीं सात पावलें

वाहून नेली. नंतर विद्याधरांनी ती पालखी सात पावलें अंतराळीं नेल्यावर, इंद्रप्रभृति देव व दैत्य यांनी ती घेऊन त्वरेनें आकाशांत उड्डाण केलें. त्यावेळी देवलोकींचे चारण गमनकालचा मंगलपाठ उच्च स्वरांनीं ह्मणूं लागले. व देवांनी प्रयाणकालचीं दुंदुभि वगैरे वाद्यें चहूंकडे वाजविली. देव व दैत्य हे त्या आनंदाच्या भरांत ' जयजय ' असा घोष करूं लागले. याप्रमाणें प्रथम तीर्थंकर आदिजिनेंद्र त्या अयोध्या नगरीतून बाहेर पडला. त्यासमयीं नगरवासी लोक ह्मणालेः—

' हे भगवन्, तूं सिद्धीकरितां चालला आहेस, तर जा. तुझा मार्ग कल्याणरूप असो ! तूं कृतार्थ होऊन पुनः लौकरच आह्मांस दर्शन दे; व आह्मा अनर्थांचें रक्षण कर. ' आदिभगवान् नगराबाहेर चालला असतां, यशस्वती व सुनंदा प्रभृति राजपत्नी शोकानें नेत्रांतून अश्रुधारा सोडीत, भगवंताच्या पालखीच्या पाठीमागून पायीं जात होत्या. त्यासमयीं नाभिराजमनु हा आपल्या मरुदेवीस बरोबर घेऊन जिनाचा दीक्षा कल्याणोत्सव पाहण्याकरितां निघाला. तसेंच नामांकित नागरिक, राजे, प्रधान, मंत्रिमंडळ व आपला बंधु भुजबली यांच्यासह मोठ्या ऐश्वर्यानें तो पृथ्वीपति भरतराजाही प्रभूच्या पाठीमागें गेला. देवांनीं आकाशांत फारसें उंच न जाऊन ह्मणजे लोकांस चांगलें दिसेल इतक्या अंतरावरून गमन करीत, अयोध्या नगरीपासून फार दूरही नव्हे व जवळही नव्हे अशा त्या विस्तीर्ण सिद्धार्थक नांवाच्या वनांत ती पालखी नेऊन ठेविली. तेथें त्यांनीं भव्य व सुशोभित असा मंडप उभारिला होता. भगवान् पाल-

खींतून उतरून त्या सिद्धार्थक वनांतील शिलेवर विराजमान झाले. ती शिला पाहून, भगवंतास जन्माभिषेकाच्या वेळच्या पांडुक शिलेचें स्मरण झालें. त्या शिलेवर बसून त्यांनीं एक क्षणपर्यंत सर्वांशी समाधानकारक भाषण करून, पुन: एकवार आपल्या बांधवांस दीक्षा घेण्याबद्दल विचारिलें. तदनंतर भगवान् ऋषभदेवांनीं शांतभाव धारण करून, इंद्र व सिद्धपरमेष्ठी यांच्या साक्षीनें दास, दासी, हत्ती, घोडे इत्यादिक जे सचेतन पदार्थ, तसेंच, रत्नपुष्पादिकाचे हार, आभरण, वस्त्रें वगैरे जे अचेतन पदार्थ या सर्वांचा त्याग केला; व निष्परिग्रहता हीच ज्यांत मुख्य आहे अशी व्रतभावना भावून महाव्रतें धारण केलीं. नंतर, पूर्वेकडे मुख करून, पल्यंकासनानें बसलेल्या त्या आदिप्रभूंनीं सिद्धपरमेष्ठींस नमस्कार करून पंच मुष्टीनें केशलोच केला. याप्रमाणें चैत्रमासीं कृष्णपक्षीं नवमी तिथीस सुमुहूर्तावर सायंकाळच्या वेळीं दिगंबर रूप धारण करून भगवंतांनीं जिनदीक्षा ग्रहण केली. देवेंद्रानें भगवंताच्या मस्तकावर चिरकालवास करून पवित्र झालेले केश रत्नकरंडकांत भरून घेऊन, पवित्र क्षीरसमुद्रांत टाकिले. त्यावेळीं स्वामिभक्तीनें प्रेरित होऊन चार हजार राजे लोकांनीं प्रभूंच्या बरोबर दीक्षा घेतली. तथापि, त्यांना खरें आत्मज्ञान झालें नसल्यामुळें भगवंताची सेवा करावी याच हेतूनें—केवळ मूढपणानें—त्यांनीं निर्ग्रंथदीक्षा घेतली. सारांश, ते द्रव्यनिर्ग्रंथ झाले; पण भावनिर्ग्रंथ झाले नाहींत, म्हणजे त्यांनीं दिगंबर दीक्षेचें फक्त बाह्य स्वरूपच धारण केलें. त्या चार हजारांपैकीं कित्येक राजे अज्ञाना-

मुळें, कित्येक भीतीमुळें, तर कांहीं स्नेहामुळें—याप्रमाणें निरनिराळ्या कारणांनीं प्रेरित होऊन—ते आदिजिनेंद्राबरोबर तपश्चर्या करूं लागले. असो. नंतर ते स्वर्गलोकींचे इंद्र भगवंताची स्तुति करीत व त्याच्या गुणांचें स्मरण करीत आपापल्या ठिकाणास परत गेले. त्यानंतर भरत राजानें मोठ्या भक्तीनें भगवंताच्या चरणाची पूजा करून त्यांना नमस्कार केला व समस्त राजे व आपले बंधु यांसह तो राजाधिराज भरत अयोध्येस परत गेला. तेथें तो सार्वभौम भरत राजा प्रतिदिवशीं प्रातःकाळीं भक्तीनें आपले बंधू व इतर राजे यांसह प्रथम गुरूचरणाचें स्मरण करून समस्त पृथ्वीचें यथायोग्य पालन करूं लागला.



## पर्व १८ वें.

—×—

### धरणेंद्रविजयार्धोपगमन.

याप्रमाणें दीक्षा घेतल्यावर देहाविषयीं अत्यंत निस्पृह होऊन, **भगवान् आदिनाथांनीं** सहा महिनेपर्यंत उपवास करण्याची प्रतिज्ञा केली. व योगाच्या एकाग्रतेनें त्यांनीं अंतःकरण ह्मणजे मन व बहिष्करण ह्मणजे चक्षु वगैरे इंद्रियें यांच्या दुर्व्यापारांचा निरोध केला. आणि प्रभु कठीण अशा शिलातळावर पायाच्या अग्रभागीं बारा अंगुलांचें, व दोन्ही टांचांच्या मध्यभागीं चार अंगुलांचें अंतर ठेवून ध्यानस्थ उभे राहिले. दीक्षा घेतल्यानंतर त्यांना मनःपर्यय नांवाचें चवथें ज्ञान प्राप्त झालें.

ऋषभदेवांनीं योग धारण करून अद्याप दोन तीन महिने लो- टले नाहींत तोंच, बाकीचे राजर्षी गलितधैर्य झाले. कित्येक तपाच्या क्लेशांस कंटळाले. कांहींनीं अन्नाशिवाय इत.पर जगणें शक्य नाहीं असें जाणून, गुरूचा योग संपेतोंपर्यंत तरी तेथेंच राहून, अन्नाऐवजीं अरण्यांतील कंद, मूल, फळें वगैरे खाऊन व झाडांच्या साली वगैरे पांघरून प्राणरक्षण करण्याचें योजिलें. कित्येक गुरूला न विचारितांच व कित्येक त्याला विचारून व नमस्कार करून आपल्या जीवरक्षणाकरितां नि- घाले. कित्येकांनीं तप करण्याचें सोडिलें. कित्येक लोकांनीं वल्कलें नेसून फळें खाण्यास व पाणी पिण्यास आरंभ केला. कांहीं लंगोटी धारण करून स्वेच्छाचार करूं लागले. कि- त्येक अंगास भस्म लावून जटाधारी झाले. कित्येक आतां आपण गांवांत गेलों तर भरत आपल्याला त्रास देईल अशा भीतीनें तेथेंच लहान लहान झोंपड्या बांधून राहिले. **मरीची** या नांवाचा वृषभ देवाचा नातु होता. तोही असाच संन्यासी झाला होता. त्यानें वेदादि सिद्धांताला अनुसरून मिथ्यात्वाची वृद्धि केली. हल्लीं जें योगशास्त्र व सांख्यशास्त्र आहे तें त्यानें ( मरीचीनें ) केलेलें आहे. याप्रमाणें ते सगळे तपस्वी तपोभ्रष्ट झाले. परंतु तो मेरुसारखा निष्कंप व वायुप्रमाणें निःसंग असा वृषभदेव तसाच स्थिर राहिला. तो महाधैर्यशाली आदिप्रभु सहा बाह्य तपें व सहा अंतरंग तपें आचरित होता. तीं अशीं:-

१ अनशन (उपोषण करणें), २ अवमोदर्य (अल्प आहार घेणें ), ३ वृत्तिसंख्या ( इयत्ता करून तेवढेच पदार्थ खाणें ),

४ रसत्याग, ५ कायक्लेश व ६ विविक्तशय्यासन (एकांत व स्वच्छ प्रदेशांत बसणें, वगैरे). हे सहा प्रकार बाह्यतपाचे आहेत.

१ प्रायश्चित्त, २ विनय, ३ वैय्यावृत्त्य, ४ व्युत्सर्ग (शरीरादिकांवरील ममत्व सोडणें), ५ स्वाध्याय व ६ ध्यान हीं सहा आंतर तपें आहेत. त्यांपैकीं प्रभूचें लक्ष 'ध्यान' तपाकडेच विशेष होतें. तसेंच, १ अहिंसा, २ सत्य, ३ अस्तेय, (चोरी न करणें), ४ ब्रह्मचर्य व ५ अपरिग्रह हीं पांच व्रतें; १ ईर्या, २ भाषा, ३ एषणा, ४ आदाननिक्षेपण, ५ प्रतिष्ठापन ह्या पांच समिति; ५ पंचेंद्रियांचा निरोध; १ प्रातिक्रमण, २ कायोत्सर्ग, ३ सामायिक, ४ वंदना, ५ स्तुति व ६ स्वाध्याय ह्या सहा आवश्यक क्रिया; व केशलोच, २ भूशय्या, ३ अदंतधावन, ४ अचेलत्व (अंगावर वस्त्र न घेणें), ५ अस्नान, ६ स्थितिभोजन (उभें राहून जेवणें) व ७ एकभुक्त (चोवीस तासांतून एकवेळ जेवणें) हे यतींचे २८ मूलगुण वृषभदेव पाळित असत. प्रभूनीं जेथें प्रतिमायोग धारण केला होता त्या तपोवनांत सर्वत्र मूर्तिमंत शांततेचें साम्राज्य होतें. सिंह भगवंताच्या पायांजवळ येऊन हरीणींशीं स्नेहभावानें वागूं लागले. हरिणांचीं बालकें दुभत्या वाघिणींजवळ जाऊन त्यांना आपल्या आया असें समजून स्तनपान करूं लागले. जिनेंद्राच्या पदकमलावर वनगज प्रफुल्लित अशीं कमलें आणून अर्पण करित असत. सारांश, त्या वनांतील सर्व पशूंनीं आपसांतील वैरभाव सोडून ते परस्पर प्रीतीनें वागूं लागले. ह्याप्रमाणें

१ टीपः—शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या पांच इंद्रियांचे विषय सोडणें.

तेथें जिकडे तिकडे **साम्यभाव** भरून गेला. **योगाचें** माहात्म्य ह्मणतात तें हेंच. हा **तपाच्या** अनुष्ठानाचा प्रभाव होय. वृषभदेवानें जरी सहा महिन्याचें उपोषण केलें होतें, तरी त्याला क्षुधेपासून होणारी पीडा मुळींच झाली नाहीं. याचें कारण आचार्य खालील श्लोकार्धांत सांगतातः—

**सन्तोषभावनोत्कर्षाज्जयेत् गृद्धिमगृध्नुता ।** अर्थात्, संतोषवृत्तीच्या उत्कर्षापासून उत्पन्न होणारा जो निरिच्छपणा तो इच्छारूपी विकारास जिंकतो. याप्रमाणें प्रभूचा तो तपश्चर्येचा सहा महिन्यांच्या प्रतिमायोगाचा ( ध्यानस्थ उभे राहणें ) काल संतोषवृत्तीमुळें क्षणासारखा लोटला. इतक्या अवधींत, कच्छ व महाकच्छ या दोघा राजाचे नमि व विनमि या नांवाचे दोघे तरूण कुमार अतिशय भक्तीनें भगवंताची सेवा करण्याच्या इच्छेनें तेथें आले होते. परंतु ते संसारभोगाविषयीं फारच सतृष्ण असल्यामुळें, त्यांनीं उलट भगवंताच्या ध्यानास मात्र विघ्न आणिलें. ते प्रभूस ह्मणाले, "तूं आपल्या पुत्रांना व नातवांना हें साम्राज्य वांटून दिलें. त्यासमयीं तुला आह्मा दोघांचा मात्र विसर पडला.तर आतां आह्मास राज्यवैभव दे." याप्रमाणें ते दोघे प्रभूला विघ्न करूं लागले. तेव्हां धरणेंद्र नांवाच्या भवनवासी ह्म०पाताळांतल्या इंद्राचें आसन कंपायमान झालें. त्यानें अवधिज्ञानाच्या योगानें नें सर्व वृत्त जाणिलें व तात्काल तो तेथें आला. भगवंतास तीन प्रदक्षिणा घालून व नमस्कार करून, तो धरणेंद्र आपलें खरें रूप झाकून कुमारास ह्मणाला, "तरूणहो, हा भगवान् तर भोगाविषयीं निःस्पृह झाला आहे; व तुह्मी त्याच्यापासून भोगांची

इच्छा करीत आहा हें मला चमत्कारीक दिसतें. तुह्माला जर क्षुद्र व नश्वर भोगाची इच्छाच असेल तर भरताजवळ जा. वीतराग अशा या भगवताला विनाकारण उपद्रव करू नका." धरणेंद्राचें हें भाषण ऐकून कुमार ह्मणाले, "गुरूला प्रसन्न करून घेणे हेंच आह्मा दोघाचें इच्छित फल आहे. तेव्हा त्याला प्रतिबध करणारे तुह्मी कोण? अहो, प्रभु अरण्यात राहिला ह्मणून काय झालें? त्याचें प्रभुत्व कोठें गेलें आहे? तुह्मी ह्मणाला भरताजवळ जॉ. पण अहो सद्गृहस्थ, कल्पवृक्षाला सोडून इतर जातीच्या वृक्षाकडे कोणता बेरं शहाणा जाईल?" याप्रमाणें या दोघा राजपुत्राची गुरुभक्ति पाहून, धरणेंद्र मनात फार सतुष्ट झाला व आपलें दिव्यरूप प्रगट करून तो ह्मणाला, "तुह्मी तरुण असूनही तुमचें आचरण वृद्धाप्रमाणें पोक्त आहे. मीं सर्व नागाचा अधिपति आहे. माझें नाव धरणेंद्र. मी या आदिजिनाचा सेवक असून पातालात राहत असतो. तुह्मी भगवतास नमस्कार करून माझ्याबरोबर चला. तुह्मा दोघाना मी राज्यभोग देतों." त्याप्रमाणें त्या कुमारानीं नमस्कार केल्यावर त्याना आपल्या विमानात बसवून, आकाशमार्गानें लौकरच धरणेंद्र विजयार्ध पर्वतास पोंचला. तो विजयार्ध पर्वत ह्मणजे सर्व विद्याधराच्या उत्पत्तीचें एक उत्कृष्ट स्थान होय. तो शुभ्र व रम्य असा पर्वत पाहून धरणेंद्रदेव, नमि आणि विनमि याना अत्यत सतोष झाला.



# पर्व १९ वें.

## नमिविनमिराज्यप्रतिष्ठापन.

त्या विजयार्ध पर्वताच्या पहिल्या टेंकडीवर धरणेंद्र देव उतरला. नंतर त्यानें तेथील विद्याधर राजांच्या वसाहतीचें वर्णन पुढें लिहिल्याप्रमाणें केलें:—" कुमारहो, हा विजयार्धपर्वत खरोखर कोणी उत्पन्न केलेला नसून स्वयंभू आहे. याच्या दोन्हीं बाजूंवर विद्याधर वास करितात. येथें कोणाचें भय नसून अतिवृष्टि वगैरे पीडा आणि रोगादिकांची बाधा कधींच होत नाहीं. कर्मभूमीचा जो नियोग (पाऊस, थंडी, ऊन, शेत, वगैरे) तो सर्व येथें पूर्णपणें आहे. विशेष हाच कीं, मोठमोठाल्या महाप्रज्ञप्ति वगैरे नांवाच्या कामधेनूसारख्या विद्या येथील विद्याधरांचे इष्टार्थ पुरवित असतात. तसेंच, यांना धान्य वगैरे फलसंपत्तीही यथेच्छ भोगावयास मिळते. या पर्वताच्या दक्षिणेकडच्या व उत्तरेकडच्या दोन्हीं श्रेणींवर क्रमानें एकीवर ५० व दुसरीवर ६० नगरें आहेत. ह्या ऐश्वर्यसंपन्न नगरांमध्यें विद्याधर स्वर्गलोकींच्या देवांप्रमाणें राहतात. दक्षिणश्रेणीवर जीं ५० नगरें आहेत त्यांत रथनूपुरचक्रवाल नांवाची राजधानी आहे. येथें संपूर्ण विद्या जाणणारे चक्रवर्ती राज्यलक्ष्मीचा अनुभव घेत सुखानें वास करितात. उत्तरश्रेणींतील नगरें हीं स्वर्गासारखीं आहेत. प्रत्येक शहरातील पुरुष देवपुत्रांप्रमाणें. व स्त्रिया अप्सरांसारख्या. त्यांना सर्व ऋतूंमध्यें उत्पन्न होणारे सर्व भोग्य पदार्थ

पाहिजे तसे उपभोगास मिळतात." याप्रमाणें विजयार्ध पर्वताचें वर्णन करीत करीत धरणेंद्रानें त्या दोघा कुमारांसह रथनूपुरचक्रवाल नगरांत प्रवेश केला. तेथें जाऊन कुमारांना सिंहासनावर बसवून, धरणेंद्रानें हे दोघे तुमचे अधिपति आहेत असें तेथील सर्व विद्याधरांना सांगितलें. नंतर त्यानें विद्याधर स्त्रियांच्या हस्तांतील मोठमोठ्या सुवर्ण कलशांनीं त्या दोघा कुमारांचा अभिषेक करून तेथील विद्याधरांना तो ह्मणाला "हा नमी कुमार दक्षिणश्रेणीचा व विनमी कुमार उत्तरश्रेणीचा चिरकाल अधिपति होवो। भगवान् ऋषभदेवानें आपली संमति देऊन या दोघांना येथें पाठविलें आहे. ह्मणून, हे विद्याधर राजांनो, तुह्मी या दोघांची आज्ञा पाळिली पाहिजे." हें ऐकून धरणेंद्राच्या इच्छेप्रमाणें सर्व गोष्टी त्या विद्याधरांनीं मान्य केल्या. नंतर, त्यानें त्या दोघा कुमारांना गांधारविद्या, पन्नगविद्या शिकविल्या. व त्यांना त्यांच्या त्यांच्या राजधानीमध्यें ठेऊन व त्यांचें राज्य त्यांच्या ताब्यात देऊन कृतकार्य झालेला तो धरणेंद्र आपल्या नगरीला गेला. तो सर्पराज आपल्या नगरीला गेल्यावर नमी व विनमी ह्या दोघां कुमारांनीं विद्याधरांनीं आणलेल्या अनेक प्रकारच्या भोग्य पदार्थांचा उपभोग घेत त्या विजयार्धपर्वताच्या तटावर मोठ्या सुखानें चिरकाल वास केला. वाचकहो, या कुमारांच्या सद्यःस्थितीचा विचार केला ह्मणजे अशी खात्री होते कीं, मनुष्यांचें पुण्यच सुख उत्पन्न करतें. ही विलक्षण संपत्ति या कुमारांना त्यांच्या पूर्व सुकृतानेंच प्राप्त झाली होती यांत मुळींच संदेह नाहीं. ह्मणून सुखेच्छु जीव पुण्य संपादन करोत। व परमा-

नंद देणाऱ्या श्रीजिनगुणाची प्राप्ति व्हावी अशी इच्छा करणारे, भव्य जीव आदिगुरु श्रीजिनेंद्र याला भक्तीनें नमस्कार करून त्याची पूजा करोत !

## पर्व २० वें.

### भगवत्कैवल्योत्पत्तिवर्णन.

ज्याचें महात्म्य अचिंत्य आहे, ज्याची स्थिति मेरुप्रमाणें अचल आहे अशा त्या **आदिजिनेंद्राला** योग धारण करून सहा महिने पूर्ण झाले. त्यानतर देहस्थितीकरिता व यत्याचार सर्वांस समजावा ह्मणून निर्दोष असा आहार आपण शोधावा अशी भगवताला इच्छा झाली. अहो, नवीनच झालेले हे मुनी मोक्षमार्गाच्या अज्ञानामुळें व भूक तहान वगैरेंची पीडा सहन न झाल्यामुळें कसें गलित झाले आहेत पहा! आता, ह्याना मोक्ष-मार्गाचा उपदेश केलाच पाहिजे, आणि तो ऐकण्यास व मुक्ति मिळविण्यास ह्याच्या देहाची स्थिति चागली असावी ह्मणजे तेवढ्यापुरतें सामर्थ्य याच्या अगीं असावें ह्मणून आहार घेण्या-चा क्रम याना दाखविला पाहिजे कारण, आचार्य ह्मणतात —

न केवलमयं कायः कर्शनीयो मुमुक्षुभिः ।
नाप्युत्कटरसैः पोष्यो मृष्टैरिष्टैश्च वल्भनैः ॥ ५ ॥
वशे यथा स्युरक्षाणि नोत धावन्त्यनूत्पथम् ।
तथा प्रयतितव्यं स्याद् वृत्तिमाश्रित्य मध्यमाम् ॥ ६ ॥

अर्थः—मुमुक्षूंनीं केवळ आपला देह झिजवूं नये; व रुचिकर आणि पौष्टिक ह्मणजे इंद्रियास उद्वेग करणाऱ्या व कषाय वाढविणाऱ्या अशा रसांनीं तो पुष्टही करू नये. तर इंद्रियें जेणेंकरून वश राहून तीं दुर्मार्गी प्रवृत्त होणार नाहींत अशा प्रकारचा निर्दोष व पौष्टिकरसरहित आहार घेऊन, मध्यमवृत्तींत राहून मोक्षमार्ग साधावा असा आप्तोपदेश आहे. आहाराविषयीं प्रीति आदि विकार दूर करण्याकरितां उपोषण वगैरे करणें अवश्य आहे. व प्राणधारण करून राहण्याकरितां योग्य तितका आहार घेणेंही इष्ट आहे असें परमागमांत सांगितलें आहे. ह्मणून जोंपर्यंत मनाला क्लेश होत नाहींत तोंपर्यंतच कायक्लेश करणें योग्य आहे. कारण, मनाला संक्लेश झाले ह्मणजे तें अस्वस्थ होऊन साहजिकच अनाचाराकडे प्रवृत्त होतें.

याप्रमाणें विचार करून भगवान् आदिजिनेंद्र योग संपवून तेथून विहार करण्यास निघाले. मुनीवृत्ति धारण करून ते ज्या ज्या ठिकाणीं जात असत त्या त्या ठिकाणचे लोक मोठ्या संभ्रमानें त्यांस प्रणाम करून ह्मणत कीं, 'महाराज, प्रसन्न व्हा. कोणत्या प्रयोजनानिमित्त आपलें येथें आगमन झालें तें निवेदन करा.' हे त्याचें भाषण ऐकून प्रभु मुकाट्यानें तसेच पुढें जात असत. कित्येक ठिकाणचे लोक अमूल्य रत्नें आणून त्या मुनिवृत्ति धारण केलेल्या जिनापुढें ठेवून ह्मणत कीं, भगवन्, यांचा स्वीकार करा. कित्येक पुष्पमाळा, वस्त्रें, आभरणें वगैरे सुखोपभोगाचे पदार्थ ग्रहण करण्याचा आग्रह करित असत. कित्येक तर चांगल्या सुंदर व तरुण अशा आपल्या मुली आणून त्यांच्याशीं

विवाह करण्यास उद्युक्त झाले. कित्येक त्याच्यापुढें भोजनसामुग्री ठेवून तिचा स्वीकार करण्याबद्दल विनति करीत असत. याप्रमाणें त्या भोळ्या व अज्ञानी लोकानी त्याची प्रार्थना केली तरी भगवान् काहींच उत्तर न देता तसेच पुढें जात असत. अशी उत्कृष्ट चर्या ( भिक्षेकरिता गमन ) आचरित असताना, प्रभूचे आणखी सहा महिने लोटले. योग धारण करण्यात लोटलेले सहा महिने व आहाराकरिता हिंडताना लोटलेले सहा महिने मिळून एक वर्ष पूर्ण झाल्यावर, प्रभू कुरुजांगदेशातील हस्तिनापूर नगराजवळ आले. त्यावेळीं तेथें कुरुवशातील सोमप्रभ नावाचा राजा राज्य करित होता. हा त्या वशातला मूळ पुरुष होय. श्रेयान् या नावाचा सोमप्रभ राजाचा कनिष्ठ बधु होता. श्रेयान् हा पूर्व जन्मी अहमिंद्र देव होता. भगवान् हास्तिनगराजवळ असता श्रेयान् राजानें रात्रीच्या शेवटच्या प्रहरीं स्वप्में पाहीलीं ती अशीं – मेरुपर्वत, कल्पवृक्ष, सिंह, वृषभ, सूर्य, चद्र, समुद्र व अष्टमगल धारण केलेल्या व्यतरदेवाच्या मूर्ती. भगवत्पादाचें दर्शन होणें हेंच या स्वप्नाचें मुख्य फल होय. प्रात काळीं श्रेयान् राजपुत्रानें आपला वडील बधु जो सोमप्रभ त्याला रात्रीं पाहिलेलीं स्वप्में सांगितलीं. तेव्हा पुरोहितानें स्वप्नाची फलश्रुति सांगितली. ती अशी -"स्वप्नात प्रथम मेरुपर्वत पाहिला त्याचें फळ हें कीं, जो मेरुपर्वताप्रमाणें उन्नत आहे असा भगवान् आदिजिनेंद्र आपल्या घरीं येईल. बाकींचीं स्वप्में असें सुचवितात की, भगवान् सर्वसद्गुणपरिपूर्ण आहे. त्याचें आपल्याकडून उत्तम प्रकारचें स्वागत होईल. व त्यामुळें राज आपल्याला फार मोठा पुण्यलाभ होऊन जगात आपली

अत्यंत प्रशंसा होईल." याप्रमाणें पुरोहिताचें भाषण ऐकून संतुष्ट झालेलें तें बंधुद्वय अद्याप स्वप्नफलाच्याच गोष्टी बोलत आहेत तोंच, योगींद्र अशा त्या वृषभदेवानें हास्तिनापुरांत प्रवेश केला. त्यासमयीं प्रभूचें दर्शन घेण्याकरितां सर्व नगरवासी लोक मोठ्या गडबडीनें व उत्सुकतेनें पुढें पुढें आले. संवेग व वैराग्य हीं साधण्याकरितां उद्युक्त झालेला, सर्व प्राणिमात्राविषयीं मैत्री धारण करणारा, गुणी जनांविषयीं संतोष बाळगणारा, दुःखी जीवांविषयीं करुणाभाव ठेवणारा, अविनीत (मिथ्यादृष्टि) जीवांविषयीं माध्यस्थभाव चिंतणारा, व ईर्यापथ शुद्धीकरितां पुढें मार्गे चार हात पावलांखालची जमीन पहात रस्त्यानें सावकाश चालत जाणारा तो श्रीमान् आदिजिनेंद्र यतिनियमास योग्य अशा रीतीनें प्रत्येक घरास जाऊन तेथें विधीप्रमाणें आहार न मिळाल्यामुळें शेवटीं राजमंदिराकडे वळला. द्वारपालानें तात्काल भगवान् इकडेच आहेत ह्मणून आंत वर्दी दिली. ती ऐकून सोमप्रभराजा, श्रेयान् राजपुत्र, अंतःपुरांतील स्त्रिया, सेनापती व अमात्य हे सगळे उठून उभे राहिले. नंतर ते दोघे बंधु अंगणाच्या बाहेर जातात तोंच, त्यांना भगवान् दिसले. तात्काल त्यांनीं नम्र होऊन नमस्कार केला. व प्रभुचरणीं अर्घ्य व जल अर्पण करून, त्याला तीन प्रदक्षिणा घातल्या. भगवंताचें रूप पाहून श्रेयान् कुमारास जन्मांतरींचें स्मरण झालें. व पूर्व संस्कारामुळें त्याला भगवंतास दान देण्याचीही इच्छा झाली. श्रीमती व वज्रजंघ यांनीं पूर्व जन्मीं दोघां चारण मुनींस दिलेल्या दानाचें व त्या प्रसंगीं घडलेल्या हकीकतीचें त्याला स्मरण झालें. मुनीला

दान देण्यास योग्य अशी सुसधि आली आहे असें जाणून श्रेयान् कुमारानें विधिपूर्वक, नवविधाभक्तीनें व मोठ्या श्रद्धेनें भगवतास दान दिलें, अर्थात् त्याना प्रासुक (दोपरहित) आहार दिला

श्रद्धा, भक्ती (हें पात्र पूज्य आहे असें मानणें.), शक्ती (आळस न करणें), विज्ञान (दान देण्याचा क्रम ठाऊक असणें), अलुब्धता (दान देऊन मोबदला मिळविण्याची इच्छा न करणें), क्षमा व त्याग हे सात गुण दात्यामध्यें असले पाहिजेत असें जिनागमात सागितलें आहे. हे सर्व गुण श्रेयान् कुमाराच्या ठिकाणीं होते. तसेंच प्रतिग्रहण, (यतीचें स्वागत करणें), उच्चासनावर पात्रास बसविणें, पादप्रक्षालन, अर्घ्य देणें, नमस्कार करणें, मन, वचन व काय हीं शुद्ध ठेवणें, आणि शुद्ध आहार देणें ही नवविधाभक्ती श्रेयान् कुमारास पूर्व सस्कारा्च्या योगानें प्राप्त झाली होती. भगवतास इक्षुरसाचा प्रासुक आहार दिल्यानतर, आकाशातून सोमप्रभ राजाच्या घरीं देवेंद्रानीं रत्नवृष्टि व पुष्पवृष्टि केली. सोमप्रभ व श्रेयान् हे दोघे आपल्यास फारच कृतार्थ मानून घेऊं लागले. याप्रमाणें तो भगवान् श्रेयान् कुमाराच्या घरीं पारणा करून, तपोवनास गेला. भगवताच्या पाठीमागून काहीं लाबपर्यंत जाऊन तेथून पुन सोमप्रभ व श्रेयान् हे परत नगराकडे आले श्रेयान् कुमाराचें यश सर्व जगभर पसरलें. उघडच आहे, 'सद्दानं हि यशःप्रदम्' अर्थात्, सत्पात्रीं दान हे यश देणारेंच आहे. श्रेयान राजानें

{ टीप १ -प्र = गता + आस्रव = प्राणान यस्माद् स = प्रासुक ।<br>अर्थ.-ज्यात प्राणी नाहींत असा जो आहार त्या ा प्रासुक आहार म्हणतात }

आदीजिनेंद्रास दान दिलें हें ऐकून भरतभुजबलीप्रभृति राजांना आश्चर्य वाटलें. तेव्हां **भरत** श्रेयान् राजास मोठ्या आदरानें ह्मणाला, 'हे दानपते, तूं भगवंताच्या मनांतला अभिप्राय कसा जाणिलास तें मला सांग.' भरताचा तो प्रश्न ऐकून श्रेयान् ह्मणाला, 'भगवंताचें दिव्य रूप पाहून मी फार तुष्ट झालों. आणि त्यामुळें मला जन्मांतरींचें स्मरण होऊन मी भगवंताचा अभिप्राय जाणिला. कारण, हा प्रभु विदेह क्षेत्रांत पुंडरीकिणी नगरींत वज्रजंघ असतांना माझा जीव त्याची श्रीमती नांवाची स्त्री होता. त्यावेळीं मी व वज्रजंघ महाराज यांनीं दोघां चारणमुनींस दान दिलें होतें. हे भरताधिपा, मी दानाची संशुद्धी सांगतो ऐक. '**अनुग्रहार्थं स्वस्यातिसर्गो दानं**।'ह्मणजे पात्रावर अनुग्रह करण्याकरितां अर्थात् त्याला सहाय करण्याकरितां आपल्या द्रव्याचा जो त्याग करणें त्याचें नांव दान. यांत दाता, द्रव्य व दान हीं तीन्हीं शुद्ध असावी. दात्याची विशुद्धि दान देण्याचें द्रव्य व पात्र यांस पवित्र करते. देयाची ( दान देण्याचें द्रव्य ) जी शुद्धि ती दात्यास व पात्रास पवित्र करिते. व पात्राची शुद्धि दात्यास व द्रव्यास पवित्र करिते. श्रद्धादि गुणांनीं व नवविधाभक्तीनें युक्त असा जो दाता तो **शुद्ध दाता** होय. आहार, औषध, शास्त्र आणि अभय असे दानाचे चार प्रकार आहेत. राग, द्वेष वगैरे दोषांनीं रहित व उत्तम गुणांनीं युक्त असा जो पुरुष तें **पात्र** होय. उत्तम, मध्यम, व जघन्य असे पात्राचे तीन प्रकार आहेत. शील पाळणारा सम्यग्दृष्टी पुरुष उत्तम पात्र होय. शील न पाळणारा पण सम्यग्दृष्टी

मध्यमपात्र. शील पाळणारा पण मिथ्यादृष्टी जघन्य पात्र होय जो मिथ्यादृष्टी असून शीलही पाळीत नाहीं तें पात्रच नव्हे अपात्रीं दिलेलें दान दात्यास दु ख देणारें होतें मोक्षाला साधन असें जें दिगबररूप ते धारण करणारा, ज्ञानादिकाच्या सिद्धीकरिता देह सुरक्षित असावा ह्मणूनच आहाराची इच्छा करणारा, आहार घेऊन बल, आयुष्य, स्वाद व देहपोषण ह्याची इच्छा न करणारा, फक्त प्राणधरून रहाण्याकरिता एका ग्रासानेंच सतुष्ट असणारा असा जो मुनि तो आपण तरून दुसऱ्यासही तारणारा असल्यामुळें उत्तम पात्र होय. त्याला जर दान दिलें तर अन्न पवित्र होणार व दाता ही जन्ममरणातून मुक्त होणार! हे राजर्षी भरता, दान पुण्याचें महत्व प्रकट होण्याकरिता पचाश्चर्य वृष्टि माझ्या येथें झाली पहा! ह्मणून, उत्कृष्ट असें दान द्यावें. येथून आपल्या भगवताच्या तीर्थसप्रदायात पुष्कळ पात्रें देशभर पसरतील." श्रेयानराजाचें हें भाषण ऐकून, भरतराजाला फार सतोष झाला. व त्यानें त्याचा मोठा आदरसत्कार केला. इकडे श्रीमान् आदिजिनेंद्र सपूर्णपणें पापापासून विरत होऊन दुर्धर असें तपश्चरण करूं लागला तो अहिंसादि पचव्रतें व प्रत्येकाच्या पाच पाच भावना, तसेंच, धैर्य, क्षमा, ध्यानाविषयीं एकाग्रता व परिषह ह्या सर्व व्रताना सामान्यपणें लागू असणाऱ्या चार उत्तर भावना ही पाळू लागला त्यानें माया, मिथ्या व निदान हीं तीन शल्यें व क्रोध, मान, लोभ, प्रमोद वगैरे दुष्ट विकार याचा त्याग केला तो वृषभमुनी समयसिद्धीकरिता बारा प्रकारचें तप करित असे. मन, इंद्रियें व शरीर याना

निरोध करणें याचें नांव तप होय. बाह्य तपाच्या सहा अंगांत कायक्लेश नांवाचें तप सर्वांत श्रेष्ठ आहे. **'मनोरोधः परं ध्यानम्'** ह्म० मन स्वाधीन ठेवणें अथवा एकाग्र करणें हेंच उत्कृष्ट **ध्यान** होय. ध्यान हें कर्मक्षयाला साधन आहे. कर्मक्षय झाल्यानंतर अनंतसुखाची प्राप्ती होते. व ह्या सगळ्यांचें मूळ कायक्लेश होय. ह्मणून योग्यांनीं अवश्य कायक्लेश करावा असें जिनागमांत सांगितलें आहे. अभ्यंतर तपापैकीं स्वाध्याय तपाबद्दल आगमकारांनीं ह्मटलें आहे कीं, वृषभदेवाचा देखील स्वाध्याय त्यांच्या बुद्धीची शुद्धी करण्याला साधन झाला. यावरून स्वाध्याय तपाचें सर्वश्रेष्ठत्व आपोआपच सिद्ध होतें. आचार्य ह्मणतात:—

**सबाह्याभ्यन्तरे चास्मिंस्तपसि द्वादशात्मके ।**
**न भविष्यति नैवास्ति स्वाध्यायेन समं तपः ॥९८॥**

**अर्थ:—** बाह्य व अभ्यंतर भेदांनीं बाराप्रकारचें जें तप सांगितलें त्यांत **स्वाध्यायासारखें** तप मागें झालें नाहीं व पुढें व्हावयाचेंही नाहीं. सारांश, वृषभदेवानें आपल्या सदाचाराच्या उदाहरणानें जितका ह्मणून धर्म होता तितका सर्व युगाच्या आरंभीं प्रसिद्ध केला. त्यानें भुकतहान वगैरे परिषहांस जिंकून तीन गुप्ती, पांच समिती, बारा अनुप्रेक्षा व उत्तमक्षमादि दशधर्म यांसह सम्यक्चारित्राचें चिरकाल पालन केलें.

---

**१ टीप —'सम्यग्योगनिग्रहो गुप्तिः।'** ह्मणजे उत्तम प्रकारानें काय, वाक् व मन यांच्या क्रियारूपी योगाचा निग्रह करणें याला **गुप्ति** ह्मणतात. गुप्तीच्या योगानें आर्त, रौद्र वगैरे दुर्ध्यानें होत नाहींत. त्यामुळें संक्लेश होत नाहींत व नवीन कर्म येत नाहीं. ह्मणून मुनींनें गुप्ती अवश्य पाळल्या पाहिजेत.

**२ टीप** —इतर प्राण्याला पीडा होऊं नये ह्मणून विचारपूर्वक सावधानतेनें क्रिया करणें याला समिती ह्मणतात.

ऋषभदेव मौन धारण करून कधीं निर्जन वनांत, कधीं गुहेंत, कधीं स्मशानात तर कधीं पर्वताच्या शिखरावर समाधि करिता बसत असत. याप्रमाणें ध्यानांत तल्लीन होऊन प्रभू अनेक देश हिंडत हिंडत, एके दिवशीं पुरीमताल नगराजवळील शकट नांवाच्या उद्यानाला आले. तेथें रम्य अशा एका वटवृक्षाखालीं स्वच्छ व मोठ्या शिलापट्टावर पूर्वेस मुख करून पल्यंकासनानें बसून, उत्तम प्रकारें लेश्या ( मनाचे परिणाम ) शुद्ध ठेवून समाधानपणें त्यानीं पुनः द्विगुणित धैर्यानें ध्यान धरिलें. प्रथम त्यांनीं सिद्धपरमेष्ठींच्या आंठगुणांचें चिंतन केलें. नंतर तो योगींद्र चार प्रकारचें धर्म्यध्यान करूं लागला, याप्रमाणें आदिजिनाच्या गुणश्रेणीनें त्याचें सर्व कर्म गळून गेलें. जस जशी भगवंताची शुद्धी उत्तरोत्तर वाढत चालली तसतसा कर्मांच्या शक्तींतील रसाचा क्षय होत चालला. ह्मणजे यांच्या मनाचे परिणाम जसजसे शुद्ध होऊं लागले त्याप्रमाणानें कर्म गळून जाऊन त्याची निर्जरा झाली. नंतर शुक्लध्यानाच्या बळानें त्या योग्यानें मोहरूपी दैत्याचा पराभव केला. याप्रमाणें क्रमानें क्षीणकषायत्व नांवाच्या बाराव्या गुणस्थानास पोंचून तेथें सर्व पातकांचें क्षालन करून तो योगी स्नातकमुनी झाला ह्मणजे संपूर्ण ज्ञानवान् झाला. दुसऱ्या शुक्लध्यानाच्या

---

१ टीप.—सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, अनंतवीर्य, सूक्ष्मत्व, अवगाहित्व, अव्याबाधत्व, अगुरुत्व व अलघुत्व.

२ टीपः—प्रतिसमयीं असंख्यात गुणित क्रमानें कर्मांची जी निर्जरा तिला गुणश्रेणी ह्मणतात

बळानें त्यांनीं चार घातिकर्मांचा नाश केला. त्यामुळें प्रभूला फाल्गुन वद्य ११ ला उत्तराषाढा नक्षत्रावर केवलज्ञान प्राप्त झालें. त्यायोगें त्यांना एकदम त्रैलोक्यातील सपूर्ण पदार्थ हातांतील रेषेसारखें स्पष्ट दिसूं लागले. याप्रमाणें ज्यानें ध्यानरूपी अग्नीनें कर्मरूपी इंधन जाळिलें आहे, ज्याला समवसरण वगैरे बाह्य विभूती व केवलज्ञानरूपी वैभव हीं प्राप्त झालीं आहेत असा तो जिनेश्वर प्रकाशमान दिसूं लागला. **आदिजिनेंद्राला** केवलज्ञानलक्ष्मी प्राप्त झाल्यावर तत्काळ देवेंद्र भक्तिभरानें तेथें येऊन नम्र झाले. आकाशात 'जयजय' असा शब्द पसरला व देवदुंदुभींच्या शब्दांनीं सगळ्या दिशा व आकाश भरून गेले. त्यासमयीं कल्पवृक्षपुष्पांची वृष्टि झाली. व आकाश निरभ्र असूनही मेघवृष्टि आल्यामुळें जगाचा अंगणप्रदेश स्वच्छ झाला. याप्रमाणें त्रैलोक्यात हर्ष उत्पन्न करणारा तो तीर्थंकरनामकर्माचा प्रभाव एकाएकीं लोकहिताकरितां प्रगट झाला.



---

**टीप १:-** जें कर्म जीवाच्या ज्ञानादिक अनुजीवी गुणाचा घात करितें त्यास **घातियाकर्म** म्हणतात. व जे कर्म त्या गुणाचा घात करीत नाहीं त्यास **अघातिया** कर्म म्हणतात. ज्ञानावरण, दर्शनावरण, मोहनीय व अन्तराय हीं चार घातिया कर्में आहेत या चार कर्मांचा नाश केला म्हणजे केवलज्ञान प्राप्त होतें, तेव्हा त्या जीवास **अरहंत** म्हणावें व वेदनीय, नाम, गोत्र व आयु या चार अघातियाकर्मांचा नाश केला म्हणजे मोक्षप्राप्ति होते, तेव्हा त्यास **सिद्ध** म्हणावें.

# पर्व २१ वें

## ध्यानवर्णन.

नंतर श्रेणिकराजानें **गौतममुनीला** ध्यानाचा विस्तार समजून देण्याबद्दल विनंति केली. तेव्हां **गौतममुनी** ह्मणाले:— "हे राजा, एकाच वस्तूच्या ठिकाणीं एकाग्रपणानें अंतःकरणाचें नियमन करणें याचें नांव '**ध्यान**' आहे. स्थिर अशा प्रकारचा जो अंतःकरणाचा परिणाम त्यालाच ध्यान ह्मणतात. व चंचल अशा प्रकारचा जो परिणाम त्याला **अनुप्रेक्षा** ( भावना ) असें ह्मणतात. ध्यानास योग, समाधि, स्वांतनिग्रह किंवा अंतःसंलीनता अशीं दुसरीं नांवें आहेत. आत्म्याच्या ठिकाणीं 'मी मनुष्य' अशा प्रकारचा झालेला संकल्प व देहादिकांचें ठिकाणीं हे पदार्थ आत्मीय ह्म० माझे आहेत अशा प्रकारचा संकल्प या दोन्ही संकल्पांस सोडून उदासीनपणानें असलेलें यथास्वरूप असें जें या जगाचें सर्व तत्व तें या ध्यानाचें आलंबन (विषय) आहे. संकल्प ह्म० विषयांच्या ठिकाणीं मनाची सकाम वृत्ती असणें; तिलाच दुष्टचिंतन अथवा **अपध्यान** असें ह्मणतात. ध्यानाचे आर्त, रौद्र, धर्म व शुक्ल असे चार प्रकार आहेत. यां-

---

टीप १:– ऐकाग्र्येण निरोधो यश्चित्तस्यैकत्र वस्तुनि तत्ध्यानम् ।

टीप २:– स्थिरमध्यवसानं यत्तत्ध्यानम् ।

पैकीं आर्त व रौद्र हीं दुर्ध्यानें असल्यामुळें जन्ममरणरूप संसाराला वाढविणारीं अशीं आहेत. ह्मणून तीं त्याज्य समजावींत; व धर्म आणि शुक्ल हीं योग्यालाही आंगिकार करण्याला योग्य आहेत.

## आर्तध्यान.

ज्यायोगें परिणाम दुःखी होतात त्याला **आर्तध्यान** ह्मणतात. परिणाम दुःखी होण्याचीं चार कारणें आहेत. (१) **इष्टवियोग**-आपल्या प्रिय वस्तूचा वियोग झाला असतां, त्याच्या संयोगाची इच्छा करणें हें इष्टानवाप्तीपासून (इष्टवस्तू न मिळाल्यापासून) उत्पन्न झालेलें प्रथम आर्तध्यान होय. (२) **अनिष्टसंयोग**—नावडत्या वस्तूचा संयोग झाल्यास तो दूर करण्याचें चिंतन करणें हें अनिष्टाप्तीपासून उत्पन्न झालेलें दुसरें आर्तध्यान होय. (३) **निदान**—दुसऱ्याची विभूति पाहून तशी आपल्याला नसल्यामुळें दुःख करणाऱ्या जीवाचें 'मला तशीच विभूति प्राप्त होवो!' किंवा 'अमुक प्रकारचे सुखोपभोग मला मिळोत!' असें जें चिंतन त्यास तृतीय आर्तध्यान ह्मणतात. (४) **आशान**—ह्मणजे दुःखातून मुक्त होण्याची काळजी. अर्थात् दुःखाच्या वेदनांनीं पीडित झालेला पुरुष त्या वेदनाच्या नाशाकरितां जें चिंतन करितो तें आशानापासून उत्पन्न झालेलें चवथें आर्तध्यान समजावें. आर्तध्यानी जीव प्रियवस्तूच्या संयोगाविषयीं व अप्रिय वस्तूच्या वियोगाविषयीं वारंवार चिंतन करित असतो. त्यायोगें इष्टवस्तूविषयीं प्रेम व अनिष्ट वस्तूविषयीं द्वेष हे दोन विकार उत्पन्न होतात, व त्यामुळें फार बळकट असा कर्मबंध होतो. वस्तुतः, कोणतीही वस्तु स्वभावतः इष्ट किंवा अनिष्ट नसते.

तिच्याविषयीं प्रीति किंवा द्वेष हे मनानें कल्पिलेले असतात. आणि ती आपली कल्पनाच आपल्याला सुखदु:ख उत्पन्न करणारी होते. ह्मणून चित्तशुद्धीकरितां कोणत्याही पदार्थां· विषयीं त्याचें जें स्वरूप असेल तशाच प्रकारची कल्पना करणें योग्य आहे. अशा कल्पनानीं ज्ञानशुद्धि होते; व ज्ञानशुद्धि झाली ह्मणजे ध्यानशुद्धि होते. तसेंच, 'अमुक एक प्रकारचा भोग मला असावा' किंवा 'मला होत असलेली वेदना कशी नाहींशी होईल' अशी दोन प्रकारची चिंता आर्तध्यानी जीवास होत असते. आर्तध्यान पहिल्या सहा गुणस्थानांपर्यंतच्या जीवांस होत असतें. हें ध्यान अत्यंत दुष्ट असून लेश्यात्रया [ कृष्ण, नील व कापोत ] पासून वाढलेलें आणि अंतर्मुहूर्त कालपर्यंत राहणारें आहे. यांतील विषय ही अत्यंत दुष्ट असाच आहे. या ध्यानाचें फल तिर्यंगगति ह्मणजे पशुपक्ष्यादिकांचें जन्म हें आहे. ह्मणून हें ध्यान सर्वांना त्याज्य आहे. मूर्च्छा [ परिग्रहासक्ति ] दुष्टस्वभाव, लुब्धपणा, कृतघ्नपणा, आळस, अधिकाभिलाष, भय, अंत करणाचें चांचल्य व पश्चाताप हीं आर्तध्यानाचीं चिन्हें आहेत. व त्याचीं बाह्य चिन्हें शरीराची ग्लानी ह्म० अशक्तता, गाल हातावर ठेवून सचिंत बसणें, दुःखामुळें नेत्रांत वरचेवर पाणी येणें हीं व यासारखींच आणखी दुसरीं पुष्कळ आहेत. आतां, गणधर रौद्रध्यानाचें निरूपण करितात.

## रौद्रध्यान.

पापामध्यें आनंद मानण्याचें परिणाम असणें, क्रूरपणा करणें ह्याला रौद्रध्यान ह्मणतात. सर्व प्राण्यांविषयीं निर्दयी

अशा पुरुषाच्या ठिकाणीं होणारें जें ध्यान त्यास रौद्रध्यान ह्मणावें. हिंसानंद, मृषानंद, स्तेयानंद, व विषयसंरक्षण [ परिग्रहानंद ] असे रौद्रध्यानाचे चार प्रकार आहेत. रौद्रध्यान पहिल्या पांच गुणस्थानांपर्यंतच्या जीवांस होत असतें. एखाद्याचा स्वतः प्राण घेणें किंवा तो घ्यावयास लावणें, अथवा दुसरा कोणी जीव घेत असतां तें पाहून आनंद मानणें, एखाद्या प्राण्यास बांधून ठेवणें, किंवा त्याच्या अवयवाचा छेद करणें अशा प्रकारांना हिंसानंद ह्मणतात. क्रूरपणा, स्वभावानेंच हिंसकपणा किंवा हिंसेच्या गोष्टी बोलणें हीं हिंसानंदाचीं चिन्हें आहेत. खोट्या भाषणांनीं लोकांस फसाविण्याचा विचार करणें याला मृषानंद ह्मणतात. परद्रव्यहरणाविषयीं जें चिंतन त्याला स्तेयानंद ह्मणतात. व द्रव्यप्राप्तीविषयीं नित्य चिंतन करणें त्याला संरक्षणानंद ह्मणतात. किंवा धनधान्यादि परिग्रह वाढविणें अथवा वाढला असें पाहून आनंद मानणें त्याला परिग्रहानंद ह्मणतात. रौद्रध्यानाचें फल दुस्तर नरकदुःख हें आहे. हीं आर्त व रौद्र ध्यानें अनादि वासनेपासून उत्पन्न होतात. हीं संसाराला कारणीभूत आहेत ह्मणून ह्यांचा त्याग करण्याचा सर्वांनीं यत्न करावा. आतां धर्मध्यानाकडे वळूं."

## धर्मध्यान.

गौतमयोगींद्र ह्मणतात, "हे श्रेणिका, धर्मध्यानाचें वर्णन करण्यापूर्वी प्रथम ध्यान कसें व कोठें करावें? योग्यानें ध्यानसमयीं कोणतें आसन घालावें? इत्यादिकांची प्रथम माहिती सांगतो. योग्यानें शून्यगृह, जिनमंदिर, स्मशान, नदीचें वाळवंट,

पर्वताचें शिखर, गुहा याठिकाणीं किंवा कोणत्याही एकांत, शुद्ध, निराकुल, जंतुरहित व रमणीय प्रदेशामध्यें ध्यानास बसावें. तेथें पुरुष, स्त्रिया, पशु, षंढ इत्यादिकांचा मुळींच संसर्ग नसावा. तथापि, ज्याच्या मनाची नैसर्गिक बाह्यविषयप्रवीणता दूर झाली आहे म्हणजे ज्याचें अंतःकरण स्थिर आहे आहे अशा मनुष्याला कोणतेंही ठिकाण ध्यानसिद्धीला चालतें. ध्यान करणाऱ्या यतीला ज्या स्थितीमध्यें पुष्कळ कालपर्यंत सुखानें विचार करितां येईल तें आसन उत्तम होय. इतकेंच नव्हे, तर देहाची बनावट ज्या तऱ्हेची असेल म० कुबडा, वांकडा वगैरे ज्या प्रकारचा देह असेल तो देहाचा प्रकार ध्यानाला व्यग्र करणारा होत नाहीं. योग्यानें देहाच्या त्याच अवस्थेंत सर्वसंग परित्याग करून साफ उभें राहून, बसून अथवा निजून कशाही तऱ्हेनें ध्यान करावें. आसनें पुष्कळ प्रकारचीं आहेत. तथापि, ज्या आसनावर ध्यान करणाऱ्याला त्रास न होतां चित्तैकाग्रता होईल त्या आसनाचाच त्यानें स्वीकार करावा. जिनागमांत मुख्यतः दोन आसनांचाच ज्यास्त विचार केला आहे. तीं आसनें म्हणजे पर्यंकासन (पद्मासन) व कायोत्सर्ग (साफ उभें रहाणें). त्यांतही पर्यंकासन हेंच सर्वांस सुलभ व सुसाध्य असल्यामुळें त्यालाच आगमकारांनीं सुखासन असें मानिलें आहे. वीरासन, वज्रासन यांसारखीं विषम (कठिण) आसनें घालून बसलें म्हणजे शरीर जखडलें जातें; आणि त्यायोगें मनाला पीडा होऊन तें खिन्न होतें. तरीसुद्धां

---

टीप १:—योगसूत्रकार पतञ्जलि महामुनिः—स्थिरसुखमासनम्।

सशक्त मनुष्यानें हीं किंवा वराह कुक्कटादि आसनें केलीं असतांही दोष नाहीं. अध्यात्मज्ञानी योग्यानें पद्मासन (आपण नेहमी जशा तऱ्हेची मांडी घालतों तशा तऱ्हेनें ताठ बसणें.) घालून, छाती, डोकें व मान एका सरळ रेषेंत आणून आपल्या जंघेवर डावा हात उताणा ठेवून त्याजवर उजवा हात उताणा ठेवावा. नंतर त्यानें हृदय, मस्तक, ललाट, नेत्र, नाभि किंवा तिच्यावरील कोणताही भाग अथवा नासिकाग्र वगैरे भागांत आपल्या अभ्यासाप्रमाणें अंतःकरण स्थिर ठेवून अर्थात् चित्ताची एकाग्रता करून शास्त्रानुसार द्रव्यादिकांचें यथार्थ-स्वरूप चिंतन करावें. योग करण्याच्या वेळीं मंद श्वासोच्छ्वास आणि नेत्रांचें निमेष उन्मेष (उघडणें, झांकणें) केलें तरी चालेल, अर्थात् यांचा निषेध नाहीं. हा श्रेणिका, योग्याला अविनाशी अशा मोक्षपदाची प्राप्ति ध्यानबलानेंच होते. हे मगधदेशाधिपा, वर सांगितलेले देशकालादिकांचे नियम सर्वसामान्य-लोकांकरितां आहेत. गंभीर व समदर्शी योग्याला 'अमुक ठिकाणीं अमुक कालीं ध्यान करावें,' किंवा 'अमुक ठिकाणीं, अमुक कालीं करूं नये' असे नियम लागू नाहींत. कारण, ध्यानरूपी द्रव्य सार्वकालिक (सर्वदा उपयोग करण्याचें) आहे. योगी ज्या कालीं, ज्या प्रदेशांत व ज्या अवस्थेंत ध्यान करितो तो काल, तो प्रदेश व ती अवस्था ध्यानाला योग्यच आहे. आतां ध्यात्या (ध्यान करणारा) चें लक्षण सांगतात.

दुर्ध्यान व दुष्ट लेश्या या दोन्हींचा त्याग करणारा, रत्नत्रय-धारक, पंचेंद्रियांना वशीभूत करण्याची इच्छा करणारा, समता

वीचार नांवाचें दुसरें शुक्लध्यान करितो. या ध्यानाचें फळ हें आहे कीं, तीन घातियाकर्मांचा ( मोहनीयकर्माचा क्षय पूर्वीच झालेला असतो ) क्षय होऊन केवलज्ञान प्राप्त होतें. आतां परम शुक्लध्यानाचें विवेचन करूं. ज्ञानी व कर्मनाश झाल्यामुळें कैवल्यपदाला प्राप्त झालेला असा जीव दोन्हीं प्रकारच्या परम शुक्लध्यानाचा अधिकारी समजावा. मन, वचन व शरीर यांस सूक्ष्म करून न बिघडूं देता एकाग्रतेनें जें सूक्ष्म क्रियेचें ध्यान तें सूक्ष्मक्रियाप्रतिपाति नावाचें शुक्लध्यान होय. पुढें (सूक्ष्मक्रियाप्रतिपाति नांवाचें शुक्लध्यान केल्यानंतर) मन, वचन व काया या तीन्हीं योगांचा निरोध करून, ज्याचे सर्व आस्रव नाहींसे झाले आहेत असो तो योगी जीव समुच्छिन्नक्रियानिवर्ती (ज्यांत सर्व प्रकारच्या मन, वाणी व देह यांच्या क्रियाचा नाश झाला आहे असें व स्वतः नाशरहित असें ) नांवाचें ध्यान करितो. अत्यंत निर्मल असें हें ध्यान अंतर्मुहूर्तकालपर्यंत करणारा असा तो योगी जीव सर्व कर्मांशाचा नाश करून जिनस्वरूप होऊन मुक्त होतो. उर्ध्वगमन हा त्या शुद्धात्म्याचा स्वभावच असल्यामुळें, एका समयांतच लोकांच्या अंतप्रदेशाला पोंचून, सिद्ध होऊन त्रैलोक्याच्या अग्रभागावर त्याच्या शिरोरत्नाप्रमाणें शोभतो. तेथें हा परमात्मा कर्ममलापासून रहित असल्यामुळें अत्यंत शुद्ध असा असतो. आणि येथल्याप्रमाणें त्याला शरीर नसल्यामुळें अतींद्रिय असें अनंतसुख प्राप्त होतें. नंतर दृश्य देहानें रहित झालेला असा हा योगी जीव चरमांगाहून ह्म० ज्या देहापासून मुक्त होतो त्या

देहापेक्षां किंचित् न्यूनाकृतीचा होऊन मुशींतल्या आकाशाप्रमाणें साकार दिसतो. तो परमात्मा शरीरसंबंधीं व मनासंबंधीं सर्व प्रकारच्या दुःखबंधांनीं व उपाधींनीं शून्य होऊन क्रियारहित, शुद्ध आणि आठ गुणांनीं युक्त असा होतो. तेथें आत्मस्वरूपाची प्राप्ती झाल्यामुळें, तो सिद्ध जीव अविनाशी, अतींद्रिय व स्वस्वरूपापासून प्राप्त झालेल्या त्या परम सुखाचा अनुभव घेतो. याप्रमाणें शुक्लध्यानाचें मोक्षसुख हें फल आहे." हें ध्यानवर्णन ऐकून **श्रेणिक** राजा अत्यंत संतुष्ट झाला. नंतर गौतम महामुनींनीं योगासंबंधानें आणखी जास्त माहिती सांगितली, ती अशीः—"काय, वचन आणि मन ह्या तिन्हींची जी क्रिया तो **योग** होय. योगाचे शुभ व अशुभ असे दोन भेद आहेत. उत्तम प्रकारच्या परिणामांत चित्त निश्चल ठेवणें, किंवा पंचपरमेष्ठींचें स्मरण करणें याला **समाधि** म्हणतात. योगाचा म्ह० काया, वाचा व मन ह्यांच्या क्रियांचा निरोध करणें आणि शुभ भावना ठेवणें याला **प्राणायाम** म्हणतात. शास्त्रांत सांगितलेलीं बीजाक्षरें लक्षांत ठेवणें याला **धारणा** म्हणतात. अनित्यत्व वगैरे तत्वांचें वारंवार चिंतन करणें याला **आध्यान** म्हणतात. अशुद्ध मनाला कळावयाचें नाहीं व वाणीनें बोलून दाखवितां येत नाहीं असें जें शुद्ध आत्मतत्व तें ध्येय होय. जीव,अजीव वगैरे जीं तत्वें आहेत त्यांच्या यथार्थ

---

टीप १:-यत्सम्यक्परिणामेषु चित्तस्याधानमञ्जसा ।
स समाधिरिति ज्ञेयः स्मृतिर्वा परमेष्ठिनाम् ॥२६॥

वीचार नांवाचें दुसरें शुक्लध्यान करितो. या ध्यानाचें फल हें आहे कीं, तीन घातियाकर्मांचा ( मोहनीयकर्माचा क्षय पूर्वींच झालेला असतो ) क्षय होऊन केवलज्ञान प्राप्त होतें. आतां परम शुक्लध्यानाचें विवेचन करूं. ज्ञानी व कर्मनाश झाल्यामुळें कैवल्यपदाला प्राप्त झालेला असा जीव दोन्हीं प्रकारच्या परम शुक्लध्यानाचा अधिकारी समजावा. मन, वचन व शरीर यांस सूक्ष्म करून न विघडूं देतां एकाग्रतेनें जें सूक्ष्म क्रियेचें ध्यान तें सूक्ष्मक्रियाप्रतिपाति नांवाचें शुक्लध्यान होय. पुढें (सूक्ष्मक्रियाप्रतिपाति नांवाचें शुक्लध्यान केल्यानंतर) मन, वचन व काया या तीन्हीं योगांचा निरोध करून, ज्याचे सर्व आस्रव नाहींसे झाले आहेत असो तो योगी जीव समुच्छिन्नक्रियानिवर्ती (ज्यांत सर्व प्रकारच्या मन, वाणी व देह यांच्या क्रियांचा नाश झाला आहे असें व स्वतः नाशरहित असें ) नांवाचें ध्यान करितो. अत्यंत निर्मल असें हें ध्यान अंतर्मुहूर्तकालपर्यंत करणारा असा तो योगी जीव सर्व कर्मांशांचा नाश करून जिनस्वरूप होऊन मुक्त होतो. उर्ध्वगमन हा त्या शुद्धात्म्याचा स्वभावच असल्यामुळें, एका समयांतच लोकांच्या अंतप्रदेशाला पोंचून, सिद्ध होऊन त्र्यैलोक्याच्या अग्रभागावर त्यांच्या शिरोरत्नाप्रमाणें शोभतो. तेथें हा परमात्मा कर्ममलापासून रहित असल्यामुळें अत्यंत शुद्ध असा असतो. आणि येथल्याप्रमाणें त्याला शरीर नसल्यामुळें अतींद्रिय असें अनंतसुख प्राप्त होतें. नंतर दृश्य देहानें रहित झालेला असा हा योगी जीव चरमांगाहून ह्म० ज्या देहापासून मुक्त होतो त्या

देहापेक्षां किंचित् न्यूनाकृतीचा, होऊन मुशींतल्या आकाशाप्रमाणें साकार दिसतो. तो परमात्मा शरीरसंबंधीं व मनासंबंधीं सर्व प्रकारच्या दुःखबंधांनीं व उपाधींनीं शून्य होऊन क्रियारहित, शुद्ध आणि आठ गुणांनीं युक्त असा होतो. तेथें आत्मस्वरूपाची प्राप्ती झाल्यामुळें, तो सिद्ध जीव अविनाशी, अतींद्रिय व स्वस्वरूपापासून प्राप्त झालेल्या त्या परम सुखाचा अनुभव घेतो. याप्रमाणें शुक्लध्यानाचें मोक्षसुख हें फल आहे." हें ध्यानवर्णन ऐकून श्रेणिक राजा अत्यंत संतुष्ट झाला. नंतर गौतम महामुनींनीं योगासंबंधानें आणखी जास्त माहिती सांगितली, ती अशीः—"काय, वचन आणि मन ह्या तिन्हींची जी क्रिया तो **योग** होय. योगाचे शुभ व अशुभ असे दोन भेद आहेत. उत्तम प्रकारच्या परिणामांत चित्त निश्चल ठेवणें, किंवा पंचपरमेष्ठींचें स्मरण करणें याला **समाधि** ह्मणतात. योगाचा ह्म० काया, वाचा व मन ह्यांच्या क्रियांचा निरोध करणें आणि शुभ भावना ठेवणें याला **प्राणायाम** ह्मणतात. शास्त्रांत सांगितलेलीं बीजाक्षरें लक्षांत ठेवणें याला **धारणा** ह्मणतात. अनित्यत्व वगैरे तत्वांचें वारंवार चिंतन करणें याला **आध्यान** ह्मणतात. अशुद्ध मनाला कळावयाचें नाहीं व वाणीनें बोलून दाखवितां येत नाहीं असें जें शुद्ध आत्मतत्व तें ध्येय होय. जीव, अजीव वगैरे जीं तत्वें आहेत, त्यांच्या यथार्थ

---

टीप १:—यत्सम्यक्परिणामेषु चित्तस्याधानमञ्जसा ।
स समाधिरिति ज्ञेयः स्मृतिर्वा परमेष्ठिनाम् ॥२६॥

स्वरूपाचें पुनः पुनः स्मरण करणें, अथवा सिद्धपरमेष्ठी व अर्हत् परमेष्ठी यांच्या गुणांचें नित्य स्मरण करणें याचें नांव स्मृति. अंत करणाच्या वृत्तींचा संकोच केला असतां जें सुख होतें त्याचें नांव **प्रत्याहार.** आतां बीजाक्षरांचें संक्षेपतः वर्णन करितात. 'अर्हं' नांवाच्या बीजाचें ध्यान कारणारा योगी क्लेश पावत नाहीं. 'अर्हद्भ्यो नमोऽस्तु' ह्म० अर्हंतास नमस्कार यां मंत्राचें **ध्यान** करणारा मुमुक्षु अनंतगुणांनीं युक्त अशा अर्हत् पदास पोंचतो. 'नमः सिद्धेभ्यः' ह्म० सिद्धांस नमस्कार हा बीज मंत्र जाणणारा भव्यात्मा इच्छितार्थास प्राप्त होतो. 'नमोऽर्हत् परमेष्ठिने' या बीजमंत्राचें स्मरण करणाऱ्या भव्य जीवाला पुनः दुःख होत नाहीं. 'अरहंत–सिद्ध–आइरिय–उवज्झया–साहू' या षोडशाक्षरी किंवा 'णमो अरहंताणं। णमो सिद्धाणं। णमो आयरियाणं। णमो उवज्झायाणम्। णमो लोये सव्वसाहूणं। या पस्तीस अक्षरी महामंत्राचें ध्यान करणारा तत्वज्ञानी निश्चयानें मुक्त होतो. पंच ब्रह्ममय ह्म० पंचपरमेष्ठीस्वरूप अशा ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हौं ऱ्हः या पांच मंत्रांनीं अशरीर जो आत्मा त्याला सशरीर मानून उत्कृष्ट तत्वाचें ध्यान करणारा योगी ब्रह्मतत्व जाणणारा होतो. नंतर तो योगीजीव अणिमा [ सूक्ष्मत्व ] इत्यादि गुणांनीं युक्त व उत्कृष्ट सुखें ज्यांत आहेत असें ऐश्वर्य इहलोकीं भोगून, कर्ममलापासून सुटून मुक्त होतो. वर सांगितलेले हे महामंत्र न जाणतां फक्त अर्हंत वगैरे नांवेंच जाणणारा मिथ्याभिमानी जीव कर्मबंधनांनीं बांधला जातो. श्रेणिका, जीवतत्व नित्य व अनित्य

या उभयस्वरूपाचें आहे असें ह्मणणाऱ्या स्याद्वाद्यांच्या मतानेंच हा ध्यान व ध्येय यांचा निर्णय सिद्ध होतो; इतर मतांनीं होत नाहीं. आतां, एकच वस्तु नित्यत्व व अनित्यत्व या परस्पर विरूद्ध दोन धर्मांचा आश्रय कशी करील अशी शंका घेणें योग्य नाहीं. कारण, त्या त्या अपेक्षांच्या भेदानें परस्पर विरूद्ध धर्महीं एके ठिकाणीं राहूं शकतात. आत्मा द्रव्य आहे या अपेक्षेनें नित्य आहे व पर्यायांच्या अपेक्षेनें अनित्य आहे; ह्मणून, अनित्यता ही आत्म्याचें ठिकाणीं पर्यायाची उत्पत्ती व विनाश या दोहोंच्या अपेक्षेनें असते; व द्रव्याच्या अपेक्षेनें नित्यता असते. ज्याप्रमाणें एकच मनुष्य त्याच्या पित्याच्या अपेक्षेनें पुत्र होतो व पुत्राच्या अपेक्षेनें पिता होतो त्याप्रमाणें आत्मवस्तूचें ठिकाणीं देखील नित्यानित्यत्वस्वरूप विरुद्ध धर्महीं असणें शक्य आहे. जिनानें उपदेशिलेल्या शास्त्राभ्यासानें ज्यांची ज्ञानसंपत्ति वाढली आहे असे जे स्याद्वादी त्यांनींच ध्यान करणें युक्त आहे. अन्य जे मिथ्यादृष्टी त्यांच्याकडून मोक्षसाधन असें ध्यान होणें शक्य नाहीं. अस्तु. परमेश्वरानें मोहादिक शत्रूंना जिंकिलें ह्मणून त्याला जिन हें नांव आहे. तो यथार्थ उपदेश करणारा आहे ह्मणून त्याला आप्त असें ह्मणतात. तो व्यापक आहे ह्मणून त्याला विष्णु ह्मणतात. सुख देणारा आहे ह्मणून शंकर. सुखमय आहे ह्मणून शिव; करण्यास योग्य असें सर्व त्यानें केलें ह्मणून सिद्ध. जगांतील सर्व पदार्थ जाणतो ह्मणून त्याला बुद्ध अशी संज्ञा आहे. तो नाशरहित व उत्कृष्ट ज्ञानस्वरूप आहे ह्मणून त्याला परंज्योती ह्मण-

तात. याप्रमाणें जगत्पतीचीं हीं सार्थ नांवें विद्वानांच्या हृदयांत 'हा जिन आप्त ह्मणजे यथार्थ वक्ता आहे, अशी बुद्धि उत्पन्न करण्यास समर्थ आहेत. साराश, वीतरागी,ज्योतिस्वरूप, सर्वज्ञ भगवान् जो जिन तोच खरा आप्त होय. व त्यानेंच उपदेशिलेलें ध्यान मुमुक्षूंनी आश्रय करण्यास योग्य आहे." याप्रमाणें गौतमगणधरांनीं त्या मुनीसभेंत ध्यानाचें स्वरूप विशदपणें सागितलें. आतां पुढील पर्वांत गौतमगणधर ज्याला केवलज्ञान प्राप्त झालें आहे अशा त्या आदिभगवंताच्या आर्हंत्यलक्ष्मीचें ( अरहंत पदाच्या ऐश्वर्याचें ) वर्णन करितात.

## पर्व २२ वें.

### भगवत्समवसरणवर्णन.

यानंतर ह्मणजे घातियाकर्मांचा नाश होऊन श्रीऋषभदेवास केवलज्ञान झाल्यावर त्रैलोक्यात मोठा क्षोभ (केवलीचें दिव्य वचन केव्हां ऐकूं अशी गडबड) झाला. देवेंद्रांचीं आसनें एकदम कंपायमान झालीं. त्यायोगें, अवधिज्ञानी इंद्राला प्रभूला केवलज्ञान प्राप्त झाल्याचें कळून आलें. तत्काल इंद्रानें तेथूनच केवलीजिनास प्रणाम केला. प्रयाणकालचीं वाद्यें वाजत असतांना, इंद्र इंद्राणी व सर्व देव विभूच्या कैवल्यपूजेस निघाले. देवशिल्पकारांनीं बारा योजन विस्ताराचें, इंद्रनील रत्नांनीं रचिलेलें व बरोबर वर्तुलाकृतीचें असें जिनाचें सभामंडल निर्माण केलें होतें. समवसरणांत जाण्याला चार बाजूस चार रस्ते असतात. •समवस-

रणांत प्रवेश करावयाच्या मध्यमार्गात सुवर्णनिर्मित, फार उंच व ज्यांच्या अग्रभागीं तीन छत्रें आहेत असे चारी दिशेस चार मानस्तंभ चकाकत होते. त्याना लांबून पाहिलें तरी मिथ्यादृष्टींचा गर्व तत्काल नाहींसा होत असे. त्याच्या चारी दिशेस सुवर्ण स्तंभांवर लोळणारीं व ज्यांच्या मत्स्याकार मुखांतून रत्नमाळा लोंबत आहेत अशी तोरणें फार सुंदर दिसत होतीं. रत्नस्तंभावर उभारिलेला, शोभिवंत असा श्रीमंडप होता. तो मंडप एक योजन विस्ताराचा असून त्यांत तिन्ही जगांतील मनुष्यें, देव व दैत्य हे सर्व सुखानें व निर्बाधपणें ( अडचण न होता ) बसत असत हें प्रभूचें माहात्म्य होय! सारांश, चार दिशेस चार मानस्तंभ, त्यांच्या भोंवतीं चार चार सरोवरें, त्यांच्या पलीकडे अत्यंत निर्मल जलाचे खंदक, त्यांच्या पलीकडे फुलांची बाग, तिच्या पलीकडे पहिला प्राकार ( तट ), त्या तटातून जाण्याच्या महाद्वारांत दोन दोन नाट्यशाला, त्यांच्या पलीकडे बाग, त्याच्या पलीकडे रत्नखचित सुवर्णाची पीठिका (कट्टा), त्याच्या पलीकडे ध्वजांची ओळ, तिच्या पलीकडे दुसरा प्राकार, तिच्या पलीकडे कल्पवृक्षांचें वन, त्याच्यापलीकडे स्तूप ( रत्नांचे खांब ९ ), त्याच्या पलीकडे हर्म्यावली

---

**टीपः**—१ सिद्धार्थ, चैत्यवृक्ष, प्राकार, वन, वेदिका, स्तूप, तोरणें, मानस्तंभ व ध्वजस्तंभ ह्यांची उंची तीर्थंकराच्या उंचापेक्षा बारापट अधिक उंच असते. व त्यांची रुंदी लांबीला शोभेल अशीच असते. वृषभतीर्थंकराची उंची पांचशें धनुष्यें होती, त्याप्रमाणानें बारापट म्हणजे सहा हजार धनुष्ये वरील स्तंभादिकांची उंची जाणावी.

२ मानाचें स्तंभन करितात किंवा ते महामानाचे ( मोठे ) असतात अथवा त्यांना त्रैलोक्याकडून मान मिळतो म्हणून त्याना **मानस्तंभ** म्हणतात.

तात. याप्रमाणें जगत्पतीचीं हीं सार्थ नांवें विद्वानांच्या हृदयांत 'हा जिन आप्त ह्मणजे यथार्थ वक्ता आहे, अशी बुद्धि उत्पन्न करण्यास समर्थ आहेत. सारांश, वीतरागी, ज्योतिस्वरूप, सर्वज्ञ भगवान् जो जिन तोच खरा आप्त होय. व त्यानेंच उपदेशिलेलें ध्यान मुमुक्षूंनी आश्रय करण्यास योग्य आहे." याप्रमाणें गौतमगणधरांनीं त्या मुनीसभेंत ध्यानाचें स्वरूप विशदपणें सांगितलें. आता पुढील पर्वांत गौतमगणधर ज्याला केवलज्ञान प्राप्त झालें आहे अशा त्या आदिभगवंताच्या आर्हंत्यलक्ष्मीचें ( अरहंत पदाच्या ऐश्वर्याचें ) वर्णन करितात.

## पर्व २२ वें.

### भगवत्समवसरणवर्णन.

यानंतर ह्मणजे घातियाकर्मांचा नाश होऊन श्रीऋषभदेवास केवलज्ञान झाल्यावर त्रैलोक्यांत मोठा क्षोभ (केवलीचें दिव्य वचन केव्हां ऐकूं अशी गडबड) झाला. देवेंद्रांचीं आसनें एकदम कंपायमान झालीं. त्यायोगें, अवधिज्ञानी इंद्राला प्रभूला केवलज्ञान प्राप्त झाल्याचें कळून आलें. तत्काल इंद्रानें तेथूनच केवलीजिनास प्रणाम केला. प्रयाणकालचीं वाद्यें वाजत असतांना, इंद्र इंद्राणी व सर्व देव विभूच्या कैवल्यपूजेस निघाले. देवशिल्पकारांनीं बारा योजन विस्ताराचें, इंद्रनील रत्नांनीं रचिलेलें व वरोवर वर्तुळाकृतीचें असें जिनाचें सभामंडल निर्माण केलें होतें. समवसरणांत जाण्याला चार बाजूस चार रस्ते असतात. •समवस-

रणांत प्रवेश करावयाच्या मध्यमार्गांत सुवर्णनिर्मित, फार उंचें व ज्यांच्या अग्रभागीं तीन छत्रें आहेत असे चारी दिशेस चार मानस्तंभ चकाकत होते. त्याना लावून पाहिलें तरी मिथ्यादृष्टींचा गर्व तत्काल नाहींसा होत असे. त्याच्या चारी दिशेस सुवर्ण स्तंभांवर लोळणारीं व ज्याच्या मत्स्याकार मुखातून रत्नमाळा लोंबत आहेत अशी तोरणें फाच सुंदर दिसत होतीं. रत्नस्तभावर उभारिलेला, शोभिवत असा श्रीमंडप होता. तो मडप एक योजन विस्ताराचा असून त्यात तिन्ही जगातील मनुष्यें, देव व दैत्य हे सर्व सुखानें व निर्बाधपणें (अडचण न होता) बसत असत हें प्रभूचें माहात्म्य होय! साराश, चार दिशेस चार मानस्तभ, त्याच्या भोंवतीं चार चार सरोवरें, त्याच्या पलीकडे अत्यत निर्मल जलाचे खदक, त्यांच्या पलीकडे फुलाची बाग, तिच्या पलीकडे पहिला प्राकार (तट), त्या तटातून जाण्याच्या महाद्वारात दोन दोन नाट्यशाला, त्यांच्या पलीकडे बाग, त्याच्या पलीकडे रत्नखचित सुवर्णाची पीठिका (कट्टा), त्याच्या पलीकडे ध्वजाची ओळ, तिच्या पलीकडे दुसरा प्राकार, तिच्या पलीकडे कल्पवृक्षाचें वन, त्याच्यापलीकडे स्तूप (रत्नाचे खाब ९), त्याच्या पलीकडे हर्म्यावली

---

**टीप:**—१ सिद्धार्थ, चैत्यवृक्ष, प्राकार, वन, वेदिका, स्तूप, तोरण, मानस्तभ व ध्वजस्तभ ह्याची उंची तीर्थकराच्या उचापेक्षा बारापट अधिक उच असते. व त्यांची रुंदी लांबीला शोभेल अशीच असते वृषभतीर्थकराची उंची पाचशें धनुष्यें होती, त्याप्रमाणानें बारापट म्हणजे सहाहजार धनु य वरील स्तभादिकाची उंची जाणावी

२ मानाचें स्तभन करितात किंवा त महामानाचे (मोठे) असतात अथवा त्यांनां त्रैलोक्याकडून मान मिळतो म्हणून त्याना **मानस्तंभ** म्हणतात.

( घरांची ओळ ), तिच्या पलीकडे स्फटिकांचा प्राकार (तट), त्याच्या आंत–श्रीमंडपांत–देव, मनुष्य आणि मुनी यांची सभा व सभेच्या मध्यभागीं त्रिमेखलेवरील सिंहपीठावर स्वयंभू ह्मणजे भगवान् तीर्थंकर हे विराजमान झालेले असतात. याप्रमाणें समवसरणाची रचना जाणावी. ही जिनसभा पाहून, ही स्वर्गसृष्टि, कीं हा जिनाचा प्रभाव, कीं असें होणें हा स्वभावच, कीं हें इंद्राचें कौशल्य याप्रमाणें नानाप्रकारची कल्पना करित तो देवसमाज त्या समवसरणभूमीस पाहून अत्यंत संतुष्ट झाला. सर्व कार्यांत कुशल असा इंद्र हें सभामंडल निर्माण करण्यांत स्वतां सूत्रधार झाला होतां एवढेंच येथें सांगून आतां त्या जिनसभेच्या मध्यभागीं जी गंधकुटी ( जिनेंद्राचें मुख्यस्थान ) असते तिचें गणाधिपति गौतमस्वामी वर्णन करितात.

## पर्व २३ वें.

### भगवत्समवसृतिविभूतिवर्णन.

कुबेरानें समवसरणसभेच्या मध्यभागीं उंच शिखरांनीं शोभणारी, स्वर्गांतील विमानापेक्षांही सुंदर व फार मोठी अशी गंधकुटी रचिली होती. जिनेंद्राच्या अंगच्या सुगंधानें ज्यांत भर पडली आहे अशा धूपांच्या गंधानीं तिनें सर्व दिशा सुगंधित केल्या ह्मणून तिला ' गंधकुटी ' हें सार्थ नांव आहे. त्या गंधकुटीच्या मध्यभागीं इंद्राच्या आज्ञेवरून कुबेरानें नाना जातींच्या रत्नांनीं खचित असें सुवर्णमय सिंहासन निर्माण केलें

होतें. त्या सिंहपीठावर आपल्या प्रभावानें चार अंगुलांच्या अंतरावर अंतराळीं विराजमान होऊन आदितीर्थंकरानें तें सुशोभित केलें होतें. त्यावेळीं इंद्रप्रभृति देवांनीं आकाशांतून पुष्पवृष्टि केली. ज्याला मरकतमण्याप्रमाणें हिरवीं पानें आहेत, ज्याचीं मुळें वज्राचीं आहेत व ज्याचें बुड रत्नांचें असून ज्याचीं फुलें चित्रविचित्र रंगाच्या रत्नाचीं आहेत असा अशोक वृक्ष भगवंताच्या अग्रभागीं शोभत असे. जिनाच्या मस्तकावर अंतराळीं अधर असलेलें, देदिप्यमान, इंद्रनीलरत्नजडित व शुभ्र असें जें छत्रत्रय (तीन छत्रें एकावर एक अशीं असतात. ) होतें तेंही इंद्राच्या आज्ञेवरून कुबेरानेंच बनविलें होतें. जिनेंद्राच्या दोन्ही बाजूंस असलेले यक्ष चंद्राप्रमाणें भासणारीं व शुभ्र अशीं चौसष्ट चामरें भगवान् आदिजिनावर वरचेवर ढाळित असत. सर्व तीर्थंकरांना याप्रमाणेंच ६४ चामरें असतात. त्यांच्या निम्मी पूर्ण चक्रवर्तीला असतात; व या श्रेणिकापर्यंतच्या महामंडलेश्वर राजाला त्यांच्याही निम्मीं असतात. देव, असुर, मनुष्य इत्यादिकांनीं भरलेली अशी ती समवसरणाची समस्त भूमी जिनाच्या अंगच्या प्रभामंडलानें सर्व बाजूंनीं प्रकाशमान झाली. त्यावेळीं, क्षीरसमुद्राप्रमाणें शुभ्र अशा जिनाच्या अंगच्या प्रभामंडलात पहाणाऱ्यास भूत व भविष्य कालचे सात भव दिसत असत; अर्थात् देव, दैत्य व मनुष्य ह्यांना आपापल्या पाठीमागच्या सात व पुढें प्राप्त होणाऱ्या सात जन्मांचें स्मरण झालें. मेघाप्रमाणें शब्द करणारा व दिव्य असा गंभीरध्वनि जेव्हां या ऋषभजिनाच्या मुखकमलापासून निघाला, तेव्हां भव्य जीवांचा मोहरूपी अं-

धकार नाहींसा करणारा हा जिनदेव सूर्याप्रमाणें दिपूं लागला. भगवंताचा दिव्यध्वनि[1] एक प्रकारचाच असून तो आपल्यामध्यें सर्व प्रकारच्या–मनुष्य, देव, असुर, पशु इत्यादिकांच्या–भाषा गर्भित करीत असे; ह्मणजे सर्वज्ञांनीं दिव्यध्वनिद्वारां केलेला उपदेश जमलेल्या सर्वांना समजत असे. याप्रमाणें प्रभामंडल व दिव्यध्वनी यांशिवाय बाकीची सर्व बाह्य विभूति इंद्रानें देवांकडून करविली होती. समस्त पदार्थांचें यथावत् स्वरूप प्रत्यक्ष जाणणारा व गणधरप्रभृतींना सुद्धां पूज्य असा तो आदिजिनेंद्र समवसरणाच्या मध्यभागीं सुवर्णासनावर जगाला बोध करण्याकरितां विराजमान झाला. इंद्रप्रभृति सर्व देवांनीं, समवसरणभूमीला तीन प्रदक्षिणा करून त्या सभेंत प्रवेश केला. आंत गेल्यावर प्रथम देवेंद्रांनीं चतुर्मुख अशा त्या तीर्थंकर आदिजिनेंद्राला साष्टांग प्रणिपात केला. नंतर सर्वांनीं अष्टद्रव्यांनीं मोक्षफलप्राप्तीकरितां श्रीजिनाच्या पदकमलाची पूजा केली. पण हा भगवान् कृतकृत्य झाल्यामुळें याला या पूजेशीं काय कर्तव्य आहे? वीतराग असल्यामुळें तो संतुष्टही होत नाहीं व द्वेषही करित नाहीं हें खरें आहे. तथापि, पूजामाहात्म्य दाखविण्याकरितां येथें आचार्य ह्मणतात कीं, जिनभक्तांस जिनपूजेचें फळ आपोआप प्राप्त होतेच; ह्मणून, पूजा ही केलीच पाहिजे. असो. पूजा केल्यानंतर देवेंद्रांनीं भगवंताची स्तुति केली. ती अशीः–"हे भगवन्, दुःखमय अशी ही संसार-

टीपः—१ जिनाचा दिव्यध्वनि हा अक्षरघटित असतो. कारण, अक्षरांच्या योग्य समुदायावांचून लोकांस अर्थाचें ज्ञान होणें शक्यच नाहीं.

रूपी वेल तूं आपल्या उपशमभावरूपी हस्तांनीं उपटून टाकिलीस. तूं क्रोध, मान, माया व लोभ हे चार कषाय तपरूपी अस्त्रानें जिंकिलेस. तूं मन्मथास जिंकून शांतिसुखाचा अनुभव घेत आहेस हें तुझ्या निर्विकार आकृतीवरून स्पष्ट दिसत आहे. हें जिनेंद्रा, तुझें हें शरीर दिगंबर असूनही रम्य दिसतें. तुझा हा देह घर्मरहित, मलमूत्रादिदोषरहित, अत्यंत सुगंध, सुलक्षणघटित, रक्तरहित ( दुग्धमय ), प्रकाशयुक्त, धातुदोष रहित ( ज्योतिर्मय धातु असल्यामुळें मलरूप धातूनें रहित ), पापणी न मिटविणारा व रत्नाप्रमाणें देदिप्यमान असा आहे. तुझें समचतुरस्रसंस्थान असून, तुझ्या अस्थि वज्राप्रमाणें बळकट आहेत. तुझी शक्ति अपार आहे. तूं यथार्थ उपदेश करणारा सर्वज्ञ प्रभु आहेस. या सर्वांवरून तूं देवाधिदेव आहेस हें स्पष्ट होतें. तुझें ध्यान करणारा जीव मुक्त होतो. तूं उपदेशिलेल्या श्रेष्ठ आगमाचा (शास्त्राचा) मुमुक्षु अभ्यास करितात. हे जिना, तुझ्या ठायीं आमची निर्मल भक्ती प्रगट होवो एवढेंच तुला आमचें मागणें आहे." तदनंतर सर्व देवांसह ते बत्तीस इंद्र त्या सभेंत जिनेंद्रासन्मुख आपापल्या जागीं बसले. जिच्या मध्यभागीं **अरहंत** देव बहुतकरून पूर्वदिशेस व केव्हां केव्हां उत्तरदिशेस मुख करून विराजमान होतात अशा त्या पुण्य समवसरण-भूमीसभोंवती पहिल्या कोष्टकांत विस्तीर्ण ज्ञानाचे धारक गणधर वगैरे मुनी, दुसऱ्या कोष्टकांत आर्यिका व राजे वगैरेंच्या

---

**टीपः**—१ भवनवासी इंद्र १०, व्यंतरेंद्र ८, सूर्य व चंद्र असे दोन ज्योतिष्केंद्र व कल्पवासी इंद्र १२ मिळून ३२ इंद्र होते.

स्त्रिया, तिसऱ्यांत भवनवासी देवांगना, चौथ्यांत व्यंतरवासी देवांगना, पांचव्यांत ज्योतिष्क देवांगना, सहाव्यांत कल्पवासी देवांगना, सातव्यांत भवनवासी देव, आठव्यांत व्यंतरदेव, नवव्यांत ज्योतिष्कदेव, दहाव्यांत कल्पवासी देव, आकराव्यांत मनुष्य राजे, चक्रवर्ती वगैरे व बाराव्या कोष्टांत पशु असा बसण्याचा क्रम असे. याप्रमाणें हे बारा गण आपापल्या कोष्टांत आदिजिनेश्वराच्या भोंवती क्रमानें बसले होते. त्यावेळीं भव्यजनांचा बंधु हा जिनसूर्य अत्यंत दिपूं लागला. येथें आचार्य ह्मणतात कीं, धर्मचक्राचा अधिपति जो जिन त्याची जी समवसरणभूमि तिचें जो भव्यात्मा भक्तिपूर्वक सतत स्मरण करतो त्यास जिनलक्ष्मी (तीर्थंकरपद) निश्चयेंकरून प्राप्त होते.

## पर्व २४ वें.

### भगवद्धर्मोपदेशनोपवर्णन.

मोहरूपी विषानें मुर्च्छित झालेलें हें जग ज्याच्या केवलज्ञानानें तत्काल जागृत झालें तो आद्य वृषभतीर्थंकर विजयी असो!

राज्यावर असूनही शमदमादिगुणांच्या योगानें 'ऋषि' ह्मणविणाऱ्या भरतराजर्षीला धर्माधिकारी सेवकांपासून पित्याचें केवलज्ञान, अंतःपुरांतील सेवकांपासून पुत्रजन्म व आयुधशाळेंतील सेवकांकडून चक्ररत्नाची उत्पत्ति हीं तिन्हीं एकावेळींच समजलीं. त्यामुळें, त्यांतलें प्रथम कोणतें कार्य करावें ह्मणून तो राजर्षि क्षणपर्यंत घोंटाळल्यासारखा झाला. धर्म, अर्थ व काम या तीन

पुरुषार्थांच्या फळांची उत्पत्ति ह्मणजे पुण्यतीर्थ, पुत्रजन्म व चक्ररत्न हीं तीन्हीं एकदम त्याला प्राप्त झालीं होतीं. त्यापैकीं, पुण्यतीर्थ ह्मणजे गुरूचें केवलज्ञान हें धर्मपुरुषार्थाचें फळ होय. पुत्र हा कामाचें फळ व दैदीप्यमान चक्र हें ज्यानें पुनरपि अर्थप्राप्ति होते अशा अर्थाचें फळ होय. अथवा, हें सर्व धर्माचेंच पूर्ण फळ होय. कारण, अर्थ हें धर्मवृक्षाचें फळ व काम हा त्या फळांतला रस होय. ज्यापासून मोक्षप्राप्ती होते असें धर्मकार्यच सर्वांत प्रथम करावें असा विचार करून त्यानें प्रथम जिनपूजा करण्याचा निश्चय केला. व आपले बंधु, अंतःपुरांतील स्त्रिया, नागरिक व सैन्य यासह भरत जिनाच्या समवसरणमंडलाला जाण्यास निघाला. तेथें गेल्यावर प्रथम तीन प्रदक्षिणा घालून व मानस्तंभांची पूजा करून तो राजर्षि श्रीमंडपाजवळ गेला. त्यानंतर त्यानें पहिल्या पीठाजवळ चार बाजूंस असलेल्या चार धर्मचक्राची व दुसऱ्या पीठावर असलेल्या प्रभूच्या आठ महाध्वजाची गंध वगैरे पवित्र द्रव्यांनीं पूजा केली. तदनंतर गंधकुटीच्या मध्यभागीं सिंहासनावर विराजमान झालेल्या भगवान् आदिजिनेंद्राची अत्यंत भक्तिभावानें पूजा करून, भरतानें भगवंताची नानाप्रकारें स्तुति केली. व गुरूपासून तत्व जाणण्याच्या उत्कट इच्छेनें त्यानें विज्ञापना केली कीं, हे भगवन्, धर्माधर्मादि तत्वाचा विस्तार कसा आहे, जिनमार्ग व त्याचें फळ कसें आहे हें सर्व सांगण्याचा आह्मांवर अनुग्रह करा. हें ऐकून श्रीवृषभनाथानें उपदेश करण्यास सुरुवात केली. भगवान् दिव्यध्वनीद्वारें उपदेश करूं लागले ह्मणजे त्यांच्या मुखावर कोणताही विकार

आणि भाव यांचें निमित्तेंकरून ज्यावेळीं कर्म आपलें फल देण्यास तयार होतें, त्यावेळीं त्यास उदय ह्मणतात. कर्माच्या उदयानें आत्म्याचे जे परिणाम होतात त्यास औदयिकभाव ह्मणतात. व कर्माचा क्षय वगैरेंची अपेक्षा नसून चेतनत्व वगैरे जो जीवाचा स्वाभाविक भाव त्याला पारिणामिकभाव ह्मणतात. पारिणामिक भाव ससारी व मुक्त जीवालाही सारखाच असतो. औपशमिक व क्षायिक हे दोन भाव भव्याला होतात. मिश्र, औदायिक व पारिणामिक हे अभव्यालाही होतात. ज्ञान व दर्शन अशा भेदानें जीवाचा उपयोग ( ज्ञानानुकूल आत्मपरिणाम किंवा आवरणाच्या क्षयापासून किंवा उपशमापासून घडून येणारा अर्थग्रहण करण्याचा व्यापार ) दोन प्रकारचा आहे. त्यापैकीं ज्ञानाचे मति, श्रुति, अवधि, मन पर्यय, केवल, कुमति, कुश्रुति व विभगावधि असे आठ भेद आहेत. त्यात ज्ञान हें साकार ( सप्रकार अथवा भेद ग्रहण करणारें ) व दर्शन हें निराकार ( निष्प्रकारक ) अर्थात् सामान्यग्रहण करणारें आहे. जगात घट, पट वगैरे जे पदार्थ आहेत त्याचे परस्पर भेद दाखविणारे जे घटत्व पटत्व वगैरे धर्म त्याच्या योगानें पदार्थांच्या भेदाचें ग्रहण करणें, ह्मणजे ते जाणणें याला आकार ह्मणतात. *पदार्थांच्या सामान्यस्वरूपाचाच प्रतिभास होत* असल्यामुळें दर्शन हें अनाकार आहे. जीव, प्राणी, जतु, पुरुष, आत्मा, अतरात्मा, ज्ञानी इत्यादि पर्याय नावें या जीवाला उपाधिभेदामुळें आहेत. जीव हा वर्तमानकाळीं आहे, भूतकाळीं होता व भविष्यकाळीं ही असणारा असा आहे ह्मणून

ह्याला जीव ह्मणतात. जीवांचे दहा प्राण आहेत, ह्मणून प्राणी असें ही त्याचें नांव आहे. हा जीव उत्पादविनाशशून्य (नित्य) आहे, व त्याचे पर्याय ह्मणजे मनुष्यादि शरीररूप उपाधि हे वेगळे वेगळे आहेत. जीवाला संसार आणि मोक्ष अशा दोन प्रकारच्या अवस्था आहेत असें मानिलें आहे. देव, नारक, मनुष्य व तिर्यंच असे ज्याला चार अवयव आहेत अशा जन्ममरणाच्या भोंवऱ्यांत पुनः पुनः भ्रमण करणें याला **संसार** ह्मणतात. व संपूर्ण कर्मांचा नाश होणें ह्यास मोक्ष ह्मणतात. अनंतसुख हें मोक्षाचें स्वरूप आहे. सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र हें रत्नत्रयच मोक्ष मिळण्याचें साधन आहे.

आप्त ह्मणजे यथार्थवक्ता जिनपरमेश्वर, आगम ह्मणजे जिनानें प्रकट केलेलें शास्त्र, व जीवाजीवादि पदार्थ यांचें श्रद्धान (हें असेंच आहे असा विश्वास) याला **सम्यग्दर्शन** ह्मणतात. हें मोक्षाचें पहिलें साधन आहे. जीव वगैरे जे पदार्थ त्यांचें जें खरें स्वरूप तें जाणविणारें जें तें ज्ञान होय. तें अज्ञानांधकाराचा नाश झाल्यावर प्राप्त होतें. जो विषयभोगांविषयीं निरिच्छ झाला आहे, जो दिगंबर होऊन पूर्ण अहिंसक झाला आहे अशा मुमुक्षू मुनीचा जो माध्यस्थभाव तेंच सम्यक्चारित्र होय. किंवा, संसार उत्पन्न होण्यास कारणीभूत अशा मिथ्यात्वकषायादि क्रिया त्यांपासून विरक्त होणें यांस सम्यक्चारित्र ह्मणतात. सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र या तिन्हींची एकता होणें हा मोक्षमार्ग होय. सम्यग्दर्शन जर असेल तरच

टीप १:-संसारश्चतुरंगेऽस्मिन्भवावर्त्ते विवर्त्तनम् । ॥

ज्ञान व चारित्र हीं फळ देणारीं होतात. आणि सम्यग्दर्शन व सम्यक्चारित्र हीं एकत्र असतांना त्याठिकाणीं प्राप्त होणारें जें ज्ञान तें मोक्षाचें कारण आहे. दर्शन व ज्ञान यांनीं रहित असें चारित्र हें फळ देणारें नसून उलट अधःपात करणारें आहे. आप्त, आगम व पदार्थ या तिन्हींविषयीं बळकट श्रद्धा असली ह्मणजे सम्यग्दर्शन अधिक शुद्ध होतें. असें शुद्ध असलेलें दर्शनच फलप्रद होय. अनंतदर्शन वगैरे गुणांनीं युक्त, कर्मकलंकरहित, निर्मल, कृतार्थ, परमहितोपदेशक असा जो तोच खरा आप्त होय. समस्त पुरुषार्थांचा ज्यांत उपदेश केला आहे व जें नय आणि प्रमाण यांनीं गंभीर आहे असें जें आप्ताचें ह्मणजे सर्वज्ञ वीतराग प्रभूचें वचन तें आगम होय. याशिवाय असत्पुरुषांचें जें वचन तें आगम नव्हे. भव्य, अभव्य व मुक्त असे जीवाचे तीन प्रकार आहेत असें वर सांगितलेंच आहे. ज्याला पुढें मुक्ति होणार आहे तो भव्यजीव समजावा. तो सुवर्णपाषाणासारखा होय. ह्मणजे जसें सुवर्णमिश्रित पाषाणाला भट्टी वगैरे योग्य सामुग्री मिळाली ह्मणजे त्यापासून निवळ सोनें निघतें तसें भव्यजीवाला तप वगैरे सामुग्रीनें शुध्दता येऊन मुक्ति मिळते. भव्याच्या उलट ज्याची स्थिति आहे तो अभव्य समजावा. तो अंधकपाषाणासारखा होय. अभव्यजीवाला मोक्ष मिळण्याच्या कारणांची सामुग्री कधींच असत नाहीं. ह्मणजे तो केव्हांही मुक्त होणार नाहीं. कर्मबंधनांपासून मुक्त झालेला, त्रैलोक्याच्या अग्रभागीं वास करणारा, अनंत ज्ञान दर्शन सुख व वीर्य यांनीं युक्त असा

जो जीव तो सिद्ध जीव होय. याप्रमाणें जीव पदार्थ संक्षेपानें सांगितला. आतां अजीवाचें वर्णन करितो.

## अजीव.

सुखदु:खांचें ज्ञान किंवा हिताविषयीं प्रवृत्ति आणि अहितापासून भीति हीं ज्याला कधीच असत नाहींत तें अजीवद्रव्य होय. जो चैतन्यगुणरहित अर्थात् अचेतन असेल त्यास अजीव म्हणतात. ज्या वस्तूमध्यें स्वयंचैतन्य म्हणजे पाहण्याची व जाणण्याची शक्ति नाहीं तें अजीवद्रव्य. अजीवद्रव्याचे धर्म, अधर्म, आकाश, काल व पुद्गल असे पांच प्रकार आहेत. जीव व पुद्गल यांच्या कर्माप्रमाणें होणारी जी गति म्हणजे गमन त्याला सहाय करण्याला जें कारण तें धर्मद्रव्य होय. व जीवपुद्गलांच्या स्थितीला जें कारण तें अधर्मद्रव्य होय. उदाहरणार्थ, ज्याप्रमाणें मत्स्याचें गमन जलावांचून होत नाहीं, पण जल कांहीं त्याला गमन कर म्हणून प्रेरणा करीत नाहीं, त्याप्रमाणें जीवपुद्गलांच्या गमनाला धर्मास्तिकाय हा स्वतः उदासीन असून फक्त सहाय करणारा आहे. जीवपुद्गलांना गमनाची इच्छा होईल तेव्हांच धर्मद्रव्य सहायक होतें. तसेंच, झाडाची सावली जशी पांथस्थाच्या गमनक्रियेस प्रतिबंधक नसून विश्रांतीस मात्र कारण होते, म्हणजे ती येथें येऊन बैस म्हणून त्यास प्रेरणा करित नाहीं, फक्त इच्छा असल्यास त्याच्या स्थितीला मात्र ती कारण झालेली असते, तसेंच अधर्मास्तिकायही गतिमान् जीवपुद्गलांच्या स्थितीला मात्र कारण आहे. पण तो उदासीन आहे. स्वतां कांहीं त्यांच्या स्थितीचा प्रेरक नव्हे.

जीव वगैरे संपूर्ण पदार्थांना अवकाश देणें हें आकाशाचें लक्षण आहे, अर्थात् जीवादिक पदार्थ ज्या ठिकाणीं असतात तें आकाश होय. तें अस्पर्श, अमूर्त, सर्वव्यापी व निष्क्रिय (स्थिर किंवा चलनवलन न करणारें ) असें आहे. वर्तना हें कालाचें लक्षण आहे. वर्तना ह्मणजे कालाचा व घटादि वस्तूंचा आश्रय जिला आहे अशी व पूर्वी असलेले गुण आणि पर्याय त्यांना घेऊन होणारें जें स्थित्यतर त्याला कारणीभूत असलेली क्रिया. तेव्हां, कोणत्याही वस्तूचें स्थित्यंतर होण्यास त्या वस्तूच्या अवयवात जी सूक्ष्म क्रिया होते, त्या क्रियेला निमित्तपणानें जो आश्रय ( क्रिया होत आहे, ही क्रिया झाली, ही क्रिया होणार अशा शब्दप्रयोगानें क्रियेचें वर्तमानत्व, भूतत्व व भविष्यत्व दाखविण्याला साधन ) तो काल असें समजावें. जसें, कुंभाराचें चाक फिरू लागलें असतां, त्याच्या फिरण्यास खालील शकू निमित्त होतो, तसें प्रत्येक वस्तूवर होणाऱ्या क्रियेस काल हा निमित्त आहे. पूर्वी सांगितल्याप्रमाणें क्रियेनें उपलक्षित जो काल त्यावरून मुख्य कालाचा निर्णय होतो. मुख्य काल आहे ह्मणूनच ' वर्तनालक्षणः कालः ' या श्लोकात सांगितलेला गौणकाल भासत आहे. मुख्य (निश्चय) काल ह्मणजे क्रिया हें लक्षण नसतांनाही असलेला काल. क्रिया होण्यास पुष्कळ

---

**टीप १:**—बृहद्द्रव्यसंग्रहाच्या टीकेंत ' वर्तना ' शब्दाची व्याख्या दिली आहे. ती अशी —' स्वकीयोपादानरूपेण स्वयमेवपरिणममानानां पदार्थानां कुम्भकारचक्रस्याधस्तनशिलावत् , शीतकालाध्ययने अग्निवत्, पदार्थपरिणतेर्यत्सहकारित्वं सा वर्तना भण्यते ' ह्मणजे आपआपल्या उपादानकारणामुळें स्वतन्त्र परिणमन प्राप्त झालेल्या पदार्थांची, जी पदार्थपरिणतीमध्यें सहकारिता असते तिला वर्तना असें ह्मणतात.

सामुग्री लागते. ती सामुग्री नसली ह्मणजे क्रिया होत नाहीं. तथापि काल हा स्वरूपतः असतोच. ह्मणून वर्तना हें जें कालाचें लक्षण सांगितल आहे तें वारंवार सर्वदा असतें असा नियम नसल्यामळें तें उपलक्षण मानिलें आहे. काल हा एक क्षणापासून आरंभ होऊन अनंत क्षणात्मक आहे. पृथ्वी, जल वगैरेंच्या एका परमाणूची क्रिया होण्यास जो काल लागतो तो एक क्षण समजावा. याप्रमाणें अगणित परमाणूंच्या क्रियेला जो काल लागावयाचा तो ही अगणित असलाच पाहिजे. ह्यावरून, जीवादि पदार्थांचे जे अनेक परिणाम होत आहेत त्यांना करणारा ह्मणजे त्या परिणामाला निमित्त होणारा काल आहे असें सिद्ध होतें. तेव्हां इतर वस्तूंच्या होत असलेल्या परिणामाला किंवा पर्यायाला निमित्त होणें हा कालाचा गुण आहे. काल ह्मणून जर कांहीं एक द्रव्य जगांत नसतें, तर द्रव्याचे सर्व परिणाम तावडतोब झाले असते. परंतु, ज्याअर्थी द्रव्याचा कोणताहि परिणाम तावडतोब होत नसून अवकाशानें होतो, त्याअर्थी द्रव्याच्या परिणामाला कांहीं तरी निमित्त कारण आहे असें मानिलें पाहिजे व तें कारण काल हेंच होय ह्या कालाला वास्तविक अवयव नाहींत व त्यात दुसरें कांहीं मिश्र होऊन त्याची वृद्धिर्हा होत नाहीं ह्मणून हा 'अकाय' आहे असें सांगितलें आहे. यावांचून बाकीचे जीव, अजीव, धर्म, अधर्म व आकाश हे पाच यांना अवयव असल्यामुळें व याची वृद्धि व क्षय ही होत असल्यामुळें हे अस्तिकाय आहेत. हीं पाच द्रव्यें 'नित्यसंति' ह्मणजे निरंतर आहेत; ह्मणून त्यांना 'अस्ति' असें ह्म-

टलें आहे. धर्म, अधर्म, आकाश व काल हे पदार्थ मूर्तिरहित ( अकाय ) आहेत. व पुद्गलद्रव्य हें मूर्तियुक्त ( अस्तिकाय ) आहे. आतां पुद्गलाचें लक्षण व भेद हीं सांगतो.:—

**वर्णगंधरसस्पर्शयोगिनः पुद्गला मताः ।**
**पूरणाद्गलनाच्चैव सम्प्राप्तान्वर्थनामकाः ॥ ४५ ॥**

ह्मणजे, रूप, रस, गंध व स्पर्श हे गुण ज्यांवर राहतात ते पुद्गल असे समजावेत. ते आपल्या योगानें पदार्थ वाढवितात व कमी करितात; ह्मणजे एखाद्या पदार्थांत पूर्वी असलेल्यापेक्षां अधिक पुद्गल जमून ( पूरण होऊन ) तो पदार्थ मोठा होतो, व एखाद्या पदार्थांत पूर्वी असलेल्यांपैकीं कांहीं पुद्गल गळून तो पदार्थ कमी होतो ह्मणून त्यांस 'पुद्गल' हें सार्थ नांव आहे. अर्थात्, ज्यांचें पूरण ( वृद्धि ) व गलन ( ह्रानि ) हीं दोन्ही होतात, अथवा जे दुसऱ्याची वृद्धि व ह्रानि करितात ते पुद्गल होत. पुद्गलाचे अणु व स्कंध असे दोन प्रकार आहेत. त्यांपैकीं चिकट व रुक्ष अशा अणूंचा जो समुदाय त्याला स्कंध ह्मणतात. तो स्कंध सांवली, प्रकाश, अंधार व मेघ असा चार प्रकारचा आहे. अणु हे अतींद्रिय असल्यानें घट, पट वगैरे कार्यांनीं अनुमान करण्यास योग्य असे आहेत. व त्यांच्यावर स्निग्ध व रुक्ष असे दोन तऱ्हेचे स्पर्श राहतात. ते वर्तुलाकार असून त्यांच्यावरील रूप व रस हे बदलत नाहींत. तसेच ते स्वरूपानें नित्य ह्मणजे केव्हांही नाश न पावणारे व घटादिरूप परिणामानें नाश पावणारे असे आहेत. पुद्गलाचे सूक्ष्मसूक्ष्म, सूक्ष्म, सूक्ष्मस्थूल, स्थूलसूक्ष्म, स्थूल

व स्थूलस्थूल असे सहा भेद आहेत. त्यांत परमनिकृष्ट परिमाण असलेला असा जो परमाणु त्याला ' सूक्ष्मसूक्ष्म ' पुद्गल असें ह्मणावें; तो स्वरूपानें अदृश्य व अस्पृश्य असा आहे. पुण्यपापरूप कर्माचे जे अवयव त्यांना ' सूक्ष्म ' पुद्गल ह्मणतात. शब्द, स्पर्श, रस व गंध यांना ' सूक्ष्मस्थूल ' पुद्गल असें ह्मणतात. कारण, हे शब्दादिक पुद्गल नेत्राला जरी दिसत नाहींत, तरी कर्णादि इंद्रियांना यांचें ज्ञान होतें. तेव्हां यांना सूक्ष्मही ह्मणतां येत नाहीं व स्थूलही ह्मणतां येत नाहीं, ह्मणून ह्यांना सूक्ष्मस्थूल पुद्गल असें ह्मणतात. छाया, चांदणें, प्रकाश व अंधकार ह्यांना ' स्थूलसूक्ष्म ' पुद्गल असें समजावें. कारण, हे कोणाला प्रतिबंध करीत नाहींत व ह्यांस गोळा करून एके ठिकाणीं जमवितां येत नाहीं ह्मणून हे सूक्ष्म आहेत. व नेत्राला दिसतात ह्मणून हे स्थूल आहेत. एतदर्थ ह्यांना ' स्थूलसूक्ष्म ' असें ह्मणतात. पाणी वगैरे जे पातळ पदार्थ ते 'स्थूल' पुद्गल होत. कारण हे पदार्थ पूर्वी सांगितलेल्या छाया वगैरे पदार्थांपेक्षां स्थूल आहेत. व पृथ्वी वगैरे जे घन पदार्थ आहेत त्यांना ' स्थूलस्थूल ' पुद्गल असें नांव आहे. हे भरता, आह्मी पदार्थांचें यथार्थ स्वरूप येथपर्यंत वर्णन केलें; त्यांवर कुतर्क मनांत न आणतां, श्रद्धा ठेवणारा भव्य जीव सर्वोत्कृष्ट असें जें ब्रह्मस्वरूप त्याला प्राप्त होतो. नंतर महाज्ञानी आदितीर्थंकरांनीं मनुष्यजीव व त्यानें साधावयाचा पुरुषार्थ; जिनमताची परंपरा व तिचें फल; बंध, मोक्ष व त्यांचीं साधनें; तीन जगांची स्थिति; नरकविस्तार; जीवाचें इहपरलोकीं गमन इत्यादि-

काचें सक्षेपानें वर्णन केलें. अरहत गुरूपासून तत्वाचें हें यथावत्स्वरूप ऐकून भरतानें श्रीजिनाजवळ निर्मल असें सम्यग्दर्शन व व्रतें घेतलीं त्यासमयीं देव, दैत्य, मनुष्यें व मुनीश्वर याची सभा सद्धर्मरूपी अमृताचें पान करून अत्यत सतोष पावली प्रभूचा दिव्यध्वनि (धर्मोपदेश) ऐकून भव्य जीवाच्या मनाचे परिणाम अतिशय शुद्ध झाले. त्यावेळीं भरताचा बधु श्रीमान् वृषभसेन, कुरुदेशचा राजा श्रेयान् व सोमप्रभ व इतर राजे दीक्षा घेऊन आदिजिनाच्या समवसरणातले गणधर झाले. भरताची बहिण ब्राह्मी ही गुरुच्या अनुग्रहानें दीक्षा घेऊन आर्यिकाची मुख्य झाली. सुदरीनेंही ब्राह्मीच्या पाठीमागून लागलीच दीक्षा घेतली. मरीचीशिवाय बाकीच्या सर्व महातपस्वी जनानीं श्रीऋषभभट्टारकाजवळ ज्ञान मिळवून, दीक्षाग्रहण केली तदनतर भरत परमपूज्य पित्याची पूजा करून आपल्या बधूसह राजधानीस परत गेला.

---



# पर्व २५ वें.

## भगवद्विहारवर्णन.

भरत गेल्यावर श्रीऋषभदेवांनीं आपला दिव्य उपदेश संपविला नंतर सौधर्मेंद्रानें प्रसन्न अंतःकरणानें व मोठ्या भक्तिभावानें त्रिभुवनाचा स्वामी जो सर्वज्ञ आदितीर्थंकर त्याची स्तुति करण्यास प्रारंभ केला. महेंद्र ह्मणतोः—

'हे सर्वज्ञ प्रभो, तुझ्या पुण्यकारक गुणांचें कीर्तन हीच तुझी स्तुति होय. मोक्षसुख हें तुझ्या स्तुतीचें फल आहे. ह्मणून, मी भक्तीनें प्रेरित होऊन स्वयंप्रकाशस्वरूप व गुणरत्नांचें उत्पत्तिस्थान अशा तुझी स्तुति करितों. आदिजिनेंद्रा, तुझें हें भूषणादि उपाधींनीं रहित असें शरीर रागादि कषायांच्या विजयाची साक्ष देत आहे. कारण, रागादि कषायांच्या संबंधानें होणारे भूषणधारणाविषयींचे विकार हे रागी जीवालाच असतात. हे देवा, आह्मी तुझ्या वचनरूपी अमृताला प्राशन करून आज खरोखर ' अमर ' झालों. पशुपक्ष्यांच्याही अंतःकरणांतील अज्ञानांधकाराचा नाश करणारे हे तुझे वाणीरूपी किरण ह्या सर्व सभेला फार आनंद देत आहेत. जिनेंद्रा, तुझ्या समवसरणभोंवतालच्या शंभर योजनपर्यंतच्या प्रदेशांत मनुष्यांना अन्न पान वगैरे भोग्य पदार्थ तुझ्या माहात्म्यानें पाहिजे तितके सहज मिळतात; अर्थात् तो प्रदेश सुभिक्ष - असतो. तूं सद्धर्माचा उपदेश करण्याविषयीं तयार झाला असतां क्रूर व

हिंस्र असे व्याघ्रादि पशू देखील मनुष्यादिकांची हिंसा करीत नाहींत. हे भगवन्, तुला केवलज्ञान झालें असतांना व तुझ्या चतुर्विध घातियाकर्माचा नाश झाला असतांही तुझ्या ठिकाणीं चार प्रकारच्या आहाराची कल्पना करणें अत्यत चुकीचें व अनुचित आहे. हे आदिजिनेंद्रा, तुझ्या तेजोमय शरीराची सावली पडत नाही व पापण्याची उघडझापही होत नाहीं. तुझ्या मस्तकावर छत्र धरिलें असता त्याची पडछाया तुझ्या देहावर पडलेली दिसत नाहीं. हे ईशा, तुझे नख व केश हीं वाढत नाहींत; यावरून शुद्ध स्फटिकाप्रमाणें निर्मळ अशा तुझ्या देहातील रसादि धातु नाश पावले आहेत असें स्पष्टपणें सिद्ध होतें. हे भगवन्, पंचपरमेष्ठिस्वरूप असा सर्वज्ञ देवाधिदेव तूंच आहेस. तूं परमपवित्र व वीतराग आहेस. म्हणून, प्रभो, मलाही पवित्र कर. आता परमात्मस्वरूप अशा तुला नमस्कार करून तुझ्या गुणांची स्तुति मी पुरी करितों. कारण, तुझे गुण असंख्य आहेत. म्हणून तुझ्या नामस्मरणानेंच तुझी उपासना करावी अशी मी इच्छा करितों. सर्वत्र प्रसिद्ध अशा एकें हजार आठ लक्षणांनी

---

**टीप:**—१ भक्ष्य, भोज्य, लेह्य व पेय अन चार प्रकारचे आहार आहेत

**टीप २:—सार्थजिनसहस्रनामस्तोत्र'** नावाचें पुस्तक पं. **कलापा भरमापा निटवे** यांनीं छापून प्रसिद्ध केलें आहे येथें वाचकांनीं तें पुस्तक अथवा मूळ महापुराण पहावें

**टीप २** —तीर्थंकराच्या शरीरावर १०० व्यजनें असतात व चरणावर १०८ लक्षणें असतात, यांनाच लाछनें म्हणतात

युक्त असलेला व वाणीचा नियंता अशा तुझी मी एक हजार आठ नामांनीं आमचें इष्ट सिद्ध होण्याकरितां स्तुति करितों. ”

असें म्हणून महेंद्रानें एकहजार आठ नामावलीनें गुंफिलेल्या स्तोत्ररूप मालेनें भगवंताचें पूजन केलें. याप्रमाणें चराचरात्मक सर्व जगाचा गुरु अशा श्रीजिनेंद्राची स्तुति करून मग इंद्रानें प्रभूला तीर्थविहाराची सूचना केली. इंद्र म्हणाला, “हे भगवन्, पापरूपी अवर्षणानें ( वृष्टिप्रतिबंधानें ) शुष्क झालेल्या भव्य-जीवरूपी धान्यांला धर्मामृताच्या वर्षावानें तूंच वाढविलें पाहि-जेस. हे जिनेश्वरा, जगद्विजयाच्या कामांत सहाय्य करणारें हें धर्मचक्र अगदीं तयार झालेलें आहे. हे प्रभो, मोक्षमार्गाच्या आड येणाऱ्या मोहरूपी सैन्याचा पराभव करून सन्मार्गाचा उपदेश करण्याचा तुला हा योग्य काल प्राप्त झाला आहे. एतावता, हे जगत्पते, जागोजागच्या भव्य जीवांला उपदेश करण्यासाठीं त्वां बाहेर विहार करावा. ” इंद्राची ही विनंति ऐकून तो जिनसूर्य भव्यजीवरूपी कमलांवर अनुग्रह करण्याकरितां इच्छा नसतांही निघाला. धर्मचक्राचा स्वामी अशा त्या श्रीजि-

---

टीपः—१ प्रभु हा वीतराग असल्यामुळें त्याला मुळींच जर इच्छा नाहीं तर उपदेश करणें हें त्याला कसें संभवतें ? कारण, इच्छेवांचून शब्दोचार घडत नाहींत. प्रथमतः कोण-त्याहि विषयाचें ज्ञान असलें पाहिजे; नंतर तो विषय समजून देण्याची इच्छा झाली पाहिजे; तदनंतर तो समजून देण्या-करितां जो शब्दोचार करण्यांत येतो त्यालाच उपदेश असें

नेंद्राच्या मागून कोट्यावधि देव व दैत्य हेही प्रभूच्या विजयोत्सवास निघाले. त्यासमयीं प्रभूच्या सांनिध्यानें सर्व वृक्षांला हंगाम नसून सुद्धां सहाही ऋतूंतील फळें आलेलीं दिसूं लागलीं. सगळ्या वेलींना नवीन अंकूर फुटून फुलें आलीं. प्रभु ज्या ज्या ठिकाणीं वास करीत असत त्याच्या आसपासची एक योजन

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

ह्मणतात. या शंकेच्या निरसनार्थ अष्टसहस्रीकार ह्मणतात कीं, उपदेश करण्याकरितां इच्छा ही कारण आहेच. परंतु जो प्रणष्टमोह आहे त्याच्या उपदेशाला इच्छा कारण नाहीं. आतां, कोणी ह्मणेल कीं, हें ह्मणणें अनुभवाच्या विरुद्ध आहे. कारण, इतर जीव जसे वक्ते आहेत तसा सर्वज्ञ हाही एक वक्ता आहे. मग जसा आमचा ( किंचिज्ञ जीवांचा ) शब्दोच्चार इच्छेवांचून घडत नाहीं तसा ईश्वराचाही घडणें शक्य नाहीं. यावर आचार्य समाधान सांगतात कीं, सुषुप्तीमध्यें ( झोपेंत ) एखादा मनुष्य कांहीं तरी शब्द बरळतो, तेथें बरळणाऱ्याची इच्छा असलेली दिसून येत नाहीं. यावरून शब्दोच्चाराला

पृथ्वी वायूनें झाडून साफ कंटकरहित केली होती; व मेघानें सुगंधी जलाची वृष्टि करून तिजवरील धुरळा शांत केला होता. ह्मणून ती आरशाप्रमाणें स्वच्छ व वर्तुलाकार दिसत होती. सर्व दिशा श्रीजिनेश्वराच्या विजयोद्योगाच्या आनंदानेंच कीं काय, अत्यंत निर्मल झाल्या; व आकाशही निरभ्र असल्यामुळें फारच शोभूं लागलें. सर्वत्र सुगंध व शीतल वायु वाहत होता. त्यावेळीं सर्व प्राण्यांना एकाएकीं मोठा आनंद झाला; व ते आपापसांतील वैरभाव सोडून परस्परांशीं प्रेमवृद्धि करूं लागले. श्रीजिनेंद्राच्या वसतिप्रदेशापासून सभोंवतीं आठशें कोसपर्यंतच्या भूमीवर कोणत्याही प्रकारची प्राणिहिंसा होत नसून तेथें धान्यसमृद्धी, स्वस्थता व आरोग्य या तिन्हींचें साम्राज्य नांदूं लागलें. त्यासमयीं देवांनीं आकाशांत 'जयजय' असा शब्द करून तेथून गंधोदकवृष्टि व पुष्पवृष्टि केली. हजार पाकळ्यांनीं युक्त असलेलें धर्मचक्ररत्न प्रभूच्या पुढें गमन करित होतें. गमनसमयीं श्रीजिनाच्या चरणांखालीं अत्यंत रमणीय व सुगंधी असें सुवर्णकमल आकाशांत प्रगट झालें. त्या कमलाच्या मागें व पुढें प्रफुल्लित अशीं सात सात कमलें उत्पन्न झालीं. हीं सुवर्णकमलें इंद्राच्या आज्ञेनें देवांनीं निर्माण केलीं होतीं. श्रीजिनचरणांजवळ आकाशरूपी सरोवरांत विकास पावलेलीं हीं पंधरा कमलें दोनशें पंचवीस कमलांप्रमाणें ( आपल्या पंधरापटीनें अधिक वाढल्याप्रमाणें ) दिसूं लागलीं. प्रभूच्या अग्रभागीं चाललेल्या ध्वजांनीं, मालांनीं व अष्टमंगलांनीं सर्व आ-

टीप १:—छत्र, चमर, ध्वजा, घट, झारा, दर्पण, सागट व पत्ता.

काश व्यापिलेल्यासारखें दिसत होते. याप्रमाणें त्रैलोक्याधिपति श्रीजिनेंद्रानें आपल्या अर्धमागधी भाषेनें सर्व जीवांना संतुष्ट करीत पृथ्वीवर विहार केला. जनसमूहाची पीडा दूर करणाऱ्या त्या जिनसूर्यानें आपल्या वाणीरूपी किरणांनीं मिथ्यामतरूपी अंधकाराचा नाश करून सर्व जग प्रकाशित केलें. चालतांना मृदु अशा सुवर्णकमलावर आपलें पदयुग्म ठेवणाऱ्या श्रीआदिनाथानें ज्या ज्या ठिकाणीं विहार केला, त्या त्या ठिकाणीं असलेले भव्यजीव धर्मामृतवृष्टीनें फार संतोष पावले. याप्रमाणें ज्याचा जगद्विजयव्यापार निर्विघ्न चालला आहे असा व चराचराला सद्धर्माचा उपदेश करणारा श्रीजिनेंद्र काशी, अवंती, कुरू, कौसल, सुह्म, पुंड्र, चेदि, अंग, वंग, मगध, कलिंग मद्र, पंचाल, मालव, दशार्ण, विदर्भ वगैरे देशांत पर्यटन करून, शेवटीं कैलासपर्वतावर गेला. त्या कैलासपर्वताच्या पुढें देवांनीं तयार केलेल्या अतिसुंदर सभामंडपांत जो भक्तीनें नम्र झालेल्या द्वादशगणांनीं वेढिलेला आहे व ज्याचें प्रातिहार्याष्टक फारच रमणीय दिसत आहे असा आदिप्रभू जेव्हां सिंहासनावर विराजमान झाला तेव्हां फारच शोभूं लागला.

---

**टीप १:**—१ सिंहासन, २ छत्रत्रय, ३ चौसष्ट चामरें, ४ पुष्पवृष्टि, ५ अशोकवृक्ष, ६ भामंडळ, ७ दुंदुभि व ८ दिव्यध्वनि हे आठ प्रातिहार्य होत.



# पर्व २६ वें.

## भरतराजदिग्विजयप्रयाणवर्णन.

याप्रमाणें श्रीऋषभदेव कैलासपर्वतावर राहिल्यानंतर, भरतराजानें स्वदेशीं परत येऊन आपल्या चक्ररत्नाची यथाविधि पूजा केली. नंतर, त्यानें आपल्याला पुत्र झाल्याबद्दल महोत्सव केला. त्यावेळीं त्यानें दिलेल्या अन्नदानानें सर्व जगत् तृप्त झालें. त्यायोगें याचकांचेंच त्याप्रसंगीं दारिद्य आलें. उत्सवाची समाप्ति झाल्यावर भरत आपल्या सैन्यासह दिग्विजयाला निघाला. तेव्हां 'हे विजयी राजा, तूं दश दिशा जिंकून सर्व विश्वाचा स्वामी हो!' असा कल्याणकारक आशीर्वाद देऊन, नागरिकांनीं व स्त्रियांनीं राजावर पुष्पांजलि फेंकून त्याचा मोठा आदरसत्कार केला. प्रथम भरत पूर्व दिशेकडे दिग्विजय करण्यास निघाला. त्यावेळीं सर्व आकाश जयघोषानें दाटून गेलें. चोहीकडे सूर्यबिंबाप्रमाणें प्रकाशमान असें भरतराजाचें चक्र नावाचें आयुध सर्व सैन्यापुढें आकाशांतून गमन करूं लागलें. सर्व सैन्याचा अग्रभागीं असलेल्या भरताच्या दंड रत्नानें सर्व मार्ग राजमार्गाप्रमाणें केल्यामुळें त्याचें सैन्य कोठेंही न अडखळतां पाहिजे तसें जात होतें. मार्गांत शरदृतूची शोभा अवलोकन करित लौकरच तो गंगातटाला पोंहचला. हिमालय पर्वतांतून निघालेल्या त्या स्वच्छ, पूज्य व पवित्र अशा स्वर्णदीला (भागीरथीला) पाहून त्याला फारच आनंद झाला.

# पर्व २७ वें.

## भरतराजाविजयप्रयाणवर्णन.

स्वच्छ उदकानें आपल्याला पायच ( पाय धुण्याचें पाणी ) देतें कीं काय, अशा महानदी भागीरथीकडे कौतुकदृष्टीनें आपला प्रभु पहात आहे हें पाहून, त्याचा सारथी त्यास ह्मणाला, "महाराज, ही सर्व भुवनाला आनंद देणारी देवनदी भागीरथी रजाला ( धुरळ्याला व मनातील रजोगुणाला ) घालविणारी श्रीऋषभदेवाची वाणीच कीं काय अशी दिसते. ही महानदी उत्पत्तीमुळें हिमालयपर्वताला व संगमामुळें समुद्राला पवित्र करीते. ज्याप्रमाणें महामुनी संसारतापाचा नाश करणाऱ्या व दुर्लभ, अशा आत्मविद्येला संपादन करून सुखी होतात, त्याप्रमाणें मत्त असे हे वनगज ह्या महानदींत शिरून फार सुखी होतात. हिमालय पर्वताचें स्वच्छ असें अंत - करणच कीं काय ! असें जें पद्मसरोवर त्यापासून उत्पन्न झालेली ही भागीरथी सर्व पृथ्वीवर प्रसिद्ध व पूज्य झाली आहे. उघडच आहे कीं, ' शुद्ध जन्मा हि पूजते !' ह्मणजे, ज्याचा जन्म शुद्ध वंशात झाला असा कोणीही सर्वत्र पूज्यच होतो. हे प्रभो, गंगातीरावरील ह्या अरण्याची शोभा अवर्णनीय आहे. यांत मोठमोठ्या पुष्पशय्या केल्या असल्यामुळें रमणीय दिसणारी व देवानीं उपभोग घेण्यास योग्य अशीं लतागृहे आहेत. सारांश, येथें वसणाऱ्याच्या अंत करणात सर्वदा स्वर्गांतील नंदनवनात बसल्या-प्रमाणे संतोष होतो." याप्रमाणें सारथी सृष्टीसौंदर्याचें व वनसप-

तींचें वर्णन करीतअसतां, तो सार्वभौम राजा त्या वनभूमीला ओलांडून पलीकडे गेला. तेथून नगरसौंदर्य पहात पहात परत आपल्या भव्य तवूत प्रवेश करून, तेथेंच तो निधिपति भरत सुखानें राहिला. नतर पूर्वेच्या कितीएक राजानीं भरताला कुलपरंपरेनें आपल्याजवळ असलेल्या अनेक अमूल्य वस्तूचे नजराणे देऊन व काहींनीं आपल्या सुंदर मुली अर्पण करून त्याचें सार्वभौमत्व कबूल केलें.

## पर्व २८ वें.

### पूर्वार्णवद्वारविजयवर्णन.

दुसरे दिवशीं भरत विजयपर्वत नावाच्या ऐरावतावर आरूढ होऊन, चक्ररत्नाच्या पाठीमागून निघाला. अलघ्य व अजिंक्य असें चक्र,व शत्रूला शिक्षा करणारा दंड (या नावाचें रत्न,आयुध) हीं दोन्हीं भरताच्यापुढें झालीं. खरोखर, चक्र व दंड हीं दोनच त्याच्या विजयाचीं साधनें होतीं; व बाकीचें सर्व सैन्य शोभेकरितां होतें. प्रत्येक राष्ट्रामध्यें नजराणा घेऊन येणाऱ्या त्या त्या देशाच्या राजाचा आपल्या कृपाप्रसादानें सत्कार करीत करीत, भरतानें फक्त आपल्या राजतेजानेंच सर्व पूर्वदिशा जिंकिली. भरताच्या आज्ञेनें सेनापतीनें गंगामुखाजवळचे लक्षावधी किल्ले आपल्या ताब्यांत घेतले. नंतर तो सैन्यासहवर्तमान गंगामुखाजवळील समुद्रतीराला पोंचला. सायंकाळीं व प्रातःकालीं करावयाच्या आपल्या नित्यनैमित्तिक क्रिया करण्याविषयीं दक्ष असलेल्या भरतानें आपल्या कुलगुरूसमक्ष पंचपरमेष्टींची

करून तो त्याला नेऊन देऊन आपण चक्रवर्तीची आज्ञा मान्य केली पाहिजे. त्या चक्रवर्तीच्या उलट वागणें केव्हांहि सुखकर व्हावयाचें नाहीं. कारण, ' **महतः सरिदोघस्य कः प्रतीपं तरन्सुखी ।**' ह्मणजे, नदीच्या पूराच्या उलट पोहणारा कोण बरें सुख पावला आहे ? नीतिकार ह्मणतात.—

**इहामुत्र च जन्तूनामुन्नत्यै पूज्यपूजनम् ।**
**पापं तत्रानुबध्नाति पूज्यपूजाव्यतिक्रमः ॥**

ह्मणजे, पूज्याचें पूजन करणें हें इहपरलोकीं जीवांना सुखाचें साधन आहे. व पूज्यांचा अनादर करणें हें दोन्हीं लोकींही पाप उत्पन्न करणारें आहे. ज्ञानवृद्ध मंत्र्याचें हें भाषण मागधराजास पटून तो भरताकडे आला व ह्मणाला, ' हे भाग्यशाली प्रभो, आपल्याला चक्ररत्नाची प्राप्ति झाली त्यावेळीं न समजल्यामुळें आह्मी आलों नाहीं; त्या अपराधाबद्दल आह्मांला क्षमा करून स्वर्गांत सुद्धां दुर्मिळ अशीं हीं अमूल्य रत्नें व हेअलंकार यांचा आपण स्वीकार करावा. ' भरतचक्रवर्तीनें ती घेऊन त्याचा चांगला सत्कार केला. नंतर अनेक अंतर्द्वीपांनीं युक्त असलेल्या समुद्राकडे भरत कौतुकानें पाहत असतां त्याचा सारथि त्यास ह्मणाला, "हे दीर्घायु राजा, उत्कृष्ट अशा अनेक रत्नांनीं युक्त असलेला, सर्व जगाला उपयोगी पडणारा व गंभीर स्वभावाचा असा हा महोदधि अनेक चमत्कारांचें स्थान आहे. हा रत्नाकर तुम्हांला निरंतर आनंद देवो !" सारथि याप्रमाणें समुद्रशोभेचें नानाप्रकारें वर्णन करीत असतां, भरतानें आपल्या तंबूंत प्रवेश केला. तेथें 'स्वामिन् तूं चिरायु हो ! तूं पृथ्वी जिंकून तिचें पालन कर ! तुझें इष्ट

तुला प्राप्त होवो!' याप्रमाणें वृद्ध पुरोहितांनीं त्याला आशीर्वाद दिले. वाचकहो, हा सर्व पुण्यमहिमा होय. कारण, पुण्यकर्म फल देऊं लागलें ह्मणजे दुर्मिळ अशी वस्तु जगांत कोणतीच नाहीं. आचार्य ह्मणतात:-'पुण्ये बलीयसि किमस्ति जगत्यलंघ्यम्।' अर्थात्, पुण्य बलिष्ठ असलें ह्मणजे जगांत कांहींच असाध्य नाहीं. सारांश, आपल्या इच्छित वस्तूच्या प्राप्तीला पुण्याशिवाय दुसरें साधन नाहीं. ह्मणून, श्रीजिनानें सांगितलेल्या मार्गानें पुण्य संपादन करावें. पुण्यार्थी जनांनीं श्रीजिनपूजा, सत्पात्रीं दान, व्रताचरण व उपवासादि नियम ह्या चार क्रिया अवश्य केल्या पाहिजेत. अस्तु. ह्याप्रमाणें सर्व लोक ज्याच्या पुण्यमाहात्म्याचें वर्णन करीत आहेत असा चक्रायुधधारी भरत सैन्यांसह सुखानें गंगातीरावर त्या दिवशीं राहिला.

## पर्व २९ वें.

### दक्षिणार्णवद्वारविजयवर्णन.

नंतर प्रातःकालीं भरत इष्टसिद्धि करून देणारी अशी श्रीजिनेंद्रपूजा करून, दक्षिणदिशा जिंकण्याच्या इच्छेनें दक्षिणसमुद्राकडे निघाला. ज्या राजांची प्रजा करभारानें त्रस्त झाली होती त्यांना पदच्युत करून, भरत त्यांच्या जागीं दुसऱ्या नीतिमान् राजांची स्थापना करीत असे. व जे राजे न्यायानें वागून प्रजेला सुख देत होते त्यांचा त्यानें आदरसत्कार करून त्यांना

तुष्ट केलें. कारण, ' न्यायः क्षात्त्रोऽयमित्येवं प्रजाहितविधित्सया । ' ह्मणजे, प्रजाकल्याणाची इच्छा असल्यामुळें असें वर्तन ठेवणें हेंच राजाचें योग्य कर्तव्य होय. योग ( नसलेली वस्तु मिळणें ) व क्षेम ( प्राप्त झालेल्या वस्तूचें रक्षण करणें ) हे दोन्ही जगाच्या स्थितीला साधन असल्यानें फक्त प्रजेच्या ठिकाणीं असले ह्मणजे पुरें आहे असें नाहीं; तर, ते योगक्षेम प्रजेचें पालन करणारे जे मांडलिक राजे त्यांचे ठिकाणींही असले पाहिजेत. ह्याबद्दल भरतचक्रवर्ती फारच काळजी घेत असे. सर्व राष्ट्रें व त्या राष्ट्रांचे राजे ह्या सर्वांना भरतानें संतुष्ट केल्यामुळें, त्यालाही त्यांनीं तुष्ट केलें. ह्याप्रमाणें पूर्वेकडील राजांना जिंकून तो अयोध्येहून थेट दक्षिणदिशेला निघाला. त्याचें सैन्य ज्या ज्या ठिकाणीं जात होतें त्या ठिकाणचे लोक आपापल्या राजासह येऊन त्याला वंदन करूं लागले. ह्याप्रमाणें त्यानें सर्व दक्षिणदेश काबीज करून, शेवटीं वैजयंत नांवाच्या महाद्वाराजवळ समुद्राच्या तीरावरील उत्तम वनप्रदेश पाहून तेथें आपल्या सैन्याचा तळ दिला. नंतर तो निधिपति भरत एकटाच रथांतून समुद्रांत गेला. व वरतनुद्वीपाच्या वरतनु नांवाच्या व्यंतरदेवांच्या राजाला मागधराजाप्रमाणें जिंकून त्यानें तें द्वीप आपल्या धवल यशानें सुशोभित केलें. त्या राजानें अभेद्य कवच, रत्नखचित कटिसूत्र व तेजःपुंज चूडारत्न इत्यादि अलंकार भरतास देऊन त्याची पूजा केली. नंतर तो ऐश्वर्यवान् चक्रवर्ती श्रीवैजयंत नावाच्या समुद्राच्याद्वारानें निघून आपल्या सुशोभित छावणींत परत आला.

---

# पर्व ३० वें.

## पश्चिमार्णवद्वारविजयवर्णन.

नंतर, चक्रवर्ती भरत तेथून पश्चिमदिशा जिंकण्याच्या इच्छेनें निघाला. मार्गांत नारळाच्या मद्यानें मत्त झालेल्या सिंहलद्वीपातील स्त्रिया भरताची कीर्ति गाऊं लागल्या. तसेंच, किन्नरस्त्रियांनीं त्याचें यश त्रिकूटपर्वतावर, मलयपर्वताच्या टेकड्यावर, पाण्ड्यकवाटक नावाच्या पर्वतावर गाईलें. ह्याप्रमाणें त्यानें दक्षिण-दिशा आपल्या ताब्यात घेऊन मग, चोल, केरल व पाण्ड्य ह्या तीन देशाच्या राजास जिंकून नम्र केलें. नंतर समुद्राचें पश्चिम-तीर ओलांडून तो भूपती सह्याद्रीपर्वताजवळ प्राप्त झाला. मग अनेक नद्या उतरून व सह्याद्रीपर्वताला ओलांडून भरत-राजाचें सैन्य त्या त्या ठिकाणीं असलेल्या राजाचा परा-भव करीत, विंध्याद्रीपर्वताजवळ प्राप्त झालें. नंतर पश्चिमेकडील बगलेनें विंध्याद्री ओलांडून व नर्मदा उतरून त्याचें सैन्य वाय-व्यदिशेकडे वळलें. प्रत्येक ठिकाणीं त्याचा उत्तम सत्कार झाला.

पतन्यत्र पतङ्गोऽपि तेजसा याति मन्दताम् ।
दिदीपे तत्र तेजोऽस्य प्रतीच्याञ्जयतो नृपान् ॥

अर्थः—ज्या पश्चिमदिशेकडे जाणारा सूर्य देखील तेजानें मंद होतो, त्याच पश्चिमदिशेकडील राजाना जिंकीत चाललेल्या भरताचें तेज फारच चमकूं लागलें. शेवटीं, त्यानें समुद्राच्या तीरातीरानें जाऊन सिंधुद्वार नावाच्या प्रदेशात सैन्याचा तळ

दिला. नंतर त्यानें रथांतून समुद्रांत प्रवेश करून प्रभासदेशच्या व्यंतरदेवांचा जो प्रभासराजा त्याला जिंकिलें. त्या व्यंतराधीशानें त्याला कल्पवृक्षपुष्पांची माला वगैरे पदार्थ अर्पण करून संतुष्ट केलें. ह्या राजराजेश्वरानें समुद्रापर्यंत असलेले पूर्वदिशेकडील राजे, वैजयंतपर्वतापर्यंत वास करणारे दक्षिणेकडील राजे व पश्चिमसमुद्राच्या तीरानें युक्त असलेली पश्चिमदिशा ह्यांना जिंकून सर्व दिशा शत्रुशून्य केल्या. त्यायोगें त्याची कीर्ति सर्वत्र भूमंडळावर पसरून अजरामर झाली. आचार्य ह्म०:-

पुण्याचक्रधरश्रियं विजयिनीमैन्द्रीं च दिव्यश्रियं।
पुण्यात्तीर्थकरश्रियं च परमां नैश्रेयसीं चाश्नुते ॥
पुण्यादित्यसुभृच्छ्रियां चतसृणामाविर्भवेद्भाजनं।
तस्मात्पुण्यमुपार्जयन्तु सुधियः पुण्याज्जिनेंद्रागमात् ॥

ह्मणजे, पुण्यापासून चक्रधराची उत्कृष्ट संपत्ति प्राप्त होते. तशीच इंद्राची दिव्यसंपत्तीही मिळते. पुण्यापासून तीर्थंकरांची संपत्ति व सर्वांत श्रेष्ठ अशी मोक्षसपत्तीही प्राप्त होते. याप्रमाणें या चार प्रकारच्याही संपत्तीला मनुष्य पुण्यानेंच योग्य होतो. ह्मणून हे सुबुद्धि जनहो, पुण्यकारक अशा जैनशास्त्राला अनुसरून तुह्मी पुण्य संपादन करा !

---

## पर्व ३१ वें.

### विजयार्द्धगुहाद्वारोद्घाटनवर्णन.

नंतर भरतचक्रवर्ती तेथून निघून सिंधुनदीजवळ प्राप्त आला.

त्या नदीच्या तीरांवर असलेल्या उत्तरेकडील राजांना जिंकून, तो निधिपती रजतमय अशा विजयार्द्धपर्वताजवळ आला. त्या पर्वताचें रक्षण करणाऱ्या व्यंतरदेवांच्या विजयार्द्धराजानें भरतास तीर्थोदकानें अभिषेक करून रत्नाची झारी, छत्र, उत्कृष्ट चवऱ्या आदि पदार्थ अर्पण केले. याप्रमाणें विजयार्द्धपर्वत जिंकल्याबरोबर, संपूर्ण दक्षिणभारत जिंकिलें असें जाणून त्यानें चक्ररत्नाची पूजा केली. नंतर त्यानें सिंधुनदी व गंगानदी ह्या दोहोंच्या मध्यभागीं असलेल्या अनेक राजांचा पराभव करून, विजयार्द्धपर्वताच्या उत्तरेकडील प्रदेश जिंकण्याची तयारी केली. ज्याप्रमाणें श्रीजिनाच्या जन्मोत्सवाच्यावेळीं स्वर्गांतील देवांच्या सैन्यांनीं मेरुपर्वत व्यापिला होता, त्याप्रमाणें विजयार्द्धपर्वत भरताच्या सहा प्रकारच्या सैन्यांनीं ( हत्ती, घोडे, रथ, पायदळ, विद्याधर व त्यांसह असलेले देव ) व्यापिला. इतक्यांत कृतमाल नांवाचा एक देव तेथें येऊन भरतास नम्रतेनें म्हणाला, "प्रभो, मी ह्या विजयार्द्धपर्वताचें खरें स्वरूप जाणणारा कृतमाल नांवाचा व्यंतरदेव आहे. मला आपल्या ताब्यांत घ्या. म्हणजे हा मोठा पर्वत आपलाच झाला. सर्व द्वीपें व समुद्रांचें-सर्व मंडल ह्यांत मला न समजणारा असा कोणताच पदार्थ नाहीं. मी आपला सेवक आहे." नंतर त्यानें भरताला त्या विजयार्द्ध पर्वताच्या गुहेच्या द्वारांत प्रवेश करण्यांची युक्ती सांगितली. तात्काल भरतानें सेनापतीला 'तूं पश्चिमेकडील खंड जिंकण्यास जा.' असा हुकूम केला. त्याप्रमाणें तो सेनापति विजयार्द्ध पर्वतावरील प्रदेशावर चढून गुहेच्याजवळ आला. व

'भरतचक्रवर्ती विजयी होवो !' असें ह्मणून त्यानें त्या गुहेच्या द्वारांवर दंडरत्नाचा प्रहार केला. त्याबरोबर तीं दोन्ही दारें उघडल्यामुळें एक मोठा आवाज झाला. व आंतील भागांतून प्रखर उष्मा बाहेर आला. नंतर त्या सेनापतीनें सिंधूनदीच्या पश्चिमेकडील वेदिका ओलांडून, अनेक धातूच्या खाणीं, मोठीं शहरें इत्यादिकानीं सुशोभित अशा त्या देशांत प्रवेश केला. त्या शूर सेनापतीनें म्लेंच्छराजांचा पराभव करून त्यांच्याकडून भरताचें सार्वभौमत्व कबूल करविलें. ह्याप्रमाणें धर्मकार्याला अयोग्य असा तो प्रदेश संपादन करून, सेनापती पुन: आपल्या छावणीला परत आला. असो. भरतानें पुण्यकर्मोदयामुळें फक्त एका दंडानेंच विजयार्द्धपर्वताजवळच्या प्रदेशाचें रक्षण करणाऱ्या राजांना जिंकिलें. खरोखर, 'जयःपुण्यादृते कुतः।' ह्मणजे, पुण्यावांचून जय कोठून प्राप्त होणार!

---

## पर्व ३२ वें.

### भरतोत्तरार्द्धविजयवर्णन.

पूर्वखंडाप्रमाणेंच पश्चिमेकडील खंडही सेनापतीनें मिळ-

---

टीपः– १ धर्मकर्मबहिर्भूता इत्यमी म्लेच्छका मताः।
अन्यथाऽन्यैः समाचारैरार्यावर्तेन ते समाः॥

ह्मणजे, अहिंसा वगैरे धर्म व सदाचार ह्यापासून भ्रष्ट झालेले ह्मणून हे म्लेंच्छ होत. नाहींतर ते वाकींच्या विवाहादि आचारानीं, आर्यावर्तांतील लोकांशीं सदृशच आहेत.

विलें असतां मध्यम खंड जिंकण्याकरितां भरत निघाला. व कित्येक मुक्काम गेल्यावर, तो सार्वभौम राजा उत्तरेकडील गुहेच्या द्वाराजवळ प्राप्त झाला. इतक्यांत, चिलात व आवर्त नांवाच्या दोघां म्लेंच्छराजांनीं शत्रूसैन्यानें आपला पराभव केला असें ऐकिलें. व त्यांनीं एकत्र होऊन उलट भरताशीं युद्ध करण्याचें योजिलें. तेव्हां राज्यांतील विचारी व वयोवृद्ध मंत्री त्यांना ह्मणाले:—

न किञ्चिदप्यनालोच्य विधेयं सिद्धिकाम्यता ।
अनालोचितकार्याणां दवीयस्योऽर्थसिद्धयः ॥

अर्थः—महाराज, फलेच्छा करणाऱ्यानें कोणतेंही कार्य विचार न करितां करूं नये. कारण, अविचारानें केलेल्या कार्यांच्या फलप्राप्ती (त्याला सोडून) फार दूर राहतात. विजयार्द्धपर्वत उल्लंघन करणारा हा सामान्य मनुष्य नव्हे. ह्मणून, त्याच्याशीं युद्ध करण्याचा विचार सोडून देऊन तुह्मी किल्लयांत राहवें हेंच युक्त आहे. शिवाय, नागमुखा व मेघमुखा नांवाच्या आपल्या कुलदेवता शत्रूला प्रतिबंध करितील. " मंत्र्यांची ही पोक्तपणाची सल्ला ऐकून त्या राजांनीं आपल्या कुलदेवतांचें स्मरण केलें. तात्काल मेघमुख व नागमुख देवता भरताच्या सैन्याभोंवती जलवृष्टी करूं लागल्या. परंतु आश्चर्य हें कीं, भरताच्या छावणींत मुळींच वृष्टी झाली नाहीं! उलट, भरतानें आज्ञा केलेल्या गणबद्ध नांवाच्या देवांनीं वृष्टी करणाऱ्या त्या नागदेवांस हांकून दिलें. याप्रमाणें तें नागदेवाचें सैन्य पराभूत झालें असतां, ते दोघे म्लेंच्छराजे भरतास शरण आले. नंतर भरतानें

प्रसंगीं ज्यानें सर्व भूमंडल व्यापिलें असा शूर, पवित्र व उदारबुद्धि श्रीनाभिराजाचा नातू-श्रीऋषभराजाचा पुत्र-सहा खंडांनीं युक्त असलेल्या सर्व पृथ्वीचें पालन करणारा हा भरतराजा लक्ष्मी गमनशील ( जाणारी ) आहे असें समजून, ह्या पर्वतावर जगांत पसरणारी कीर्ति ठेवितां झाला." इत्यादि. ह्याप्रमाणें भरतानें स्वतः आपली प्रशस्ति लिहिली. त्यावेळीं देवांनीं पुष्पांजलि फेंकून त्याचा जयजयकार केला. नंतर आपला दिग्विजय पूर्ण करण्याकरितां तो गंगा पडते त्या स्थलाजवळ गेला. तेथें गंगादेवीनें त्याला सिंहासनावर बसवून सुखकर, शीतल व स्वच्छ अशा गंगोदकानें अभिषेक केला. व 'तूं चिरायु हो. तुझा जयजयकार होवो!' असा आशीर्वाद देऊन ती गुप्त झाली. याप्रमाणें उत्तरेकडील भरतखंडाची सर्व भूमि ताब्यांत घेऊन, त्या विजयी राजानें विजयार्द्धपर्वताजवळच्या प्रदेशात तळ दिला, आणि सेनापतीला पूर्वखंड जिंकण्यास पाठविलें. या अवधींत दक्षिणेकडच्या व उत्तरेकडच्या श्रेणीवर राहणारे देव विद्याधरराजांसह प्रभूच्या दर्शनास त्याठिकाणीं आले. त्यात नमि आणि विनमि हे विद्याधर राजेही होते. श्रीमान् भरतानें नमि नामक गंधर्वराजाची वहीण जी सुभद्रा तिच्याशीं विवाह केला. इतक्यांत, म्लेंछराजाचा पराभव करून भरताचा सेनापति परत आला. नंतर भरत दक्षिणेकडील प्रदेशावर जाण्याकरितां तयार झाला. तात्काल भरताच्या सैन्यानें त्या तामिस्रा नावाच्या गुहेंत प्रवेश केला. त्या गुहाद्वारांत नाट्यमाल नांवाच्या देवानें भर-

ताची पूजा करून त्याचा चांगला सत्कार केला.' भरतानें ही नाट्यमालदेवाचा योग्य तो गौरव केला. याप्रमाणें त्या राजराजेश्वरानें पट्खंडपृथ्वी जिंकिली.

## पर्व ३३ वें.

### भरतराजकैलासाभिगमनवर्णन.

नंतर ज्यानें सर्व राजे, विद्याधर व देव यांना नम्र केले आहे, व ज्याला दिग्विजय सिद्ध झालेला आहे असा चक्रायुधधारी भरत आपल्या नगरीला जाण्यास परतला. ह्या राजाला नऊ निधी व चवदा रत्नें मिळालीं; आणि सहा खंडानी युक्त असलेल्या पृथ्वीवरील राजे व विद्याधर हे ही त्याच्या ताब्यांत आले. क्षारसमुद्रानें वेढलेली ही सर्व पृथ्वी जिंकून, तो चक्रवर्ती परत जात असता त्याचें सैन्य कैलासपर्वताजवळ आले. त्या पर्वताजवळच्या प्रदेशांत सैन्य, रथ वगैरे परिवार ठेऊन भरत श्रीजिनेंद्रपूजा करण्याकरितां वर पायींच गेला. सौधर्मेंद्राच्या मागून ज्याप्रमाणें देव जातात त्याप्रमाणें या सार्वभौमराजाच्या मागून अनेक राजे जिनपूजेकरितां गेले. पायानींच कैलासावर चढणाऱ्या आमच्या या राजास थोडा देखील खेद झाला नाहीं. कारण, 'हितार्थिनां हि खेदाय नात्मनीनः क्रियाविधिः।' ह्मणजे, हितेच्छुजनाना आत्मसुखाकरिता केलेल्या कर्मांपासून मुळींच खेद होत नाहीं. थोड्याशा अंतरावर चढून भरत त्या पर्वताची अनुपमेय शोभा अवलोकन करितां

असतां त्याचा उपाध्याय ह्मणाला, "हे राजा, सर्व चराचराचा गुरु जो आदिजिनेंद्र तो ह्या कैलास पर्वतावर राहतो. आणि ह्यामुळेंच सर्व जगाचा अतिक्रम करणारें असें विलक्षण सामर्थ्य ह्या पर्वताला प्राप्त झालें आहे. हरिणांच्या कळपानें गजबजलेलें हें अरण्य मुनींद्रांच्या स्वाध्यायघोषानें अत्यंत रमणीय वाटतें. हा पर्वत नेहमीं शांत असा असून श्रीजिनेंद्राच्या सान्निध्यानें ह्यावेळीं आणखी अधिकच शांत व रम्य भासतो. ह्या अरण्यांत पशुपक्षी देखील आपापसांतील वैरभाव सोडून एकेठिकाणीं राहिलें आहेत. सिंह, व्याघ्र वगैरे हिंस्र पशूंसह हा मुनिसमूह निर्भयपणें ह्या पर्वतावर हिंडत आहे. हे प्रभो, हा निर्मल असा कैलास पर्वत तुझें कल्याण करो!" ह्याप्रमाणें पुरोहित त्या पर्वताचें वर्णन करीत असतां, भरत श्रीजिनाच्या समवसरणाजवळ आला. चक्रवर्तीनें प्रथम मानस्तंभाची पूजा केली. नंतर त्यानें ज्यांवर जिनांच्या अनेक प्रतिमा आहेत अशा चैत्यवृक्षांस वंदन केलें. पुढें त्यानें देवांगनांचें नृत्य पाहून त्यांचें सुस्वर व मधुर गायन ऐकिलें. नंतर त्यानें कल्पवृक्षांचा अरण्यप्रदेश पाहिला. व तेथील सिद्धांच्या बिंबांनीं अधिष्ठित अशा सिद्धार्थवृक्षांस प्रदक्षिणा घालून त्यानें त्यांची पूजा केली. तेथून पुढें देवांस राहण्याकरितां केलेले सुशोभित व भव्य प्रासाद आणि चोहोंकडून जिनबिंबांनीं व्याप्त असे रत्नमय स्तूप होते. त्या स्तूपाची पूजा करून त्यानें स्वच्छ अशा स्फटिकानें तयार केलेलें असें प्राकस्वलय तटाचें वर्तुल पाहिलें, त्याठिकाणीं महाद्वाराचें रक्षण करणाऱ्या कल्पवासी देवांनीं आंत

जाण्यास भरताला परवानगी दिल्यानंतर, त्यानें सभेंत प्रवेश केला. चोंहीकडे एक एक योजन लांबीची व तितक्याच रुंदीची ज्याची रचना ,आहे असा सुंदर व अनुपम श्रीमंडप असून त्यांत इंद्र, ज्ञानी मुनी, आर्यिका, राजे व राजस्त्रिया, देवांगना, व पशु बसले होते. भरतानें श्रीमंडपास तीन प्रदक्षिणा घातल्या. नंतर ज्याला तीन मेखला ( कट्टे ) आहेत अशा पीठाच्या पहिल्या मेखलेवर उभा राहून, त्या चक्रवर्तीनें यक्षेंद्रांनीं आपल्या मस्तकावर धरलेल्या व चार दिशेस असलेल्या चार धर्मचक्रांची मोठ्या संतोषानें पूजा केली. नंतर त्यानें दुसऱ्या मेखलेवर चक्र, हत्ती, वृषभ, कमल, सिंह, माला, वस्त्र व गरुड ह्या चिन्हांनीं युक्त असलेल्या आठ दिशेच्या आठ महाध्वजांचें पूजन केलें. मग चक्रवर्ती भरतानें तिसऱ्या मेखलेवरील सुशोभित गंधकुटीवर सुखासनानें विराजमान झालेल्या जगद्गुरु श्रीवृषभदेवाचें नम्र होऊन दर्शन घेतलें. व मोक्षफलेच्छेनें जलगंधादि द्रव्यांच्या योगानें यथाविधि प्रभूची पूजा करून त्यानें स्तुतीस आरंभ केला:— "हे प्रभो, मी स्तुति करण्यास असमर्थ असतांही तुझ्या प्रबलभक्तीनें, परमात्मा ( परम ह्मणजे घातिकर्मांचा ज्यानें नाश केला आहे असा आत्मा ) अनंतगुणी आणि अच्युत ( स्वरूपस्थितीपासून केव्हांही न ढळणाऱ्या ) अशा तुझी स्तुति करितो. हे विभो, ज्यावेळीं तुझें केवल नांवाचें हें उत्कृष्ट तेज उत्पन्न झालें त्यावेळीं तूं ह्या लोकालोकांस जाणिलेंस. हे स्वामिन्! सर्व विषयांसंबंधी तुझ्या वाणीचा शुद्धपणा ( खरा विषय समजून देणें हा धर्म ) व प्रभाव हा तुझ्या सर्वज्ञतेस प्रगट करीत आहे.

प्रवेश करीत नाहीं ! सर्व दिग्विजयाच्या प्रसंगीं पूर्व, दक्षिण व पश्चिम या तीन्हीं समुद्रांत व विजयार्द्धपर्वताच्या दोन्ही गुहांत ज्याच्या गतीस मुळींच प्रतिबंध झाला नाहीं असें हें चक्र ज्याअर्थी आतां आमच्या गृहाच्या अंगणांत अडखळतें, त्याअर्थी आह्मांस जिंकण्याची इच्छा करणारा असा कोणी तरी शत्रू असला पाहिजे. किंवा, या आमच्या देशांतच आह्मांस अजिंक्य असा कोणी आमचा गोत्रज पुरुष आह्मांबरोबर द्वेष करित असला पाहिजे. कोणातरी दुष्टाला आमचा हा उत्कर्ष पाहवत नसावा. कारण, 'प्रायः स्खलंति चेतांसि महत्स्वपि दुरात्मनाम् ।' ह्मणजे, बहुतकरून दुष्ट लोकांचीं मनें महात्म्यांविषयीं देखील मत्सर करीत असतात. नीतिकार ह्मणतातः—

विमत्सराणि चेतांसि महतां परवृद्धिषु ।
मत्सरीणि तु तान्येव क्षुद्राणामन्यवृद्धिषु ॥
खलूपेक्ष्य लघीयानप्युच्छेद्यो लघुतादृशः ।
क्षुद्रो रेणुरिवाक्षिस्थो रुजत्यरिरुपेक्षितः ॥
बलादुद्धरणीयो हि क्षोदीयानपि कण्टकः ।
अनुद्धृतः पदस्थोऽसौ भवेत्पीडाकरो भृशम् ॥

**अर्थः—** महात्म्यांचीं अंतःकरणें परोत्कर्षाविषयीं मत्सररहित असतात. व तींच क्षुद्र लोकांचीं अंतःकरणें दुसऱ्यांच्या उत्कर्षाविषयीं मत्सर करणारीं असतात. अगदीं तुच्छ अशाही शत्रूची उपेक्षा करूं नये. तुच्छ असून द्वेष करणारा असल्यास त्याचा नाश अवश्य केला पाहिजे. कारण, तो क्षुद्रशत्रूही डोळ्यांत शिरलेल्या क्षुद्र रेतीच्या कणाप्रमाणें

उपेक्षा केला असतां पीडा करितो. अगदीं बारीक असा देखील कांटा जोरानें उपडून काढला पाहिजे. कारण, तो न काढत पायांत राहिला असतां, अत्यंत पीडा करणारा होतो. पुरोहिता, हें देवाचें सुप्रसिद्ध चक्र सर्व रत्नामध्यें श्रेष्ठ आहे. ह्मणून, ह्याच्या गमनाला कारणावांचून प्रतिबंध व्हावयाचा नाहीं. तेव्हां ह्याचें कारण काय तें सांग." राजानें हें भाषण ऐकून पुरोहित ह्मणाला, " हे राजा, दिशांचा जय होणें कांहीं अवशिष्ट राहिलें असतां चक्राला विश्रांति प्राप्त होत नाहीं, असें त्रिकालज्ञ मुनींचें सांगणें आह्मीं ऐकिलें आहे. तुला जिंकण्यास योग्य असा कोणी एक शत्रुपक्ष असून तो तुझ्या गृहातच वाढत आहे. प्रभो, तूं हें बाह्य मंडल सर्व जिंकिलें आहेस. परंतु अद्यापि अंतर्मंडलाची शुद्धि अनुकूलता थोडी देखील झाली नाहीं. तुझे बंधु नम्र झाले नाहींत; ते तुझे सजातीयच तुझ्या नाशाकरिता तयार झाले असावेत. बलवान् आणि मानी असे तुझे हे बंधु दुसऱ्यास अजिंक्य आहेत; व त्यामध्यें धाकटा धैर्यशाली बाहुबली सर्वांत प्रमुख आहे. तुझे हे नव्याण्णव बंधु पराक्रमी आहेत. व भगवान् आदिगुरु अशा श्रीवृषभावांचून दुसऱ्यास आह्मीं नमस्कार करणार नाहीं असा त्यांनीं दृढ निश्चय केला आहे. ह्मणून, हे सार्वभौमराजा! आगमकारानीं काय सांगितलें आहे तें ऐक. ध्याचा

विबलोऽपि सजातीयो लब्ध्वा तीक्ष्णं प्रतिष्कावे जिंकिलें
दण्डः परश्वधस्येव निर्वहयति पार्थिवम् ॥ जिंकिला गेला
तदत्र प्रतिकर्त्तव्यमाशु चक्रधर त्वया क्रोधाला प्रथम जि-
ष्णुणव्रणाग्निशत्रूणां शेषं नोपेक्षते दुर्मार्गाचें अवलंब करीत

आहेत. परंतु तुझ्या ठिकाणीं तसलें अज्ञान राहणें मुळींच योग्य नाहीं. कारण, क्रोधी पुरुषाविषयीं आगमकारांनीं ह्मटलें आहे.—

क्रोधांधतमसे मग्नं यो नात्मान समुद्धरेत् ।
स कृत्यसंशयद्वैधान्नोत्तरीतुमलन्तराम् ॥
किं तरां स विजानाति कार्याकार्यमनात्मवित् ।
यः स्वान्तःप्रभवान्जेतुमरीन्न प्रभवेत्प्रभुः ॥

अर्थः—जो क्रोधरूपी अंधकारांत बुडालेल्या स्वतःस बाहेर काढीत नाहीं, तो कार्याविषयींच्या संशयाच्या द्वैधीभावापासून तरून जाण्यास अगदीं समर्थ असत नाहीं. जो आपल्या अंतःकरणापासून उत्पन्न होणाऱ्या शत्रूस–क्रोधास–जिंकण्यास समर्थ नाहीं, त्या अविचारी पुरुषाला कार्य कोणतें व अकार्य कोणतें यांतील काहीं तरी भेद समजतो काय? ह्मणून हे दीर्घायु राजा, तूं शांत हो. कारण, संयमी पुरुष क्षमेनेंच सर्वांस जिंकितात. आचार्य क्षमेविषयीं ह्मणतात:—

विजितेंद्रियवर्गाणां सुश्रुतश्रुतसंपदाम् ।
परलोकजिगीषूणां क्षमा साधनमुत्तमम् ॥

अर्थः— जे जितेंद्रिय आहेत व ज्यांची शास्त्ररूपी संपत्ति निःसंशय आहे अशा परलोकास जिंकण्याची इच्छा करणाऱ्या जीवांना क्षमा हें एक उत्तम साधन आहे. ह्मणून, पत्र पाठवून व्हावयाच्या कार्याविषयीं अधिक श्रम घेणें व्यर्थ आहेत; 'तृणांकुरे नखच्छेद्ये कः परश्वधमुद्धरेत् ।' ह्मणजे, नखानें तोडण्यास योग्य अशा तृणांकुराविषयीं कुऱ्हाड कोण उचलील?

पाठवावा कीं, "महाराज! आपण येऊन भरताची सेवा करावी. त्यांची सेवा कल्पवृक्षाच्या सेवेप्रमाणें इष्टफल देणारी आहे. तुह्मांस गुरु (पित्या) प्रमाणें असलेला तुमचा ज्येष्ठ भ्राता भरत सर्व प्रकारें सत्कार करण्यास योग्य आहे. तुमच्यावांचून असलेलें हें साम्राज्य त्याच्या संतोपास वाढवित नाहीं. कारण, चांगल्या बंधूस आपल्या इतर बंधूवर्गासह उपभोगिलेलें राज्य संतोप देतें." याप्रमाणें त्यांच्याकडे पत्र व भेटीचे पदार्थ पाठवावेत. महाराज! असें सलोख्याचें वर्तन ठेवणें हेंच ज्येष्ठ बंधूच्या कीर्तीस व कल्याणास कारण आहे. कारण, या जगांत यश हें चिरस्थायी आहे; व संपत्ति ही क्षणभंगुर आहे." पुरोहिताचें हें भाषण ऐकून भरतचक्रवर्ती शांत झाला. '**अनुवर्तनसाध्या हि महतां चित्तवृत्तयः**' ह्मणजे थोर लोकांच्या चित्तवृत्ति त्यांच्या इच्छेप्रमाणें वागण्यानें वळवितां येतात. त्याप्रमाणें प्रथम, भरतानें पराक्रमी अशा बाहुबलीखेरीज आपल्या बाकीच्या बंधूंकडे दूत पाठविले. त्यांनीं योग्य प्रदेशीं जाऊन भरताचा निरोप त्यांना कळविला. तेव्हां, राजेपणाच्या गर्वानें मत्त झालेले ते कुमार जासुदांना ह्मणाले:– "**गुरोरसन्निधौ पूज्यो ज्यायान् भ्राताऽनुजैरिति।** ह्मणजे पिता जवळ नसतांना ज्येष्ठ बंधूच लहान बंधूंना पूज्य आहे हें जगदीं खरें आहे. परंतु, आम्हीं

आह्मी फार तुष्ट झालों आहोंत." याप्रमाणें उत्तर लिहून देऊन, त्या कुमारांनीं दूतांना परत पाठविले. नंतर ते कुमार पूज्य पित्याला विचारून काय तें करावयाचें असा निश्चय करून, कैलासपर्वतावर गेले. तेथें त्या जगद्गुरूस अभिवंदन करून विनंतिरूपानें ह्मणाले, "हे प्रभो, आह्मीं तुझ्या पोटीं जन्म घेतला आहे. हें असाधारण ऐश्वर्य व ही संपत्ति हीं तुझ्यापासूनच आह्मीं मिळविलीं. ह्मणून फक्त तुझ्याच कृपेची इच्छा करणारे असे आह्मी तुझ्यावांचून दुसऱ्यांस नमस्कार करणार नाहीं. असें असतां, भरत आह्मांला आपल्याला नमस्कार करण्याकरितां बोलावण्याची इच्छा करीत आहे. याचें कारण त्याचा गर्व किंवा आम्हांविषयींचा द्वेष आहे हें कांहीं आम्हांला समजत नाहीं. भगवन्, तुम्हास नमस्कार करण्याविषयींच्या अभ्यासानें उत्पन्न होणाऱ्या आनंदाच्या स्वाधीन झालेलें आमचें मस्तक अनायास नमस्कार करण्यास इह परलोकीं तयार होणार नाहीं. ह्मणून, दुसऱ्यास नमस्कार करण्यापासून पराङ्मुख करणारी अशी वीरपुरुषांची दीक्षा घेण्याकरितां आह्मीं तुझ्याजवळ प्राप्त झालों आहोंत; अर्थात् आह्मीं सर्व युद्ध करण्याविषयीं तुझी आज्ञा मागत आहोंत. एतावता हे प्रभो, हितकर व पथ्यकर असा मार्ग आह्मास सांग. अनायास नमस्कार केल्यानें होणाऱ्या मानभंगाची भीति ज्यांत मुळींच नाहीं अशा मार्गाचें प्रत्येक जन्मीं आह्मीं अवलंबन करूं. ज्याच्या योगानें आह्मीं इहपरलोकीं तुझ्या भक्तीचेच दास होऊं असा मार्ग तूं आह्मास कथन कर." कुमारांचें हें

ऐकून भगवान् श्रीवृषभदेवानें त्यांना असा उपदेश केलाः—

भद्र कुमारहो! गजाप्रमाणें मानी, देहानें बळकट, तारुण्यधैर्यादि गुणांनीं युक्त असे तुह्मी दुसऱ्याचे ताबेदार कसें व्हाल? नाशवंत असें राज्य, चंचल असें जीवित व तारुण्याचा गर्व ह्यांचा काय बरें उपयोग? तसेंच, तुह्मी ज्याचा उपभोग घेतला नाहीं असा कोणता तरी एखादा विषय आहे काय? ज्यांत शस्त्रें हेंच मित्र, पुत्र बंधु वगैरे मंडळींच शत्रू व सर्वांस उपभोग करण्यास योग्य अशी पृथ्वी ही स्त्री आहे अशा राज्यास धिक्कार असो! कुमारहो, जोंपर्यंत भरताचा पुण्योदय असेल तोंपर्यंत त्या नृपशार्दूल अशा राजाधिराजाला या भूमीचा उपभोग घेऊं द्या. त्याला देखील हें नश्वर राज्य केव्हांतरीं टाकावें लागेलच! मग अशा ह्या अशाश्वत राज्याकरितां तुह्मी व्यर्थ कां बरें युद्ध करितां? तर आतां ही स्पर्धा पुरे! तुह्मी धर्मरूपी महावृक्षाचें दयारूपी पुष्प धारण करा. हें पुष्प मुक्तिरूपी महाफलास देणारें आहे. ज्यांत दीक्षा हीच रक्षण करणारी व दया हीच प्राणप्रिया आहे असें हें तपश्चर्यारूपी राज्य त्या नश्वर राज्यापेक्षां अत्यंत श्लाघ्य व श्रेष्ठ आहे. हें तप महामानी असलेल्या तुमच्या अभिमानाचें रक्षण करणारें आहे." याप्रमाणें प्रभूचें वचन श्रवण करून, ज्यांना वैराग्य उत्पन्न झालें आहे असे ते कुमार महामात्राज्यदीक्षा घेऊन घर सोडून—संसाराचा त्याग करून—वनांत गेले. कुमारांनीं सर्वपरिग्रहांचा त्याग केला; व ते सामायिकादि सदाचारांत तल्लीन झाले. वैराग्याच्या परमावधीस प्राप्त झालेल्या व राज्यलक्ष्मीविषयीं निरिच्छ असलेल्या त्या राजपुत्रांनीं तपोलक्ष्मीस आपल्या स्वाधीन करून घेतलें. त्यांनीं

बारा अंगानें युक्त असलेल्या श्रुतस्कंधाचें अध्ययन करून, उत्कृष्ट अशा तपश्चर्येच्या संस्कारानें आपल्या आत्म्यास सुशोभित केलें. ' स्वाध्यायेन मनोरोधस्ततोऽक्षाणां विनिर्जयः । ' ह्मणजे, स्वाध्यायानें अंतःकरणाचें नियमन होतें व त्यापासून इंद्रिय-निग्रह होतो असें जाणून, ते स्वाध्यायांत रत झाले. ज्यांनीं संपूर्ण शास्त्रार्थाचें श्रवण केलें आहे असे ते कुमार शास्त्रार्थाच्या उत्कृष्ट परिशीलनामुळें तपश्चर्येत शुद्धता ठेवूं लागले. उन्हाळा, पावसाळा व हिंवाळा ह्या तिन्ही कालांत योगाचा आश्रय करून त्या धैर्यशाली कुमारांनीं शारीरिक व आध्यात्मिक असें दोन्ही प्रकारचें तप पुष्कळ काळपर्यंत केलें. मनुष्यांचें जीवित हें पाण्यावरील फेंस, लाटा, दहिंवर किंवा संध्याकाळचे ढग ह्या-प्रमाणें चंचल आहे असें मानून ते राजपुत्र अविनाशी अशा मोक्षमार्गावर व श्रीजिनोक्त शास्त्रांवर मनवचनकायेनें दृढ भक्ति करूं लागले. आस्रवाच्या प्रतिबंधामुळें अंतःकरणशुद्धि होऊन शुद्ध झालेले ते कुमार दुर्लभ अशा महाव्रतभावना भावूं लागले. त्यांनीं अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व परिग्रहत्याग हीं पांच व रात्रिभोजनत्याग हें एक, अशीं सहा व्रतें याव-ज्जीवपर्यंत धारण केलीं. ते राजर्षि शुद्ध अशा एकांतांत वास करणारे असल्यानें खेड्यांत एकच दिवस राहत असत; व मोठ्या नगरांत पांच दिवसापेक्षां अधिक राहत नसत. ते सिंह-व्याघ्रादि हिंस्र पशूंनीं सेविलेल्या अरण्यांत ही निर्भयपणें ध्यान करीत असत. स्वाध्याय करण्यांत पटूत्व मेळेले, सूत्रांच्या अर्थाचा विचार करण्याविषयीं प्रयत्न करणारे व केव्हां पर्यंकासनानें

बसलेले तर केव्हां वीरासन घालून बसलेले ते कुमार रात्रीं झोंप घेत नव्हते. हस्त हेंच त्यांचें पात्र असे. ते यति मुक्तीला साधनीभूत असलेल्या सन्मार्गाचा सर्वदा विचार करीत सर्वत्र पृथ्वीवर विहार करित होते. ते प्राणधारणाकरितां अवश्य इतकाच शुद्ध आहार करित असत; आणि प्राण देखील फक्त धर्माचरणाकरितांच धारण करीत होते. सर्वत्र ज्यांची दृष्टि समतेला पावली आहे असे ते राजर्षि स्तुति, निंदा, सुख, दुःख तसेंच मान व अपमान ह्या सर्वांस सारखेच लेखीत असत. मौनव्रताची प्रतिज्ञा करून ते मुनि भिक्षाटनास निघत असत. तपरूपी अग्नीच्या तापानें त्यांची देहकांति फार उत्कृष्ट झाली. तसेंच त्यांचा अंतरात्माही अत्यंत शुद्ध झाला. योगापासून उत्पन्न होणाऱ्या अणिमादि गुणांच्या ऋद्धिरूपी सिद्धि त्यांना प्रगट झाल्या. सारांश, त्या राजर्षींनीं जितकी म्हणून धर्मक्रिया होती, तितकी सर्व भंग न होऊं देतां स्वाधीन करून घेतली. ह्याप्रमाणें पुराणपुरुष अशा श्रीवृषभापासून ज्ञान मिळवून, त्यानें सांगितलेलें शास्त्ररूपी मानससरोवर ज्यांना प्रिय आहे असे राजहंसच कीं काय, अशा त्या राजकुमारांनीं राज्यभूमीचा त्याग करून परम स्तुत्य अशी दिगंबरयतिदीक्षा धारण केली. श्री वृषभदेवाशिवाय इतर अनाप्तास आह्मीं नमस्कार करणार नाहीं असा निश्चय करणारे व पुरुवंशांत उत्पन्न झालेले ते धैर्यशाली मुनिश्रेष्ठ राजकुमार आमच्या पातकाचा नाश करोत !

# पर्व ३५ वें.

## कुमारबाहुबलिरणोद्योगवर्णन.

इकडे, भरतराजाचें अंत:करण तरुण बाहुबलीविषयीं थोडें चिंताकुल झालें. तो स्वत:शींच ह्मणाला, " अहो, आह्मी शंभर भ्राते अवध्य आहोंत अशी माझ्या बंधुवर्गाची समजूत असल्यामुळें, ते मजपुढें नम्र होण्याविषयीं विन्मुख होऊन शत्रुत्वास प्राप्त झाले आहेत. आमच्यासारख्यास घरातील बंधुवर्ग उर्मटपणानें वागू लागला असतां जसा खेद होतो, तसा शत्रु नम्र झाला नसता होत नाहीं. आश्चर्याची गोष्ट ही कीं, बाहुबली हा शहाणा व विनीत असून ही तो आमच्याविषयीं कसा बरें प्रतिकूल झाला ? त्या बलवान्, मानी व राजनीतिपटु बाहुबलीला कसें प्रसन्न करून घ्यावें! बंधुत्वाच्या कपटानें ज्यानें आपल्या अंत:करणातील द्वेष गुप्त ठेविला आहे असा तो भुजबली घरात पेटलेल्या अग्नीप्रमाणें संपूर्ण कुल जाळून टाकील. कारण, अंतस्थ नातलगाचा क्रोध राजाच्या नाशास कारण होतो. ह्मणून, हरतऱ्हेनें बाहुबलीस शांत केला पाहिजे; तसें झालें तरच आमची शांति होणार आहे." असा विचार करून भरतानें हुषार व कार्यज्ञ अशा दूताला बाहुबलीकडे पाठविलें. थोड्याच दिवसानीं तो दूत बाहुबलीच्या पोदन नामक नगरास पोंहचला. बाहुबलीनें आपल्याकडे आलेल्या त्या दूताचा योग्य तो सत्कार केला. नंतर तो कुमार दूताला ह्मणाला, " चाणाक्षा, आज पुष्कळ दिवसानीं भरताला आमची आठवण झाली!

पृथ्वीपति असल्यामुळें त्याला पुष्कळांचें स्मरण करावें लागतें अस्तु. चक्रवर्ती भरताचें कुशल आहेना? सर्व दिशा व सर्व राजे त्यानें जिंकिले असें आह्मीं ऐकिलें. आतां, त्याला करावयाचें कांहीं बाकी राहिलें आहे काय?" हें ऐकून दूत ह्मणालाः—

"हे कुमारा, भरतप्रभूनें जें सांगितलें आहे, तें चांगलें असो अथवा वाईट असो, सांगणाऱ्याच्या महत्वास्तव तूं स्वीकारिलें पाहिजे. राजा, 'गुरोर्वचनमादेयमविकल्प्येति या श्रुतिः।' ह्मणजे, वाडिलाची आज्ञा विचार न करितां ग्रहण करावी असें शास्त्र आहे. करिता, भरताची आज्ञा तूं मानिली पाहिजे. इक्ष्वाकूवंशात उत्पन्न झालेला व सर्व राजांत पहिला असा भरतराजा तुझा वडील बंधु आहे. ज्यानें सर्व दिशा जिंकून, राजे, देव, दैत्य व गंधर्व यांना नम्र करून आपलें चक्रवर्तित्व प्रसिद्ध केलें आहे तो जगन्मान्य भरत ह्मणतो कीं, हें माझें राज्य माझा प्रियबंधु जो बाहुबली त्याच्यावांचून शोभत नाहीं. आपलें सुख व उत्कर्ष हीं ज्याचेठिकाणीं विभागलेलीं आहेत अशा बंधूसहवर्तमान जो संपत्तीचा आणि ऐश्वर्याचा उपभोग घेतो तोच खरा बंधु होय. शिवाय कुमारा, तूं भरतास नमस्कार करण्याविषयीं नाकबूल झाला असता, त्यास आपलें चक्रवर्तित्व बरें वाटत नाहीं. ह्मणून, त्याला नमस्कार करून तूं त्याचा सत्कार कर. त्याची आज्ञा उल्लंघन करणाऱ्या शत्रूंस हें विजयी चक्र दंड करणारें आहे. याकरितां, तू प्रभूची इच्छा लौकर पूर्ण कर. तुमच्या दोघांच्या एकीमुळें सर्व जग एकत्र राहो!" हें ऐकून बाहुबलि कुमार दूताला ह्मणाला.—

# पर्व ३५ वें.

## कुमारबाहुबलिरणोद्योगवर्णन.

इकडे, भरतराजाचें अंतःकरण तरुण बाहुबलीविषयीं थोडें चिंताकुल झालें. तो स्वतःशींच ह्मणाला, " अहो, आह्मी शंभर भ्राते अवध्य आहोंत अशी माझ्या बंधुवर्गाची समजूत असल्यामुळें, ते मजपुढें नम्र होण्याविषयीं विन्मुख होऊन शत्रुत्वास प्राप्त झाले आहेत. आमच्यासारख्यास घरांतील बंधुवर्ग उर्मटपणानें वागूं लागला असतां जसा खेद होतो, तसा शत्रु नम्र झाला नसतां होत नाहीं. आश्चर्याची गोष्ट ही कीं, बाहुबली हा शहाणा व विनीत असून ही तो आमच्याविषयीं कसा बरें प्रतिकूल झाला ? त्या बलवान्, मानी व राजनीतिपटु बाहुबलीला कसें प्रसन्न करून घ्यावें? बंधुत्वाच्या कपटानें ज्यानें आपल्या अंतःकरणातील द्वेष गुप्त ठेविला आहे असा तो भुजबली घरांत पेटलेल्या अग्नीप्रमाणें संपूर्ण कुल जाळून टाकील. कारण, अंतस्थ नातलगाचा क्रोध राजाच्या नाशास कारण होतो. ह्मणून, हरतऱ्हेनें बाहुबलीस शांत केला पाहिजे; तसें झालें तरच आमची शांति होणार आहे." असा विचार करून भरतानें हुषार व कार्यज्ञ अशा दूताला बाहुबलीकडे पाठविलें. थोड्याच दिवसांनीं तो दूत बाहुबलीच्या पोदन नामक नगरास पोंचला. बाहुबलीनें आपल्याकडे आलेल्या त्या दूताचा योग्य तो सत्कार केला. नंतर तो कुमार दूताला ह्मणाला, " बाबारे, आज पुष्कळ दिवसांनीं भरताला आमची आठवण झाली !

पृथ्वीपति असल्यामुळें त्याला पुष्कळांचें स्मरण करावें लागतें अस्तु. चक्रवर्ती भरताचें कुशल आहेना? सर्व दिशा व सर्व राजे त्यानें जिंकिले असें आह्मीं ऐकिलें. आतां, त्याला करावयाचें कांहीं बाकी राहिलें आहे काय ?" हें ऐकून दूत ह्मणालाः—

" हे कुमारा, भरतप्रभूनें जें सांगितलें आहे, तें चांगलें असो अथवा वाईट असो, सांगणाऱ्याच्या महत्वास्तव तूं स्वीकारिलें पाहिजे. राजा, ' **गुरोर्वचनमादेयमविकल्प्येति या श्रुतिः।**' ह्मणजे, वाडिलांची आज्ञा विचार न करितां ग्रहण करावी असें शास्त्र आहे. करितां, भरताची आज्ञा तूं मानिली पाहिजे. इक्ष्वाकूवंशांत उत्पन्न झालेला व सर्व राजांत पहिला असा भरतराजा तुझा वडील बंधु आहे. ज्यानें सर्व दिशा जिंकून, राजे, देव, दैत्य व गंधर्व यांना नम्र करून आपलें चक्रवर्तित्व प्रसिद्ध केलें आहे तो जगन्मान्य भरत ह्मणतो कीं, हें माझें राज्य माझा प्रियबंधु जो बाहुबली त्याच्यावांचून शोभत नाहीं. आपलें सुख व उत्कर्ष हीं ज्याचेठिकाणीं विभागलेलीं आहेत अशा बंधूंसहवर्तमान जो संपत्तीचा आणि ऐश्वर्याचा उपभोग घेतो तोच खरा बंधु होय. शिवाय कुमारा, तूं भरतास नमस्कार करण्याविषयीं नाकबूल झाला असतां, त्यास आपलें चक्रवर्तित्व बरें वाटत नाहीं. ह्मणून, त्याला नमस्कार करून तूं त्याचा सत्कार कर. त्याची आज्ञा उलंघन करणाऱ्या शत्रूंस हें विजयी चक्र दंड करणारें आहे. याकरितां, तूं प्रभूची इच्छा लौकर पूर्ण कर. तुमच्या दोघांच्या एकीमुळें सर्व जग एकत्र राहो!" हें ऐकून बाहुबलि कुमार दूताला ह्मणालाः—

दीनपणाची तर पराकाष्ठा झाली! सर्व राजांनीं रत्नराशींनी ज्याचें वजन केलें तो हा भरतराजा खचित तुलापुरुषच होय! कारण, ऐश्वर्य ह्मणून जें आहे तें असलें नसतें. जो आमच्या पित्यानें आह्मांस दिलेली भूमि आमच्या इच्छे-विरुद्ध हिसकावून घेण्याची इच्छा करितो, त्या तुझ्या लोभी प्रभूस धिक्कार असो! हे दूता, आह्मांस कुलपरंपरेनें प्राप्त झालेली व त्याला भ्रातृजायेप्रमाणें असलेली ही भूमि आपल्या ताब्यांत घेण्याची इच्छा करणाऱ्या तुझ्या राजास लज्जा वाटत नाहीं काय? स्वतंत्र मनुष्यानें आपली पत्नी व आपल्या बाहूनें संपा-दिलेली भूमि हीं सोडून दुसरी कोणतीही वस्तु कोणासही खुशाल द्यावी. ह्मणून, एकछत्री अशा ह्या भूतलाचा त्या एकट्या भरतराजाला तरी उपभोग घेऊं दे. किंवा मी तरी एकटाच ह्याचा उपभोग घेतो. दूता, शौर्यासंबंधानें व्यर्थ बडबड करून काय उपयोग आहे? युद्धरूपी कसोटीवर त्याच्या किंवा माझ्या पराक्रमाची स्पष्टता होईलच. युद्धांत आह्मा दोघांचें काय व्हाव-याचें असेल तें होवो. एतावता, तूं जाऊन आपल्या राजास लौकर युद्धास तयार कर." याप्रमाणें त्या दूताला निरोप देऊन त्याची रवानगी केली. नंतर कांहीं कालपर्यंत **भुजबली** राजाच्या सैन्यांत युद्धाची गडबड ऐकूं येऊं लागली. त्यावेळीं भुजबलीच्या सैन्यांतील वीर आपापसांत बोलूं लागलेः—

"आमच्या प्रभूनें केलेल्या आजपर्यंतच्या पालनपोषण वगैरे सत्कारांतून आह्मांस अनृणी होण्याची हीं अपूर्व संधि आज प्राप्त झाली आहे. खरोखर, राजे लोक कांहींतरी विशेष

प्रसंगाच्या उद्देशानें सेवकांचें पोषण करितात; व तो जर प्रसंग रक्षण केला नाहीं तर तृणवत् तुच्छ असलेल्या त्या माणसांचा काय उपयोग आहे? या युद्धांत हा नश्वर देह टाकून शाश्वत असें यशोधन मिळवावयाचें आहे. सारांश, हा रणोत्सव महाफल देणारा आहे." याप्रमाणें भाषण करीत असतां त्यांनीं आपापलीं शस्त्रें पाजळून तयार केलीं. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं स्तुतिपाठक स्वतःच प्रबुद्ध अशा त्या भुजबली राजाला अधिक सावध करण्याच्या इच्छेनें उच्चस्वरानें ह्मणालेः—

"हे नृपश्रेष्ठा! सर्वांना आनंद देणारा हा सूर्य आतां लवकरच उदयास येईल. करितां, तूं देखील सर्वांच्या कल्याणाकरितां सूर्योदयकालीं आपल्या शय्येचा त्याग कर. भरताशीं होणाऱ्या युद्धांत तूं जयलक्ष्मीचा पती होशील! आह्मीं गाईलेल्या श्रीजिनेंद्राच्या मंगलगीतांनीं तूं पुनः नीट जागृत हो! कारण, जिनस्तुतींच्या योगानें रणांगणांत जयश्रीची इच्छा करणाऱ्या अशा तुझ्या संपूर्ण विघ्नांची शांति होत आहे. हे प्रभो! भरताच्या देखील बाहूंत तुमच्या इतकें सामर्थ्य नाहीं. या युद्धांत जयलक्ष्मीस लवकर मिळवून, सर्वत्र जय प्राप्ति होण्याकरितां सर्व जगाचा शास्ता अशा श्रीजिनास पुनः भक्तीनें नमस्कार कर. भगवान् तीर्थंकर आदिनाथ आपल्या सामर्थ्यानें तुमचें रक्षण करो!"

हीं उत्कृष्ट मंगलगीतें ऐकून भुजबली राजा आपल्या शय्येवरून उठला. नंतर, तो तरुण नृपशार्दूल आपल्या सैन्यांसहवर्तमान युद्ध करण्यास योग्य अशा रणभूमीवर प्राप्त झाला.

---

# पर्व ३६ वें.

## भुजबलिजलमल्लदृष्टियुद्धविजयदीक्षाकेवलोत्पत्तिवर्णन.

इकडे, दूतानें ती बातमी भरतास कळविली. तात्काल, सहा प्रकारची बलसामुग्री घेऊन भरतचक्रवर्ती पुष्कळ राजेलोकांसह आपल्या बधूस जिंकण्याच्या इच्छेनें निघाला. तसेंच इकडे, बाहुबलीराजानेंही युद्धास योग्य अशी रणभूमि तयार केली. याप्रमाणें भरतचक्रवर्ती बाहुबलीशीं युद्ध करण्याकरिता त्याच्या समोर उभा राहिला. इतक्यात, मुख्य मुख्य प्रधान व सेनापती आपापसात विचार करूं लागले कीं, या दोघा भा-

ते दोघे त्याप्रमाणें युद्ध करण्यास कबूल झाले. नंतर गंभीर अशा आनंदभेरीनें दोन्ही सैन्यांस युद्ध थांबविण्याची सूचना करून, दोन्ही सैन्यांतील प्रधान पुरुष एकत्र जमविले. भरताच्या बाजूच्या राजांना एकीकडे बसविले; व दुसरीकडे भुजबलीच्या पक्षाचे राजे बसविले. उभयपक्षाकडील राजेलोकांच्या मध्यभागीं उभे राहून, भरत व भुजबली यांनीं प्रथम दृष्टियुद्धास सुरुवात केली. पापणी न हालवितां एकसारखें पाहणें हें दृष्टियुद्ध होय. या दृष्टियुद्धांत भुजबलीनें धैर्यानें आपली दृष्टि स्थिर, शांत व निश्चल अशी ठेविली. उलट, भरत भुजबलीच्या नेत्राकडे पहात असतांना, त्याच्या नेत्रांतून अश्रु गळले व पापण्याही लवल्या. हे दोन्ही प्रकार बाहुबलीस झाले नाहींत. अर्थात् या युद्धांत भुजबलीचा जय झाला. तात्काल, बाहुबलीनें "जिंकिलें" असा कलकलाट त्याच्या पक्षाचे लोक करूं लागले. तेव्हां त्यांना शांत करून राजेलोकांनीं भुजबलीला सामशद्बानें विजयी ठरविलें. नंतर, जलयुद्धाकारितां ते दोघे बंधु सरोवराच्या पाण्यांत शिरून एकमेकांच्या अंगावर पाणी टाकूं लागले. भुजबली राजा उंच असल्यामुळें, भरतानें त्याच्या अंगावर केलेला जलसेक त्याच्या मुखापर्यंत न पोंचतां खालीं पडला. उलट, भुजबलीनें केलेल्या जलसेकानें भरत व्याकुल झाला. तेव्हां, पुनः भुजबलीच्या सैन्यानें पूर्वीप्रमाणेंच आपल्या प्रभूचा जयजयकार केला. तदनंतर, बाहुयुद्ध करण्याकरितां ते बंधुद्वय युद्धभूमीवर आले. या बाहुयुद्धांतही भुजबलीनें भरताचे हात बळकट धरून त्यास आकाशांत वर उचलून लीलेनें

मंडळाकार फिरविलें. याप्रमाणें या तिन्ही युद्धातही आपल्या ज्येष्ठ भ्रात्यास भुजबलीनें जिंकिलें. तथापि, त्या दोर्बली राजानें भरत हा आपल्यापेक्षाही श्रेष्ठ आहे अशा महत्वबुद्धीमुळेंच त्यास भूमीवर पाडलें नाहीं. त्यावेळीं, भुजबलीराजाच्या पक्षाकडील राजानीं त्या कुमाराचा मोठा जयजयकार केला. व भरतचक्रवर्तीच्या पक्षाकडील राजेलोकानीं लज्जेनें आपलीं मस्तकें खालीं घातलीं. ह्या अपमानामुळें चक्रवर्ती भरतराजा क्रोधानें अगदीं विवेकभ्रष्ट झाला. व त्यानें बाहुबलीचा पराजय करण्याकरिता, सपूर्ण शत्रुसमूहाचा सहार करणाऱ्या आपल्या चक्रायुधाचें स्मरण केलें. तात्काळ, तें चक्र भरताजवळ आलें, व त्याला प्रदक्षिणा करून, अवध्य अशा बाहुबलीजवळ निस्तेज होऊन उभें राहिलें. हें पाहून भरतचक्रवर्तीला मोठा पश्चाताप झाला. भुजबली राजा त्यावेळीं स्वत ला क्षणभर उत्कर्षशाली मानूं लागला. तथापि, त्यानें तात्काळ असा विचार केला, " परिणामी दु ख देणाऱ्या अशा ह्या क्षणभगुर राज्याकरिता ह्या माझ्या ज्येष्ठ बंधूनें लज्जा उत्पन्न करणारा असा हा युद्धाचा प्रसग का बरें स्वीकारिला असेल? धि कार असो या साम्राज्याला! विषयासक्त झालेले लोक विषयसुखाचा निंद्यपणा, त्यापासून होणारें दु ख, तसेंच त्याचें क्षणभगुरत्व व शेवटीं त्यामुळें उत्पन्न होणारा विरसपणा ह्याचा मुळींच विचार करीत नाहींत हें फार अनुचित आहे. जलाल विष देखील बरें! कारण तें एकाच जन्मात मनुष्याचा नाश करितें किंवा कित्येक प्रसगीं करीतही नाहीं. परतु हे विषय जीवाचा अनेकवेळा नाश करितात. सम्यग्दर्शनीं सुदर

दिसणाऱ्या पण परिणामीं दुःखदायक अशा ह्या विषयांकरितां अविचारी मनुष्य व्यर्थ दुःखें भोगितो. विषयासंबंधानें आचार्यांनीं जे खालीं ह्मटलें आहे तें अगदीं सत्यपूर्ण आहे पहाः—

शस्त्रप्रहारदीमाग्निवज्राशनिमहोरगाः ।
न तथोद्वेजकाः पुंसां यथाऽमी विषयद्विषः ॥

अर्थः–हे विषयरूपी शत्रू मनुष्यांना जसें दुःख देतात, तसें दुःख शस्त्रप्रहार, अग्नि, वज्र, विद्युत्पात व भयंकर सर्प हीं देखील देत नाहींत. वस्तुतः, हे राज्यादि विषय अशाश्वत आहेत; पण विवेकभ्रष्ट असा हा चक्रवर्ती भरत त्यानांच शाश्वत मानीत आहे ही फार दुःखाची गोष्ट आहे!" असा विचार करून बाहुबली भरताला ह्मणतो, "हे नृपश्रेष्ठा! ज्याअर्थी तूं आपल्या बंधूंच्या सर्व संपत्तीचा नाश करून, आपल्यालाच साम्राज्यलक्ष्मी मिळावी अशी इच्छा केलीस, त्याअर्थी तूं धर्म आणि कीर्ति फार चांगलीच मिळविलीस असें ह्मटलें पाहिजे!! भगवान् आदिनाथाच्या ज्येष्ठ पुत्रानें आपल्या कुळाचा चांगला उद्धार केला असा लौकिक तूं जगांत चिरस्थायी केलास!!! तूं आज खरोखर विजयी झालास! कारण, दुःखकारक व पापमय अशी ही संपत्ती दुसऱ्यानें कधींही उपभोगिली नाहीं व ती नश्वर नाहीं असें तूं समजतोस!! अस्तु. तूं स्वीकारलेली ही राज्य-लक्ष्मी तुझी तुलाच प्रिय असूं दे! ती मला अगदीं योग्य नाहीं. कारण, मोहकर्मापासून होणारा बंध सत्पुरुषांस मुळींच संतोष देत नाहीं. अजातशत्रु अशा तपोलक्ष्मीस स्वाधीन करून घेण्याची इच्छा करणाऱ्या आह्मांस ही राज्यसंपत्ति विषवत् त्याज्य

आहे! आंता, मी नम्रतेचा त्याग करून हा जो तुझा अपराध केला त्याबद्दल तू मला क्षमा कर. हा सर्व माझा मूर्खपणा आहे असें मी समजतों." ह्याप्रमाणें भुजबलीचें भाषण ऐकून, भरताला आपण अनुचित कार्य केलें असें वाटून त्याबद्दल पश्चात्ताप झाला. व तात्काल त्यानें भुजबलीला आपल्या राज्यलक्ष्मीचा स्वीकार करण्याची प्रार्थना केली. पण तो कुमार आपल्या वैराग्यापासून यत्किंचित्‌ही ढळला नाहीं. मानी लोकांच्या बुद्धीचें स्थैर्य फार विलक्षण असतें! भुजबलीनें महाबली नावाच्या आपल्या पुत्राच्या स्वाधीन सर्व राज्यलक्ष्मी करून, जैनदीक्षेचा स्वीकार केला. त्या जितेंद्रिय राजर्षीनें एक वर्षपर्यंत प्रतिमायोगव्रत (ध्यान धरून एकाच ठिकाणीं उभें राहणें) धारण केलें. त्या अवधींत तो निराहार होता हें सांगणें नकोच. त्याच्या देहावर अनेक प्रकारच्या वेली चढल्या, वारुळातून बाहेर निघून सर्पांनीं याच्या सर्वांगास विळखे घातल्यामुळें तो फारच भयंकर दिसू लागला. तपश्चरणाच्या प्रभावानें त्याचें पुष्कळसें संचितकर्म क्षय पावलें. दुर्धर असें तप करणाऱ्या या भुजबलीला कसलीच पीडा झाली नाहीं. अहो, महापुरुषाचें धैर्य अचिंत्य असतें ह्मणूनच ते विकारवश होत नाहींत. भुजबली कुमार सर्व काहीं सहन करणारा असल्यामुळें, त्यानें आपल्या स्थैर्यगुणानें पृथ्वीस जिंकिलें. शांत स्वभावाचा असल्यामुळें त्यानें शीतलगुणानें पाण्यास, जवळ काहींएक परिग्रह न ठेविल्यामुळें निःसंगपणानें वायूस व तपश्चर्येच्या योगानें तप्त होऊन अग्नीस जिंकिलें. सारांश, तो राजर्षि पृथ्वीपेक्षा अधिक सहनशील झाला, पाण्यापेक्षा

थंड झाला, वायूपेक्षां निःसंग व अग्नीपेक्षां तेजस्वी झाला. मोक्षमार्गापासून च्युत होऊं नये म्हणून तो यति क्षुधातृषादि बावीस परिषहांपासून होणारा उपद्रव शांतपणें सहन करीत असे. कारण, 'कर्मणां निर्जरोपायः परीषहजयः परः।' म्हणजे कर्मांचा नाश होण्यास परीषह जिंकणें हाच उत्तम उपाय आहे. दिगंबर असूनही तो यति मुळींच इंद्रियवश झाला नाहीं. 'ब्रह्मचर्यस्य सा गुप्तिर्नाग्न्यं नाम परं तपः।' अर्थात् ब्रह्मचर्याचें उत्कृष्ट रक्षण करणारें जें नाग्न्य – दिगंबरपणा – हें परम तप आहे. याप्रमाणें भुजबली कुमार हा यतीचे २८ मूलगुण व बारा प्रकारचीं तपें, दशधर्म, तीन गुप्ति, पंचाचार वगैरे उत्तरगुण हेही पूर्णपणें पाळूं लागला. त्यानें आपल्या क्षमागुणानें क्रोधकषाय, गर्वत्यागानें मानकषाय, सरळपणाच्या योगानें मायाकषाय (कपट किंवा वक्र स्वभाव) व संतोषवृत्तीमुळें लोभ-कषाय या सर्वांना जिंकिलें. मतिज्ञान व श्रुतज्ञान यांच्या योगानें सर्व तत्वांचा विचार करणाऱ्या या मुनीला सर्व जग स्पष्टपणें 'करतलामलकवत्' दिसूं लागलें. तसेंच, अवधिज्ञानांत पर-मावधि म्हणून जो एक प्रकार आहे त्याचें उलंघन करून, त्याला सर्वावधि नांवाचें ज्ञान झालें. त्यापेक्षांही कर्में क्षीण झाल्यावर त्याला विपुलमति नांवाचें मनःपर्ययज्ञान प्राप्त झालें. तपश्चर्येच्या बलानें त्याच्या योगापासून उत्पन्न होणाऱ्या ऋद्धि त्याला सिद्ध झाल्या. त्याचें ज्ञान शुद्ध झाल्याच्या योगानें तपही अधिक शुद्ध झालें हें योग्यच आहे. कारण, 'ज्ञानं हि तपसो मूलं यद्वन्मूलं महातरोः।' म्हणजे, मोठ्या वृक्षाला

झालें आहे असा तो भुजबली योगी लेश्यांची शुद्धि करून, शुक्लध्यानास प्रवृत्त झाला. एक वर्षाचें उपवासव्रत संपल्यावर शेवटीं ह्मणजे पारण्याच्या दिवशीं भरतराजानें त्याची पूजा करून त्यास शुद्ध आहार दिला. त्यावेळीं भुजबली मुनीला सर्व तत्वप्रकाशक व नाशरहित असें केवलज्ञान प्राप्त झालें. भरतानें भुजबलीची पूजा करीपर्यंत त्या मुनीश्वराचें अंतःकरण त्या पूजेची अपेक्षा करणारें असल्यानें सराग होतें. नंतर, आपल्यास इष्ट विषय प्राप्त झाल्यावर तें वीतराग होऊन केवलज्ञानानें युक्त झालें. केवलज्ञान प्राप्त झाल्यावर निधिपति अशा भरतानें पुनः आपले प्रधान, राजे, स्त्रिया व उपाध्याय यासहवर्तमान भुजबलीची विधियुक्त पूजा करून त्यांना मोठ्या आनंदानें नमस्कार केला. इंद्र व देव ह्यांचीं आसनें कंपायमान झाल्यावरून, भुजबली मुनीला केवलज्ञान झालें असें त्यांना समजलें. व तात्काल त्यांनींही खालीं येऊन भुजबलीची उत्कृष्ट पूजा केली. आकाशांत देवदुंदुभि वाजूं लागले. व स्वर्गांतून तेथें कल्पवृक्षपुष्पाची वृष्टि झाली. केवलज्ञानी बाहुबली स्वामीकरितां देवलोकींच्या कारागिरांनीं रत्नघटित उंच छत्र व दिव्य आसन हीं तयार केलीं. या भुजबली स्वामीच्या उजव्या व डाव्या बाजूंस दोन्हींकडे देवांनीं रचिलेल्या चवऱ्यांचा समूह आपोआप हालूं लागला. त्याचप्रमाणें त्यांना योग्य अशी ऐश्वर्ययुक्त सभेची भूमीहि निर्माण झाली. ज्ञानावरणीय, दर्शनावरणीय, मोहनीय व अंतराय या चार प्रकारच्या कर्मांचा नाश झाल्यामुळें, परमेष्ठिस्वरूप झालेला तो सर्वज्ञ केवली स्वामी

जसें मूळ असतें तसें तपश्चर्येला ज्ञान हें मूळ आहे. सर्व प्रकारचे दुर्विकार टाकून देऊन उग्र तप करणाऱ्या त्या मुनीला आठ प्रकारची विक्रिया तपोबलानें प्राप्त झाली. तो जितेंद्रिय दिगंबर मुनी कर्माचे अणु जीर्ण करण्याकरितां नित्य चार प्रकारचें धर्मज्ञान करीत असे. परस्पर विरोध करणारे असे सिंह, व्याघ्र, हत्ती, गाय वगैरे पशु बाहुबलीमुनीच्या पायाजवळ येऊन, आपापसांतील वैर सोडून त्याच्या वैभवाची प्रसिद्धि करूं लागले. वाघीण महिषीच्या पोराला आपलें पोर समजून त्याचें मस्तक प्रेमानें हुंगून, त्याला आपलें दूध पाजूं लागली. सिंहाचे छावेही स्तनपान करण्यास उत्सुक होऊन हत्तिणीजवळ जाऊं लागले. भ्रमरांच्या गुंजारवरूपी मधुर व गुंगविणाऱ्या अशा गायनानें तेथील सर्प आपल्या फणा वर करून व फणांवरील रत्नांच्या किरणांनीं प्रकाशमान झालेलें आपलें अंग वळवून जणूं नृत्य करूं लागले. याप्रमाणें शमदमशील अशा मुनीच्या प्रभावानें तें तपोवन अत्यंत शांत, निर्भय व आनंदकारक झालें. अहो, तप हें असेंच शांति उत्पन्न करणारें असतें! इतकेंच नव्हे पण, '**धत्ते हि महतां योगः शममप्यशमात्मसु ।**' म्हणजे, महापुरुषांचा योग (संबंध) जे शांत नव्हेत अशांच्या ठिकाणींही शांति उत्पन्न करतो. याप्रमाणें या मुनीच्या तपोबलानें जिकडे तिकडे सुखमय झालेल्या या वनाश्रमांत कोणत्याही जीवांस केव्हांही व कसलाही उपद्रव किंवा अनर्थ प्राप्त झाला नाहीं. या मुनीच्या तेजानें तेथील पशू देखील निर्वैर व शांत झाले. याप्रमाणें उत्तम धर्मध्यानाच्या पूर्णतेमुळें ज्याचें तप.सामर्थ्य अधिक

झालें आहे असा तो भुजबली योगी लेश्यांची शुद्धि करून, शुक्लध्यानास प्रवृत्त झाला. एक वर्षाचें उपवासव्रत संपल्यावर शेवटीं ह्मणजे पारण्याच्या दिवशीं भरतराजानें त्याची पूजा करून त्यास शुद्ध आहार दिला. त्यावेळीं भुजबली मुनीला सर्व तत्वप्रकाशक व नाशरहित असें केवलज्ञान प्राप्त झालें. भरतानें भुजबलीची पूजा करीपर्यंत त्या मुनीश्वराचें अंतःकरण त्या पूजेची अपेक्षा करणारें असल्यानें सराग होतें. नंतर, आपल्यास इष्ट विषय प्राप्त झाल्यावर तें वीतराग होऊन केवलज्ञानानें युक्त झालें. केवलज्ञान प्राप्त झाल्यावर निधिपति अशा भरतानें पुनः आपले प्रधान, राजे, स्त्रिया व उपाध्याय यासहवर्तमान भुजबलीची विधियुक्त पूजा करून त्याना मोठ्या आनंदानें नमस्कार केला. इंद्र व देव ह्यांचीं आसनें कपायमान झाल्यावरून, भुजबली मुनीला केवलज्ञान झालें असें त्यांना समजलें. व तात्काल त्यांनींही खालीं येऊन भुजबलीची उत्कृष्ट पूजा केली. आकाशात देवदुंदुभि वाजूं लागले. व स्वर्गांतून तेथें कल्पवृक्षपुष्पाची वृष्टि झाली. केवलज्ञानी बाहुबली स्वामीकरिता देवलोकींच्या कारागिरांनीं रत्नघटित उंच छत्र व दिव्य आसन हीं तयार केलीं. या भुजबली स्वामीच्या उजव्या व डाव्या बाजूस दोन्हींकडे देवानीं रचिलेल्या चवऱ्याचा समूह आपोआप ढाळू लागला. त्याचप्रमाणें त्याना योग्य अशी ऐश्वर्ययुक्त सभेची भूमीहि निर्माण झाली. ज्ञानावरणीय, दर्शनावरणीय, मोहनीय व अंतराय या चार प्रकारच्या कर्मांचा नाश झाल्यामुळें, परमेष्ठिस्वरूप झालेला तो सर्वज्ञ केवली स्वामी

जसें मूळ असतें तसें तपश्चर्येला ज्ञान हें मूळ आहे. सर्व प्रकारचे दुर्विकार टाकून देऊन उग्र तप करणाऱ्या त्या मुनीला आठ प्रकारची विक्रिया तपोबलानें प्राप्त झाली. तो जितेंद्रिय दिगंबर मुनी कर्मांचे अणु जीर्ण करण्याकरिता नित्य चार प्रकारचें धर्मध्यान करीत असे. परस्पर विरोध करणारे असे सिंह, व्याघ्र, हत्ती, गाय वगैरे पशु बाहुबलीमुनीच्या पायाजवळ येऊन, आपापसांतील वैर सोडून त्याच्या वैभवाची प्रसिद्धि करूं लागले. वाघीण महर्षींच्या पोराला आपलें पोर समजून त्याचें मस्तक प्रेमानें हुंगून, त्याला आपलें दूध पाजूं लागली. सिंहाचे छावेही स्तनपान करण्यास उत्सुक होऊन हत्तिणीजवळ जाऊं लागले. भ्रमराच्या गुंजारवरूपी मधुर व गुणविणाऱ्या अशा गायनानें तेथील सर्प आपल्या फणा वर करून व फणावरील रत्नाच्या किरणांनीं प्रकाशमान झालेलें आपलें अंग वळवून जणूं नृत्य करूं लागले. याप्रमाणें शमदमशील अशा मुनीच्या प्रभावानें तें तपोवन अत्यंत शांत, निर्भय व आनंदकारक झालें. अहो, तप हें असेंच शांति उत्पन्न करणारें असतें! इतकेंच नव्हे पण, ' धत्ते हि महतां योगः शममप्यशमात्मसु । ' म्हणजे, महापुरुषांचा योग (संबंध) जे शांत नव्हेत अशांच्या ठिकाणींही शांति उत्पन्न करतो. याप्रमाणें या मुनीच्या तपोबलानें जिकडे तिकडे सुखमय झालेल्या या वनाश्रमांत कोणत्याही जीवास केव्हांही व कसलाही उपद्रव किंवा अनर्थ प्राप्त झाला नाहीं. या मुनीच्या तेजानें तेथील पशु देखील निर्वैर व आनंदी झाले. याप्रमाणें उत्तम धर्मध्यानाच्या पूर्णतेमुळें ज्याचें तप सामर्थ्य अधिक

झालें आहे असा तो भुजबली योगी लेश्यांची शुद्धि करून, शुक्लध्यानास प्रवृत्त झाला. एक वर्षाचें उपवासव्रत संपल्यावर शेवटीं ह्मणजे पारण्याच्या दिवशीं भरतराजानें त्याची पूजा करून त्यास शुद्ध आहार दिला. त्यावेळीं भुजबली मुनीला सर्व तत्वप्रकाशक व नाशरहित असें केवलज्ञान प्राप्त झालें. भरतानें भुजबलीची पूजा करीपर्यंत त्या मुनीश्वराचें अंतःकरण त्या पूजेची अपेक्षा करणारें असल्यानें सराग होतें. नंतर, आपल्यास इष्ट विषय प्राप्त झाल्यावर तें वीतराग होऊन केवलज्ञानानें युक्त झालें. केवलज्ञान प्राप्त झाल्यावर निधिपति अशा भरतानें पुनः आपले प्रधान, राजे, स्त्रिया व उपाध्याय यांसहवर्तमान भुजबलीची विधियुक्त पूजा करून त्यांना मोठ्या आनंदानें नमस्कार केला. इंद्र व देव ह्यांचीं आसनें कंपायमान झाल्यावरून, भुजबली मुनीला केवलज्ञान झालें असें त्यांना समजलें. व तात्काल त्यांनींही खालीं येऊन भुजबलीची उत्कृष्ट पूजा केली. आकाशांत देवदुंदुभि वाजूं लागले. व स्वर्गांतून तेथें कल्पवृक्षपुष्पांची वृष्टि झाली. केवलज्ञानी बाहुबली स्वामीकरितां देवलोकींच्या कारागिरांनीं रत्नघटित उंच छत्र व दिव्य आसन हीं तयार केलीं. या भुजबली स्वामीच्या उजव्या व डाव्या बाजूंस दोन्हींकडे देवांनीं रचिलेल्या चवऱ्यांचा समूह आपोआप हालूं लागला. त्याचप्रमाणें त्यांना योग्य अशी ऐश्वर्ययुक्त सभेची भूमीहि निर्माण झाली. ज्ञानावरणीय, दर्शनावरणीय, मोहनीय व अंतराय या चार प्रकारच्या कर्मांचा नाश झाल्यामुळें, परमेष्ठिस्वरूप झालेला तो सर्वज्ञ केवली स्वामी

संपूर्ण पृथ्वीवर आपल्या उपदेशमय वचनरूपी अमृतानीं सगळ्या जीवांना सतुष्ट करीत, विहार करूं लागला. शेवटीं, तो आदिजिनेंद्राच्या सहवासानें पवित्र झालेल्या कैलासपर्वताला पोंचला. सर्व केवलीमुनींमध्यें पहिला असा भुजबलीमुनि आमचें रक्षण करो! जो हिंवाळ्यात बर्फानें आपलें शरीर व्यापिलें असतानाही पर्वताप्रमाणें अचल राहिला, पावसाळ्यात ज्याच्यावर सतत मेघवृष्टि झाली व उन्हाळ्यातही अग्नीप्रमाणें प्रखर असे सूर्यकिरण ज्यानें सहन केले असा तो महामुनि धैर्यशाली भुजबली विजयी असो! जो या महायोगी भुजबलीचें नित्य हृदयात भक्तीनें स्मरण करील, तो कषाय जिंकून शेवटीं निश्चयेंकरून मोक्षलक्ष्मी प्राप्त करून घेईल.

# पर्व ३७ वें.

## भरतेश्वराभ्युदयवर्णन.

सर्व दिशा जिंकिल्यानतर भरतचक्रवर्तीनें उत्तम तऱ्हेनें श्रृंगारिलेल्या अयोध्या नगरींत प्रवेश केला. तेथें भरतास 'हे प्रभो! तू दीर्घायु होऊन पृथ्वीचें राज्य कर!' असें म्हणून राजे, राजस्त्रिया, पुरोहित व नगरवासी लोक या सर्वांनी त्याला राज्याभिषेक केला. साराश, श्रीवृषभराजाच्या राज्याभिषेकाचे प्रसगीं जे जे विधी केले होते, ते ते सर्व विधी या भरताच्या राज्याभिषेकाच्या प्रसगींहि देवानीं व सर्व माडलिक राजानीं केले. भरतानेंही श्रीवृषभाप्रमाणेंच सर्व राजाचा व त्याच्या मत्रिगणाचा

सत्कार केला. व विलक्षण अशा दानसंपत्तीनें त्यानें सर्व जनतेस संतुष्ट केले. महान् महान् भूपतींनीं भरताला राज्याभिषेक केला असूनही तो गर्वानें मुळींच फुगला नाहीं. याचें कारण उघडच आहे कीं, 'महतां हि मनोवृत्तिर्नोत्सेकपरिरम्भिणी।' ह्मणजे, महात्म्याची मनोवृत्ति गर्वाचा स्वीकार करणारी नसते. अस्तु. तो गुणी राजा प्रजेचे योग ( आपल्याजवळ नसलेल्या पदार्थांची प्राप्ति ) व क्षेम ( प्राप्त झालेल्या पदार्थांचें रक्षण ) हे दोन्ही करीत असतां, आपल्यास सनाथ समजणारी अशी सर्व प्रजा, केवळ आपापल्या सद्व्यवहारापासून होणाऱ्या सुखाचा पूर्ण अनुभव घेत होती. भरतेश्वरानें आपल्यास प्राप्त झालेले सर्व निधि यथायोग्य विभागूनच उपभोगिले. कारण, 'संभोगः संविभागश्च फलमर्थार्जने द्वयम्।' अर्थात्, द्रव्य संपादन करण्यांत त्याचा उपभोग घेणें व तें यथायोग्य वाटून देणें हे दोनच हेतु आहेत. हा राजा सर्व चक्रवर्तीराजाच्या अगदीं प्रथमचा असल्यानें मनु, साम्राज्याधिपति व पृथ्वीवरील सर्व राजांचा शास्ता आहे अशा प्रकारें भरताची धवल कीर्ति सर्वत्र पसरली. रत्नखचित मुकुट धारण करणारे बत्तीस हजार राजे त्याच्या ताब्यांत होते. त्याच्या ताब्यांत बत्तीस हजार देश असून, तितक्याच पट्टराण्याही होत्या. तो पृथ्वीपति त्या सुंदर स्त्रियांसह मदनाप्रमाणें नानाप्रकारचे सुखानुभव नित्य उपभोगित असे. १ काल, २ महाकाल, ३ नैःसर्प्य, ४ पांडुक, ५ पद्म, ६ माणव, ७ पिंग, ८ शंख, व ९ रत्नपद असे ह्या राजाचे नऊ निधि होते. त्यायोगानें हा राजा गृहकृत्या-

संबंधानें निश्चित असून त्यास 'निधिपति' हें नामाभिधान यथार्थ शोभत होतें. या नऊ निधींपासून नानाप्रकारचीं रत्नें, शालें, अलंकार, धान्यें, वस्त्रप्रावरण आदि पदार्थ उत्पन्न होत असत. १ चक्र, २ छत्र, ३ दंड, ४ खड्ग, ५ मणि, ६ चर्म, ७ काकिणी ८ सेना, ९ श्रेष्ठि, १० गज, ११ अश्व, १२ स्त्री, १३ तक्ष (सुतार) व १४ पुरोहित अशीं त्याचीं चवदा रत्नें होतीं. त्याचें स्त्रीरत्न सुभद्रा या नांवाचें होतें. ती देवी स्वभावतःच अत्यंत निर्दोष व मंगलरूप असून विद्याधरकन्या होती. १ चौदारत्नें, २ नऊ निधि, ३ पट्टराण्या, ४ नगर, ५ शय्या, ६ आसन, ७ सैन्य, ८ नाटकशाला, ९ पात्राशीं सहवर्तमान भोजनाचे पदार्थ व १० वाहन अशीं त्या राजाधिराजाचीं दहा प्रकारचीं सुखानुभवाचीं साधनें होतीं. ह्याचे सोळा हजार व्यंतरदेव अंगरक्षक (Body-guard) होते. हीं सर्व विभूति श्रीमान् व सर्व निधिपतींमध्यें मुख्य अशा त्या चक्रवर्ती भरताच्या पुण्यरूपी कल्पवृक्षाचें फळ होय. ऐश्वर्यसंपन्न असा तो भरत राजा एकछत्री अशा पृथ्वीचें बहुतकालपर्यंत पालन करीत होता. या भरतेश्वराच्या वेळेपासूनच सहा खंडांनीं सुशोभित असलेली ही भूमि ' **भरतभूमि** ' या नांवानें प्रसिद्धीस आली.



# पर्व ३८ वें.

## द्विजोत्पत्तौ गर्भान्वयक्रियावर्णन.

जयन्त्यखिलसन्मार्गगामिन्यः सूक्तयोऽर्हताम् ।
धूतान्धतमसा दीप्रा यास्त्विषोंऽशुमतामिव ॥

अर्थः—संपूर्ण सन्मार्गाचें प्रतिपादन करणाऱ्या अशा अरहंताच्या सूक्ति ( भाषणें ) उत्कर्ष पावत आहेत. ह्या सूक्ति अज्ञानांधकाराचा नाश करणाऱ्या असल्यामुळें, सूर्याच्या दैदिप्यमान किरणांप्रमाणें भासतात. गौतमगणधर ह्मणतात, श्रेणिका, उत्कृष्टज्योतिरूपी अशा श्रीवृषभनाथास नमस्कार करून, तुला द्विजांची ( ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्यांची ) उत्पत्ति क्रमानें सांगतो ती ऐक. साठ हजार वर्षांनीं आपला दिग्विजय संपवून कृतकृत्य झालेला तो राजाधिराज भरत अयोध्येला परत आल्यानंतर, त्याला आपली ही संपत्ति दुसऱ्याच्या उपयोगी कशी पडेल अशी काळजी वाटू लागली. तेव्हा त्यानें विचार केला कीं, श्रीजिनेंद्राची महापूजा करून सर्वत्र पुष्कळ द्रव्य देऊन साऱ्या जगाला सतुष्ट करावें. आतां, मुनी हे निरिच्छ असल्यानें काहीं घेणार नाहींत. ह्मणून, ज्या गृहस्थाश्रमी लोकांनीं पांच प्रकारचीं अणुव्रतें धारण केलीं असतील त्यांनाच अपेक्षित असलेली द्रव्यें वाहनें, वगैरे देणें योग्य आहे. असा निश्चय करून भरत चक्रवर्तीनें सर्व माडलिक राजांना आपापल्या नोकरलोकांसह उत्सवाच्या वेळीं बोलाविलें. व त्यानें पूज्य अशा अणुव्रतधारी

श्रावकांचा प्रथम बक्षिसें, किताब वगैरे देऊन बहुमान केला. नंतर त्यानें त्यांना त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें एकापासून अकरापर्यंत पद्मनिधीपासून निघालेलीं ब्रह्मसूत्रें–यज्ञोपवीतें–दिलीं; अर्थात्, त्यानें पहिल्या प्रतिमेच्या श्रावकास एक, दुसऱ्या प्रतिमेच्या श्रावकास दोन याप्रमाणें अकरापर्यंत यज्ञोपवितें दिलीं. भरतराजानें उपासकाचार ऐकिलेला होता. त्यामुळें त्यानें पूजा कशी करावी, उदरनिर्वाह कसा करावा, दान कोणाला द्यावें, स्वाध्याय कसा करावा, संयम ह्मणजे काय, तप ह्मणजे काय हें सर्व त्या व्रती श्रावकांना नीट समजावून सांगितलें. त्यावेळीं त्यानें त्यांना हा कुलधर्म आहे असें सांगून पूजादिविधींचें खालीं लिहिल्याप्रमाणें वर्णन केलें. भरत ह्मणतोः—

"अर्हंताची नित्य पूजा करावी. सदार्चना, चतुर्मुखमह, कल्पद्रुम व अष्टान्हिक असे पूजेचे चार प्रकार आहेत. प्रतिमा व देवालयें हीं भक्तीनें तयार करणें, पूजासामुग्री जिनमंदिरांत नेणें, दान देणें, तसेंच नित्यदानाचा ज्यांत संबंध आहे असें जें मुनींद्रांचें पूजन तें आपल्या शक्तीप्रमाणें वाढविणें हें 'सदार्चन' होय. मुकुटबद्ध राजे लोक जो महोत्सव करितात त्यास 'चतुर्मुख' अथवा 'सर्वतोभद्र' ह्मणतात. याचकांना इष्ट वस्तु देऊन चक्रवर्ती राजे जो महोत्सव करितात, तो साऱ्या जगाचें मनोरथ पूर्ण करणारा असल्यानें 'कल्पद्रुममह' होय. जो पूजोत्सव सार्वजनिक असतो तो 'अष्टान्हिक' महोत्सव ह्मणून प्रसिद्ध आहे. वर सांगितलेल्या विधीप्रमाणें पूजा करणें हें षटकर्मांपैकीं मुख्य कर्म होय. शुद्धाचारानें ह्मणजे स्थूलहिंसा न होऊं देत

शेत नांगरणें वगैरे व्यापार करणें त्यास 'वृत्ति' असें ह्मणतात. दयार्द्र होऊन दान करण्यास योग्य अशा जीवाला जें कांहीं देणें त्याला 'दान' असें ह्मणतात. तें दान चार प्रकारचें आहे. सदय अंतःकरणानें आणि मन, वाणी व शरीर या तिन्हींच्या योगानें, योग्य पात्र पाहून त्याला जें अभयदान देणें यास 'दयादान' ह्मणतात. मुनींची पूजा वगैरे करून अन्नादि पदार्थांचें जें दान करितात त्यास 'पात्रदान' ह्मणतात. समानयोग्यतेच्या अशा दुसऱ्या (मुनींहून निराळ्या) व्रती सत्पात्राला द्रव्य वगैरे देणें त्याला 'समानदान' ह्मणतात. आपल्या वंशाची चिरकाल स्थिति असावी अशा हेतूनें, आपण आचरण केलेला सद्धर्म व संपादन केलेलें द्रव्य ह्यांसह धर्म, अर्थ व काम या तिन्ही पुरुषार्थांचें आपल्या पुत्राला जें दान करणें तें 'सकल दान' होय. शास्त्राचा विचार करणें यास 'स्वाध्याय' ह्मणतात. उपोषणादि नियमांस 'तप' व व्रतधारण करणें यास 'संयम' ह्मणतात. हीं षटकर्में द्विजांना (ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांना) योग्य आहेत. जो ह्या आचारांचा त्याग करितो तो फक्त नांवानेंच द्विज असून, गुणांनीं द्विज नव्हे. तप, स्वाध्याय व जाति हीं तीन ब्राह्मण असण्याचीं साधनें आहेत. जो तप व स्वाध्याय या दोन्हींनीं रहित असतो, तो केवल जातीनेंच ब्राह्मण समजावा. द्विजांची उपजीविका निष्पाप असते. शिवाय, जाति उत्तम असून दान, पूजन व स्वाध्याय हीं कर्में मुख्य असल्यामुळें व्रताचरणानेंही तिला चांगला संस्कार झालेला असतो. जातीसंबंधानें आचार्य ह्मणतातः—

मनुष्यजातिरेकैव जातिनामोदयोद्भवा ।
वृत्तभेदाहिताद्भेदाचातुर्विध्यमिहाश्नुते ॥ ४५ ॥
ब्राह्मणा व्रतसंस्कारात् क्षत्रियाः शस्त्रधारणात् ।
वणिजोऽर्थार्जनान्न्याय्यात् शूद्रा न्यग्वृत्तिसंश्रयात्॥४६॥

अर्थः—मनुष्यजाति ही एकच ' जातिनाम ' कर्माच्या उदयानें उत्पन्न झाली, व तीच निरनिराळ्या आचारामुळें झालेल्या भेदांच्या योगानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शुद्र अशी चार प्रकारची झाली. व्रतें व संस्कार ह्यामुळें ब्राह्मण झाले; शस्त्र धारणामुळें क्षत्रिय झाले; न्यायानें द्रव्य संपादन करण्यानें वैश्य झाले व नीच वृत्तीच्या आश्रय करून शूद्र झाले. ह्मणून जे द्विज आहेत त्यांना तप व स्वाध्याय ह्यांच्या योगानेंच संस्कार होणें इष्ट आहे. व ज्याला हे दोन संस्कार झाले नसतील तो केवल जातीनेंच द्विज समजावा. आगमकार ह्मणतातः—

द्विर्जातो हि द्विजन्मेष्टः क्रियातो गर्भतश्च यः।
क्रियामन्त्रविहीनस्तु केवलं नामधारकः ॥

अर्थः—क्रियेमुळें व गर्भापासून अशा दोन प्रकारांनीं जो उत्पन्न झाला असेल तोच द्विजन्मा अथवा द्विज होय. ह्मणून, क्रिया व मंत्र ह्या दोहोंनीं रहित असा जो असेल तो केवळ द्विज ह्या नांवाला धारण करणारा होय. श्रावकाध्यायसंग्रहांत द्विजांचा जातिसंस्कार दृढ करण्याकरितां १ गर्भसंबंधी २ दीक्षेसंबंधी व ३ कर्त्र्यासंबंधी अशा क्रिया तीन प्रकारच्या आहेत असें सांगितलें आहे. त्या सम्यग्दर्शनानें युक्त अशा श्रावकानें अवश्य केल्या पाहिजेत. त्यापासून वर्तमान व भविष्यकालीं

गृहात स्वतंत्रपणें राहून तू दान वगैरे लक्षणांनीं युक्त असा सर्व प्रकारचा गृहस्थधर्म धारण करून योग्य अशी कीर्ति व धर्म संपादन कर ।' ह्याप्रमाणें उपदेश करून पुत्राला स्वतंत्रपणें निर्वाह करण्याची प्रेरणा करावी. व त्यानेंही सदाचरणानें वागून तसें करावें हें योग्य आहे.

१९ कुलचर्याः—गृहस्थी श्रावकानीं देवपूजादि षट्कर्मे नित्य करावींत हाच त्याचा कुलधर्म होय.

२० गृहीशिताः—श्रावकानें गृहस्थाचार्य या नात्यानें निष्पाप अशी उपजीविका, शास्त्र, आचार, मंत्रपाठ वगैरे व पुढें सांगितलेल्या बाकींच्या क्रिया ह्याच्या योगानें, सर्व वर्णांतील लोकांपेक्षा श्रेष्ठपणानें राहून आपली ही गृहीशिता नावाची क्रिया पाळावी.

२१ प्रशांतिः—पुत्रप्राप्ति झाल्यानंतर त्याच्यावर योग्यवेळीं संसारभार टाकून, आपण प्रशांतीचा स्वीकार करावा. ह्मणजे त्यानें विषयाविषयीं निस्पृह असावें, नेहमीं अध्ययन करावें व उपोषणादि व्रतें करून शांतवृत्ति ठेवावी.

२२ गृहत्यागः—गृहस्थाश्रमांत आपण कृतकृत्य झालों असें मानणाऱ्या श्रावकानें आपल्या ज्येष्ठपुत्राला सर्व देऊन उपदेश करावा कीं, बा पुत्रा! आमच्या ह्या द्रव्याचा एक भाग धर्मकृत्याकडे, दुसरा गृहकृत्याकडे व तिसरा तू व तुझे बंधु ह्यामध्यें वाटून घेण्याकडे उपयोग कर. ज्याचा विभाग सारखा आहे अशा मुलांबरोबरच मुलींही विभाग घेण्याला योग्य आहेत. बाळा, तू कुलपरंपरेनें चालत आलेला धर्म, सदाचार व शास्त्र

*क्रिया* बाराव्या किंवा सोळाव्या वर्षीं करावी. ही क्रिया सामान्यव्रताविषयीं नसून विशेषव्रताविषयीं आहे. मद्य, मांस, व हिंसादि अनर्तें याचा त्याग श्रावकानें केलाच पाहिजे. ह्या प्रसंगीं या ब्रह्मचाऱ्यानें गुरूच्या आज्ञेनें व्रतावतरणाला योग्य अशीं वस्त्रें, भूषणें, माला वगैरे धारण करावींत. ही क्रिया झाल्यानंतर त्याला तांबूलभक्षणादि करण्यास हरकत नाहीं; परंतु विवाहक्रिया होईपर्यंत त्यानें ब्रह्मचर्य हें राखिलेंच पाहिजे.

**१७ विवाह.**—नंतर गुरूच्या आज्ञेनें ह्या मुलाचा विवाह कुलीन घराण्यांतील कन्येशीं करावा. द्विजांनीं यथाशास्त्र सिद्धांची व तीन अग्नींची पूजा करून त्यांच्या साक्षीनें विवाह-क्रिया करावी. वधूवरांनीं सात दिवसपर्यंत देव व अग्नि याच्या समक्ष ब्रह्मचर्य धारण करावें. नंतर तीर्थयात्रा करून स्वगृहीं प्रवेश करावा. मग विवाहकंकण सोडून, तांबूलादि उपभोग्य वस्तूंनीं एकमेकांचें रंजन करणाऱ्या अशा त्या वधुवरानीं संततीकरिता ऋतुकालींच संभोग करावा. हा संभोगव्यवहार शक्ति व काल ह्यांवर अवलंबून आहे.

गृहांत स्वतंत्रपणें राहून तूं दान वगैरे लक्षणांनीं युक्त असा सर्व प्रकारचा गृहस्थधर्म धारण करून योग्य अशी कीर्ति व धर्म संपादन कर!' ह्याप्रमाणें उपदेश करून पुत्राला स्वतंत्रपणें निर्वाह करण्याची प्रेरणा करावी. व त्यानेंही सदाचरणानें वागून तसें करावें हें योग्य आहे.

१९ कुलचर्याः—गृहस्थी श्रावकांनीं देवपूजादि पट्कर्मे नित्य करावींत हाच त्यांचा कुलधर्म होय.

२० गृहीशिताः—श्रावकानें गृहस्थाचार्य या नात्यानें निष्पाप अशी उपजीविका, शास्त्र, आचार, मंत्रपाठ वगैरे व पुढें सांगितलेल्या बाकींच्या क्रिया ह्यांच्या योगानें, सर्व वर्णांतील लोकांपेक्षा श्रेष्ठपणानें राहून आपली ही गृहीशिता नांवाची क्रिया पाळावी.

२१ प्रशांतिः—पुत्रप्राप्ति झाल्यानंतर त्याच्यावर योग्यवेळीं संसारभार टाकून, आपण प्रशांतीचा स्वीकार करावा. ह्मणजे त्यानें विषयांविषयीं निस्पृह असावें, नेहमीं अध्ययन करावें व उपोषणादि व्रतें करून शांतवृत्ति ठेवावी.

२२ गृहत्यागः—गृहस्थाश्रमांत आपण कृतकृत्य झालों असें मानणाऱ्या श्रावकानें आपल्या ज्येष्ठपुत्राला सर्व देऊन उपदेश करावा कीं, बा पुत्रा! आमच्या ह्या द्रव्याचा एक भाग धर्मकृत्याकडे, दुसरा गृहकृत्याकडे व तिसरा तूं व तुझे बंधु ह्यामध्यें वाटून घेण्याकडे उपयोग कर. ज्यांचा विभाग सारखा आहे अशा मुलांबरोबरच मुलीही विभाग घेण्याला योग्य आहेत. बाळा, तूं कुलपरंपरेनें चालत आलेला धर्म, सदाचार व शास्त्र

यांचें रक्षण कर. याप्रमाणें सांगून श्रावकानें दीक्षा घेण्याकरितां गृहत्याग करावा.

२३ **दीक्षाद्यः**—गृहत्याग केलेल्या श्रावकानें दीक्षा घेण्याला योग्य अशा कालाच्या पूर्वी एकवस्त्र धारण करून दीक्षेकरितां जें पुरश्चरण केलें जातें ती दीक्षाद्य नांवाची क्रिया होय.

२४ **जिनरूपताः**—वस्त्रादि सर्व परिग्रहांचा त्याग करून, जिनदीक्षा घेतली आहे अशा धैर्यशाली श्रावकानें जन्मकालच्या आपल्या स्वरूपाचा आश्रय करणें ( नग्न राहणें ) यास जिनरूपता ह्मणतात.

२५ **मौनाध्ययनवृत्तिः**—दीक्षा घेतल्यानंतर आपलें शास्त्राध्ययन संपेपर्यंत मौन धारण करून अध्ययन करावें. वाणीचें नियमन करणाऱ्या व करणत्रय शुद्ध ठेवणाऱ्या अशा ह्या दीक्षितानें गुरुजवळ आरंभापासून सर्वशास्त्र शिकावें.

२६ **तीर्थकृद्भावनाः**—ज्यानें संपूर्ण आचारांचें व शास्त्रांचें अध्ययन केलें आहे व ज्याचें आचरण निर्दोष झालें आहे अशा त्या दीक्षितानें दर्शनशुद्धि वगैरे तीर्थंकरपणाच्या सोळा भावनांचें नित्य चिंतवन करावें.

२७ *गुरुस्थानाभ्युपगमः*—नंतर सर्वशास्त्रपारंगत अशा त्या संयमी मुनीनें आपल्या गुरुकृपेनें गुरुपदाचा स्वीकार करावा ह्मणजे पट्ट धारण करून आपण दुसऱ्यास शास्त्र शिकवावें.

२८ **गणोपग्रहणः**—सदाचारसंपन्न अशा ह्या मुनीनें श्रावक, श्राविका, आर्यिका व संयमी ह्यांना सन्मार्गी लावून

समाजांतील कोणाही व्यक्तीला धर्मभ्रष्ट होऊं देऊं नये. दीक्षा देणें, सद्धर्मोपदेश करणें, प्रायश्चित्त देणें वगैरे क्रिया करून त्यानें गणाचें–समाजाचें– रक्षण करावें.

२९ **स्वगुरुस्थानावाप्तिक्रियाः**— समाजाला शासन करणाऱ्या ह्या आचार्यानें श्रेष्ठ अशा विद्वान् शिष्यास आपला सर्व अधिकार देऊन आपण गुरूच्या आज्ञेनें आचार्यपद धारण करून त्याप्रमाणें वागावें.

३० **निःसंगत्वात्मभावनाः**—त्या शिष्यावर सर्व भार टाकून, आपण एकटें राहून निःसंग असल्याची भावना करावी. ह्या कालांत केवल आपल्या आत्म्याला संस्कार व्हावा अशी इच्छा करणारा तो महातपस्वी दुसऱ्याला संस्कार करण्यास योग्य नाहीं. ह्यानें निर्ममत्वाविषयीं एकाग्रबुद्धि ठेवून केवल चर्याशुद्धीचा आश्रय करावा.

३१ **योगनिर्वाणसंप्राप्तिः**—ह्याप्रमाणें, आत्म्याला संस्कार करून, सल्लेखना (रागादिदोष व शरीर कृश करणें) करण्याकरितां तयार झालेल्या आचार्यानें आत्म्यासंबंधीं योगनिर्वाण (आत्मध्यानांत चित्ताचें एकाग्रत्व) मिळवावें. योग ह्मणजे **स्वरूपाचें ध्यान** व त्याकरितां जो जोराचा प्रयत्न त्याला योगनिर्वाण अशी संज्ञा आहे. देह मी नव्हे, वाणी मी नव्हे, मन मी नव्हे अशा प्रकारची भेदभावना उदास न होतां करावी. क्रोधादि कषायांचा त्याग करून आत्मस्वरूप नसलेल्या शरीरादिकांविषयींचा मीपणाचा आग्रह टाकावा. मी एकटा आहे, माझें कोणीही नाहीं व मी कोणाचाही नाहीं अशा प्रकारें

३७ इंद्रत्यागः—स्वर्गांतील सुखोपभोगांचा त्याग करणें हीच इंद्रत्याग क्रिया होय.

३८ इंद्रावतारः—जो स्वर्गांतून इहलोकीं जन्म घेणार आहे व ज्यानें अर्हत्पूजा केली आहे अशा ह्या इंद्रत्याग करणाऱ्या पुण्यजीवाची स्वर्गावतार क्रिया होते.

३९ हिरण्यजन्मताः—नंतर हा परमेष्ठी हिरण्योत्कृष्टजन्म-धारण करितो. ह्याचा जन्म होण्यापूर्वी सहा महिने अगोदर ह्याच्या मातापित्यांच्या घरीं कुबेर सुवर्णवृष्टि करित असतो. राजर्षीच्या पुण्य मंदिरांत होणाऱ्या ह्या जन्मास ह्मणूनच 'हिरण्योत्कृष्टजन्म' असें ह्मणतात. शिवाय ह्याला गर्भांत असतां मति, श्रुति व अवधि असें तीन प्रकारचें ज्ञान असतें.

४० मंदरेंद्राभिषेकः—श्रीजिनाचें जन्म आल्यावर देव मेरूपर्वताच्या शिखरावर क्षीरसमुद्राच्या शुद्धोदकानें ह्या परमेष्ठीचा जो अभिषेकविधि करतात त्यास मंदरेंद्राभिषेक ह्मणतात.

४१ गुरुपूजनः—नंतर ह्या स्वतंत्र व स्वयंभू अशा परमेष्ठीस विद्योपदेश होऊन व त्याचा शिष्यपणा जाऊन त्याला गुरुपूजेची प्राप्ति होते. त्यावेळीं इंद्र 'त्रिजगद्‌गुरु' ह्मणून त्याची पूजा करितात.

४२ यौवराज्यः—नंतर ह्या परमेष्ठीस पट्टबंध व अभिषेक होतो. ह्याला बाल्यावस्थेंतच यौवराज्याची प्राप्ति होते.

४३ स्वराज्यः—अनेक राजांनीं ज्याला मुख्य अधिपतीच्या स्थानीं अभिषेक केला आहे व जो ह्या संपूर्ण पृथ्वीचा शास्ता आहे अशा परमेष्ठीस स्वराज्यप्राप्ति होते.

४४ **चक्रलाभः**—त्या परमेष्ठीला निधिरत्नांची प्राप्ति झाल्यावर चक्ररत्नाची प्राप्ति होते.

४५ **दिग्विजयः**—ह्या प्रभूचा जो दिग्विजयाचा उद्योग ती त्याची दिग्विजयक्रिया होय. ह्यावेळीं तो चक्ररत्न पुढें करून सर्व पृथ्वी जिंकितो.

४६ **चक्राभिषेकः**—ज्याला दिग्विजयसिद्धि झाली आहे अशा ह्या परमेष्ठीची चक्राभिषेक क्रिया नगरांत प्रवेश केल्यानंतर घडते. त्यावेळीं 'तूं सर्व जग जिंकणारा आहेस, तूं दिग्विजयी आहेस, दिव्यदेही आहेस!' असें ह्मणून मोठमोठे राजे त्याचा अभिषेक करून स्तुति करितात.

४७ **साम्राज्यः**—नंतर दुसरे दिवशीं प्रातःकालीं तो परमेष्ठी राजसभेमध्यें आपल्या पुढें नम्र झालेल्या सर्वराजांना प्रजापालनाविषयीं दक्ष असण्याबद्दल वारंवार सांगून, खालीं लिहिल्याप्रमाणें त्यांना उपदेश करितोः—

**पार्थिवान् प्रणतान् यूयं न्यायैः पालयत प्रजाः ।**
**अन्यायेषु प्रवृत्तिश्चेद्वृत्तिलोपो ध्रुवं हि वः ॥ २५९ ॥**
**न्यायश्च द्वितयो दुष्टनिग्रहः शिष्टपालनम् ।**
**सोऽयं सनातनः क्षात्रो धर्मो रक्ष्यः प्रजेश्वरैः ॥२६०॥**
**राजवृत्तिमिमां सम्यक्पालयद्भिरतन्द्रितैः ।**
**प्रजासु वर्तितव्यं भो भवद्भिर्न्यायवर्त्मना ॥ २६२ ॥**
**पालयेद्य इयं धर्मं स धर्मविजयी भवेत् ।**
**क्ष्मां जयेद्विजितात्मा हि क्षत्रियो न्यायजीविकः ॥२६३॥**

अर्थः—हे राजांनो! तुह्मी नीतीनें प्रजारक्षण करा.

अनीतीकडे तुमची प्रवृत्ति झाल्यास तुह्मांस खचित अन्न मिळणार नाहीं. नीति दोन प्रकारची आहे. एक दुष्टांना शासन करणें आणि दुसरें साधूंचें पालन करणें. ही नीति हाच क्षत्रियांचा मुख्य धर्म होय. हा राजांनीं अवश्य पाळिलाच पाहिजे. हें जें राजांचें कर्तव्य त्याचें सावधगिरीनें रक्षण करून तुह्मीं प्रजेविषयीं नीतीच्या मार्गानें वागावें. ह्या राजधर्माचें जो न्यायनिष्ठ क्षत्रिय राजा रक्षण करील तो धर्मामध्यें विजयी होऊन सर्व पृथ्वी जिंकील! याप्रमाणें त्यांना उपदेश करून तो परमेष्ठी आपणही त्या राजांच्या योगक्षेमाचा विचार करून त्याचें रक्षण करितो. ह्या क्रियेचें रक्षण केल्यानें त्याला इहपरलोकीं परम सुख प्राप्त होते.

४८ निष्क्रांतिः—ह्यानंतर तो परमेष्ठी पुष्कळ कालपर्यंत प्रजा व मांडलिक राजे ह्यांचें रक्षण करून, कोण्या एका प्रसंगीं ज्ञानप्राप्ति झाली असतां राज्याविषयीं विरक्त होऊन दीक्षा घेण्याच्या उद्योगास लागतो. त्यावेळीं ज्येष्ठ पुत्राला आपलें राज्य देऊन पुढें लिहिल्याप्रमाणें उपदेश करितोः—

त्वया न्यायधनेनाङ्ग भवितव्यं प्रजाधृतौ ।
प्रजा कामदुघा धेनुर्मता न्यायेन योजिता ॥ २७० ॥
राजवृत्तमिदं विद्धि यन्न्यायेन धनार्जनम् ।
वर्धनं रक्षणं चास्य तीर्थे च प्रतिपादनम् ॥ २७१ ॥
प्रजानां पालनार्थं च मतं मत्यनुपालनम् ।
मतिर्हिताहितज्ञानमात्रिकामुत्रिकार्थयोः ॥ २७२ ॥

ततः कृतेन्द्रियजयो वृद्धसंयोगसंपदा ।
धर्मार्थशास्त्रविज्ञाना पज्ञा संस्कर्तुमर्हसि ॥ २७३ ॥
अन्यथा विमातिर्भूपो युक्तायुक्तनभिज्ञकः ।
अन्यथाऽन्यैः प्रणेयः स्यान्मिथ्याज्ञानलवोद्धतै ॥२७४॥
स्यात्समञ्जसवृत्तित्वमप्यस्यात्मादिरक्षणे ।
असमञ्जसवृत्तो हि निजैरप्यभिभूयते ॥ २७९ ॥
समञ्जसत्वमस्येष्टं प्रजास्वविपमेक्षिता ।
आनृशंस्यमवाग्दण्डपारुष्यादिविशेपितम् ॥ २८० ॥
ततः क्षातमिमं धर्म यथोक्तमनुपालयन् ।
स्थितो राज्ये यशो धर्म विजयं च स्वमाप्नुहि ॥२८३॥

अर्थः--वा पुत्रा, तू न्यायधन ह्मणजे न्याय हेंच ज्याचें द्रव्य आहे असें व्हावेंस. कारण न्यायानें वागविलेली आपली ही प्रजा कामधेनु आहे! न्यायानें द्रव्य मिळविणें, तें न्यायानें वाढविणें, त्याचें सत्पात्रीं दान करणें हा राजाचा सदाचार होय. प्रजासरक्षणाकरिता मती (इहपरलोकातील हिताहित विपयाचें ज्ञान )चें रक्षण करणें इष्ट होय. तसेंच तू ज्ञानवृद्ध लोकाच्या सगतीनें धर्मशास्त्र व अर्थशास्त्र याचेंही विशेप ज्ञान सपादन कर कारण, ज्ञानशून्य व योग्यायोग्य न जाणणारा राजा मूर्ख लोकाकडून पाहिजे तसा वळविला जातो तसेंच वाळा, समजसपणानें वागणें हाही राजाचा आत्मरक्षणाचा उपाय आहे कारण, असमजसतेनें राजाचा आपल्या प्रजेकडूनही पराभव होतो ॥२६३॥ ठिकाणीं समजसपणा ह्मणजे क्रूरता, कठोर वो प्रजारक्षण करा

दंड करणें हें नसून प्रजेविषयीं समदृष्टि असणें हा होय. ह्याप्रमाणें क्षत्रियधर्म पालन करून तूं कीर्ति, धर्म व विजय ह्यांना मिळीव !! असा उपदेश करून, पुत्राला सर्वस्व देऊन व साम्राज्याचा त्याग करून तो राजर्षि वनांत जाण्याकरितां निघतो. नंतर हा भगवान् निर्वाण-दीक्षा घेतो. त्यावेळीं इंद्र आनंदानें त्याचें पूजन करितात.

४९ **योगसंमहः**—ज्ञान (केवलज्ञान) व ध्यान (शुक्लध्यान) ह्या दोहोंची जी एकत्र स्थिति तिचें नांव 'योग' व त्या योगामुळें उत्पन्न झालेलें जें सामर्थ्य तो 'मह' होय. अर्थात् ज्ञान व ध्यान ह्यांच्या एकत्र स्थितीनें प्राप्त झालेलें जें विलक्षण सामर्थ्य तीच योगसंमह क्रिया.

५० **आर्हत्यक्रियाः**— नंतर केवलज्ञानाची उत्पत्ति होण्याच्या प्रसंगीं अमरेंद्रानीं ज्याची पूजा केली आहे अशा ह्या क्षपकाला अर्हंतपणाची प्राप्ति होते. त्यावेळीं आठ प्रकारचें प्रातिहार्य, द्वादश सभा वगैरे सर्व बाह्य विभूतिही त्याला असतें हें निराळें सांगणें नकोच.

५१ **विहारः**—नंतर हा परमेष्ठी धर्मोपदेश करीत सर्व पृथ्वीवर विहार करितो. त्यावेळीं धर्मचक्र हें त्याच्यापुढें असतें.

५२ **योगत्यागः**—विहाराची समाप्ति, समवसरणसभेचा त्याग व योगनिरोधाची वृत्ति ह्या सर्वांला मिळून योगत्याग असें नांव आहे.

णाला प्राप्त झाला आहे व ज्यानें स्वभावतःच असलेली जी ऊर्ध्वगमनक्रिया तिचा आश्रय केला आहे अशा त्या जिनेश्वराची 'अग्रनिर्वृत्ति' नांवाची क्रिया होते.

या सर्व क्रिया भव्यजीवांनीं नेहमीं अवश्य विधिपूर्वक कराव्यात." याप्रमाणें भरतानें ह्या त्रेपन्न क्रियांचें थोडक्यांत स्पष्टपणें वर्णन करून, दीक्षान्वयक्रिया सांगण्यास आरंभ केला.

---

## पर्व ३९ वें.

### दीक्षाकर्त्रन्वयक्रियावर्णन.

भरतमनु ह्मणतातः— "अहो त्रैवर्णिकहो! दीक्षा घेतलेल्या साधूनें करण्याला योग्य अशा अवतारापासून निर्वाणापर्यंतच्या क्रिया मी तुह्मांला सांगतो त्या ऐका. 'व्रताधिकरणं दीक्षा।' ह्मणजे, व्रत करण्याचा अधिकार संपादन करणें ह्यास 'दीक्षा' असें ह्मणतात. १ दोषांचा संपूर्ण त्याग व २ दोषांतील एखाद्या अंशाचा त्याग असे व्रताचे दोन भेद आहेत; त्यांनाच अनुक्रमें महाव्रत व अणुव्रत अशा संज्ञा आहेत. आचार्यांनीं त्यांच्या व्याख्या केल्या आहेत. त्या अशाः—

महाव्रतं भवेत्कृत्स्नहिंसाद्यागोविवर्जनम् ।
विरतिः स्थूलहिंसादिदोषेभ्योऽणुव्रतं मतम् ॥

*अर्थः*— महाव्रत ह्मणजे सर्व प्रकारचें हिंसादि पातक न करणें; व स्थूलहिंसा न करणें हें अणुव्रत होय. हीं व्रतें

करण्याविषयीं प्रवृत्त झालेल्या पुरुषाचा जो आचार ती ' दीक्षा ' व त्या दीक्षेनंतरची जी क्रिया ती ' दीक्षान्वयक्रिया ' होय. या दीक्षान्वयक्रियेचे ४८ भेद आहेत. मोक्ष हें या क्रियांचें भावी फळ आहे. मी संक्षेपानें त्यांचें स्वरूप वर्णन करितों.

१. अवतार.—मिथ्यात्वानें दूषित झालेला व सन्मार्ग स्वीकारण्याविषयीं प्रवृत्त झालेला भव्यजीव एखाद्या योगींद्राजवळ किंवा गृहस्थाचार्यांजवळ जाऊन त्यास विचारतो कीं, ' महाराज, निर्दोष अशा धर्माचें स्वरूप मला सांगा. ' तेव्हां तो ज्ञानी त्याला ह्मणतो, " बाबारे, मोक्षमार्गाचें ज्ञान करून देणारें वचन जर आप्ताचें असेल, तरच तें सत्य आहे असें तूं समज. आता प्रथम आप्त कोणाला ह्मणावें हें मी तुला सांगतों.

विराग सर्ववित्सार्व सूक्तसूनृतपूतवाक् ।
आप्त सन्मार्गदेशी यस्तदाभासास्ततोपरे ॥

अर्थ—जो वीतराग, सर्वज्ञ व सर्वांचें कल्याण करणारा आहे, ज्याची वाणी युक्तियुक्त, सत्य व पवित्र आहे व जो, सन्मार्गाचा उपदेश करतो तोच आप्त होय. व बाकीचे फक्त त्यासारखे दिसणारे आहेत. आप्तवाक्य हें युक्ति व प्रमाण ह्यानीं युक्त असतें. व त्याच्या श्रवणापासून कसलाच संशय उत्पन्न होत नाहीं. ज्यांत दुराचाराचें खंडन व सदाचाराचें मंडन केलें आहे असें जें द्वादशांगयुक्त शास्त्र त्यास वेद असें ह्मणावें. आणि ज्यांत प्राणिहिंसा करण्याविषयीं सांगितलें

आहे तो वेद नसून दुष्टांची वाणी आहे असें समजावें. हिंसेचा निषेध करणारें तें पुराण होय. व तेंच खरें धर्मशास्त्रही होय.

हिंसादि दोषांचा त्याग करणें हींच गृहस्थाचीं षट्कर्में होत. गर्भाधानापासून निर्वाणापर्यंत ज्या धार्मिक सत्क्रिया सांगितल्या आहेत त्या क्रियांचे ठिकाणीं योजिले असतील तेच मंत्र होत. व हिंसेविषयीं जे मंत्र असतील ते दुष्टमंत्र समजावेत. *विश्वेश्वरी आदि देवता शांति करणाऱ्या देवता जाणाव्यात.* व ज्यांचें भोजन मांसानें होतें अशा ज्या कुदृष्टींच्या क्रूर देवता त्या त्याज्य होत. मांसावाचून भोजन करणें ही आहारासंबंधी शुद्धता समजावी. मांसभक्षक हे हिंसक असल्यामुळें सर्वघाती आहेत; अतएव त्यांना अशुद्ध मानावें. जे निष्काम, जितेंद्रिय व स्वदारसंतुष्ट आहेत त्यांचीच कामशुद्धि आहे असें समजावें. अशा प्रकारें ज्याचें मत निर्दोष आहे तोच आप्त होय; व त्यानें सांगितलेला जो धर्म तोच धर्म. आणि हितार्थी लोकांना तोच मोक्षाचें खरेंखरें साधन आहे." ह्याप्रमाणें त्या महात्म्यापासून किंवा गृहस्थाचार्यापासून उपदेश ऐकून, तो भव्य श्रावक दुर्मार्गावरील प्रेम टाकून देऊन सन्मार्गानुगामी होतो. त्यावेळीं त्या भव्य जीवास सदुपदेश करणारा जो गुरु तोच पिता, व त्यानें सांगितलेलें जें वरील तत्वज्ञान तोच संस्कारयुक्त असा गर्भ व त्या गर्भाचें ठिकाणीं तो भव्यात्मा हा खऱ्या धर्मज्ञानाची जी उत्पत्ति तिच्या रूपानें अवतीर्ण झाला आहे असें सम-

जावें. ही ह्या भव्यजीवाची अवतारक्रिया होय. आणि ती त्याच्या गर्भाधानक्रियेप्रमाणें मानिली आहे.

२ वृत्तलाभः— त्याचवेळीं सर्व व्रतें विधीनें ज्यानें ग्रहण केलीं आहेत अशा त्या गुरुचरणीं नम्र झालेल्या भव्य जीवाला ' वृत्तलाभ ' होतो.

३ स्थानलाभ—नंतर पूजाविधि करून ज्यानें उपोषण केलें आहे अशा ह्या भव्य श्रावकाची स्थानलाभ क्रिया होते. ह्यावेळीं श्रीजिनमंदिरांत पीठानें किंवा चंदनादिकांच्या गंधानें यथाविधि अष्टदल कमल काढावें; किंवा श्रीजिनसमवसरणसभा काढावी. मग विद्वान् उपाध्यायानें त्याची संपूर्ण पूजा केल्यावर, श्रीजिनप्रतिमेसमोर त्या श्रावकास बसवावें. व ' हे उपासका! ही तुझी दीक्षा आहे, तूं ह्या दीक्षेनें पवित्र झाला आहेस! ' असें ह्मणून जिनपूजेचा राहिलेला शेष त्याजकडून प्रसाद ह्मणून ग्रहण करवावा. नंतर उपाध्यायानें त्याला पंचनमोकार मंत्र सांगावा. व ' हा मंत्र सर्व पातकांपासून तुला पवित्र करो! ' असा आशिर्वाद द्यावा. मग त्याला पारणा करण्याकरितां घरीं पाठवून द्यावें.

४ गणग्रहः— ह्या क्रियेच्या वेळीं ' मिथ्यादेवतानो, आह्मीं इतका कालपर्यंत अज्ञानानें तुमची आदरपूर्वक पूजा केली. आता, आमच्या शास्त्रात सांगितलेल्या वीतराग व शांत अशा देवाचेंच आह्मीं पूजन केलें पाहिजे. " असें उपासकानें ह्मणून त्या मिथ्यादेवताना नेऊन कोठेंतरी टाकावें.

५ पूजाराध्यः—उपासकानें पूजा व उपोषण करून द्वादशांगाचा अर्थ श्रवण करावा.

६ पुण्ययज्ञः—त्यानें चवदा प्रकारच्या पूर्वविद्यांचा अर्थ ऐकावा व गुरूप्रमाणें वागावें.

७ दृढचर्याः—आपल्या सिद्धांत शास्त्रांचें संपूर्ण अध्ययन करून ह्या उपासकानें आणखी दुसऱ्यांचीं शास्त्रें वाचावींत. यावेळीं इतर ग्रंथांचेंही त्यानें अवलोकन करावें.

८ उपयोगिताः—अष्टमी, चतुर्दशी वगैरे पर्वतिथींस या उपासकानें रात्रीं प्रतिमायोग धारण करावा.

९ उपनीतिः—नंतर ह्यानें देव व गुरु यांच्या समक्ष वेष ( पांढरीं वस्त्रें व यज्ञोपवीत धारण करणें ), वृत्त ( षट्कर्मांच्या योगानें जीवन करणें ) व समय ( जैनोपासकाची दीक्षा घेणें ) हीं यथाविधि पाळावींत.

१० व्रतचर्याः—नंतर उपनीत झालेल्या ह्या श्रावकानें 'उपासकाचें सूत्र' या नांवाच्या ग्रंथाचें अर्थज्ञान करून घेऊन पठण करावें.

११ व्रतावतरणः—ज्यानें विद्याध्ययन संपविलें आहे अशा ह्या श्रावकानें पुनः गुरुसन्निध भूषणादिकांचें ग्रहण करावें.

१२ विवाहः—नंतर, या श्रावकाची विवाहक्रिया होते. आपल्या सहधर्मचारिणीला चांगले शास्त्रोक्त संस्कार व्हावेत अशी इच्छा करणाऱ्या या श्रावकानें तिला उत्तम व्रतें करण्याला आवश्यक अशी दीक्षा द्यावी. ही क्रिया सिद्धपूजनपूर्वक पूर्वीप्रमाणेंच सर्व करावी.

१३ वर्णलाभः—ह्या श्रावकानें ज्यांची वर्णलाभक्रिया झाली आहे अशा आपल्या सजातीय श्रावकांना बोलवून अशी विनंति करावी कीं, 'मी दीक्षाग्रहण केली असून उपासकव्रत घेतलेलें आहे. माझ्या व्रतांची शुद्धि व्हावी एतदर्थ मी उपनीतही झालों. तुह्मी जे माझे सधर्मीय त्यांच्या अनुग्रहानें व्रतधारी अशा मजला आज वर्णलाभ व्हावा हें युक्त आहे.' नंतर त्या श्रेष्ठ श्रावकांनीं त्याला वर्णलाभ क्रियेनें युक्त करावें.

१४ कुलचर्याः—आर्यांचीं षट्कर्में करून उपजीविका करणें.

१५ गृहीशिताः—व्रतें व अध्ययन हीं पुष्कळ झाल्यामुळें दुसऱ्यावर अनुग्रह करण्यास समर्थ झालेला व श्रुति, स्मृति व पुराण ह्यांत निष्णात झाल्यामुळें गृहस्थाचार्य झालेला तो श्रावक गृहीशितेला (गृहस्थाचार्यपदाला) धारण करितो.

१६ प्रशांतताः—अनेक प्रकारच्या उपवासादि भावना करूं लागलेल्या ह्या श्रावकाला 'प्रशांतता' क्रिया प्राप्त होते.

१७ गृहत्यागः—संसारशकट चालविण्यास समर्थ अशा पुत्राला योग्य तो बोध करून वैराग्य उत्पन्न झालेला हा श्रावक नंतर गृहत्याग करितो.

१८ दीक्षाद्यः—तपश्चरणाला योग्य अशा अरण्यांत ज्यानें गमन केलें आहे अशा त्या उपासकानें एक वस्त्र धारण करणें ही दीक्षाद्य क्रिया होय.

१९ जिनरूपताः—नंतर ह्यानें गणाधीश असलेल्या गुरूपासून दिगंबरपणाचा स्वीकार करावा.

२० दीक्षान्वयक्रियाः—बाकीच्या राहिलेल्या सर्व दीक्षान्वयक्रिया ह्या पूर्वी गर्भान्वयक्रियेंत जशा सांगितल्या आहेत तशाच ह्या ठिकाणींही विधिपूर्वक कराव्यात. हे त्रैवर्णिकहो! जो भव्य जीव ह्या क्रिया यथार्थपणें समजून घेऊन पाळितो तो लौकरच निश्चयानें मुक्त होतो. याप्रमाणें येथपर्यंत दीक्षान्वयक्रियांचें मी संक्षेपानें वर्णन केलें. आतां कर्त्रन्वयाक्रिया सांगतों. ह्या क्रिया ज्यांची मोक्षस्थिति अगदीं जवळ प्राप्त झाली आहे अशा भव्यजीवांना होतात.

१ सज्जातिः—निर्दोष कुल व जाति इत्यादिकांची जी प्राप्ति तिलाच 'सज्जाति' असें ह्मणतात. पित्याच्या वंशाची जी पवित्रता तिला 'कुल' व मातेच्या वंशाची जी पवित्रता तिला 'जाति' असें ह्मणतात. व ह्या दोहोंची जी शुद्धता तीच सज्जाति होय. ह्या क्रियेच्या योगानें आसन्नभव्यजीवाला दीक्षा घेण्यास योग्य अशा सद्वंशात शुद्ध असा नरदेह प्राप्त होतो. ही सज्जन्मप्राप्ति झाली असतां अनायासें प्राप्त झालेल्या गुणांच्या योगानें ज्ञान हें सहज प्राप्त होतें. येथपर्यंत सज्जातीचें देहोत्पत्तीच्या दृष्टीनें वर्णन केलें. आतां, मी संस्कारांनीं प्राप्त होणाऱ्या जन्माच्या योगानें दुसऱ्या एका सज्जातीचें वर्णन करितो. ही दुसरी सज्जाति प्राप्त झाली ह्मणजे ह्या भव्यात्म्याला द्विजत्व प्राप्त होतें. रत्न जसें घर्षणादि संस्काराच्या योगानें उत्कृष्टपणाला प्राप्त होतें, तसें आत्मा ह्या क्रिया व मंत्र ह्याच्या संस्कारांनीं उत्कर्ष पावतो. किंवा, सुवर्ण तप्त केल्यानें जसें शुद्ध होतें

तसें भव्यात्मा हा अनेक सत्कर्मे केल्यानें शुद्ध होतो. ज्यावेळीं हा पुण्यवान् जीव सर्वांविषयीं निःसंग होऊन सम्यग्ज्ञान मिळवितो त्यावेळीं हा भव्यजीव **परमज्ञानरूपी** गर्भापासून संस्काराच्या (हा संस्कार ज्ञानजन्य आहे.) स्वरूपानें उत्पन्न होतो. नंतर अनेक व्रतें व शील ह्यांनीं भूषित असा होत्साता, तो भव्यात्मा द्विजन्मा या नांवानें संबोधिला जातो. व्रतचिन्ह ह्मणून मंत्रपूर्वक असें त्याचें दोन प्रकारचें सूत्र ( द्रव्य व भाव ) असतें. गळ्यांतील तीन पदरांचें यज्ञोपवीत हें त्याचें द्रव्यसूत्र होय. व ह्याचें औपासिकसूत्र हें अंतःकरणावर उत्पन्न झालेल्या ज्ञान, दर्शन व चारित्र ह्या तीन गुणांनीं युक्त असें असल्यानें, तें भावसूत्र जाणावें. ज्यावेळीं हा भव्य जीव सर्व संस्कार प्राप्त झाल्यानें परमोत्कृष्ट अशा ब्रह्मभावाला प्राप्त होतो, त्यावेळीं सर्व आचार्य, अनेक आशीर्वादांनीं त्याचा सत्कार करून त्याच्याकडून श्रीजिनाची प्रसादभूत अशीं पुष्प, अक्षता वगैरे द्रव्यें ग्रहण करवितात. ह्यालाच स्थितिकरण ह्मणतात; हें परम धर्मप्रोत्सहनपर आहे. अयोनिसंभव व दिव्य अशा ज्ञानरूपी गर्भापासून उत्पन्न झालेलें असें हें जन्म प्राप्त होऊन, तो भव्यात्मा त्याच वेळीं सज्जातीनें युक्त होतो.

२ सद्गृहीत्वः—याप्रमाणें सज्जातीची प्राप्ति झाल्यानंतर, आर्यांच्या षट्कर्मांचें आचरण करणारा हा उपासक सद्गृहस्थत्वाचें सेवन करितो. निर्दोष आचरण करणारे जैन हेच गृहमेधी ( श्रेष्ठ गृहस्थ ) होत. हे देवद्विजे शुद्धवर्गांतील होत.

ज्यांचीं कर्में दोषयुक्त व पापमय आहेत, जे दुष्ट उद्योगामध्यें गढून गेलेले आहेत आणि खाटिकाप्रमाणें नित्य हिंसाकर्म करून जे आपल्यास द्विज मानणारे आहेत ते खरे द्विज नसून कृष्णवर्गांतील कर्मचांडाल होत. ह्मणून, अत्यंत शुद्धवृत्ति ठेवणारे जैन हेच सर्व वर्णांत उत्तम द्विज होत. आतां, शुद्धता व अशुद्धता हे धर्म न्याय व अन्याय ह्या दोहोंच्या योगानें होणाऱ्या दोन प्रकारच्या प्रवृत्तीवरून समजावेत. '**न्यायो दयार्द्रवृत्तित्वमन्यायः प्राणिमारणम्।**' ह्यांत न्याय ह्मणजे दयार्द्रवृत्ति असणें व अन्याय ह्मणजे जीवांची हिंसा करणें. ह्यावर कोणी शंका घेईल कीं, आर्यांचीं षट्कर्में करून उपजीविका करणाऱ्या जैन गृहस्थद्विजांना सुद्धां हिंसा ही त्या कर्माबरोबरच करावी लागते. या शंकेच्या निरसनार्थ आचार्य ह्मणतात कीं, षट्कर्में करितांना हिंसादि निंद्य व्यापार करावे लागतात ही गोष्ट खरी आहे. तथापि, ज्यांच्या हातून ते व्यापार षट्कर्मांत सहज घडतात त्यांची शुद्धि पक्ष, चर्या व साधन या तीनप्रकारच्या साधनानीं होते. हीं तीन साधनें असतांना, जैनद्विजांना हिंसेचा स्पर्श देखील होत नाहीं.

करितां अथवा जिव्हालौल्याकरितां मी हिंसा करणार नाहीं अशा प्रकारचा हिंसात्याग होय. तसा त्याग केल्यावर, जी हिंसा इच्छेवांचून झाली असेल तिच्यापासून प्रायश्चित्तांच्या योगानें शुद्धि केली जाते. याप्रमाणें शुद्धि झाल्यानंतर पुत्रावर संसारभार टाकून गृहत्याग करणें ही गृहस्थाची चर्या होय.

**साधन** ह्मणजे मरणसमयीं देहाला इष्ट असलेला आहार व क्रिया ह्यांचा त्याग करून ध्यानशुद्धीच्या योगानें आत्म्याची शुद्धि करणें हें होय. या तीन शास्त्रोक्त साधनांमुळें जैन-द्विजांची शुद्धि होते. अर्थात् त्यांना हिंसेचें पातक लागत नाहीं.

याप्रमाणें जैनांवर इतरांनीं केलेल्या दोषारोपांचें निराकरण होतें. अस्तु. सारांश, आपल्या आत्म्याला सद्गुणांनीं वाढविणें ह्यास सद्गृहीत्व ( उत्तम गृहस्थपणा ) ह्मणतात.

३ पारिव्राज्य (यतीधर्म):— गृहस्थधर्माप्रमाणें वागून, उपरति झालेल्या श्रावकाचें जें दीक्षाग्रहण तेंच पारिव्राज्य (संन्यास) होय. ज्याचें कुल व गोत्र शुद्ध आहे, जो सदाचारसंपन्न आहे व ज्याचें शरीर सुदृढ आहे असा बुद्धिमान् श्रावकच दीक्षा घेण्यास योग्य आहे. त्यानें एखाद्या निर्ग्रंथाचार्याजवळ जाऊन शुभ मुहूर्तावर दीक्षा घ्यावी. मुनीनें त्या दीक्षेंत निर्ममत्ववृत्तीनें दिगंबरस्वरूपाचा स्वीकार करावा; जिनेंद्राच्या स्वरूपाचें नित्य चिंतन करावें. आपणाला जें जें प्रिय असेल त्यांचा त्यानें त्याग करावा; ह्मणजे त्याची ती तपश्चर्या त्याला जें प्रिय असेल तें सर्व देऊन शेवटीं जिनाची जाति व जिनाची मूर्ति (देह) ह्यांचीही प्राप्ति करून देते. सारांश, उपासकसूत्रांत सांगितलेली श्रीजिनें-

द्राची श्रेष्ठ आज्ञा प्रमाण मानून, ह्या मुनीची तपश्चर्या करण्याविषयीं जी प्रवृत्ति होणें तीच खरी पारिव्राज्य क्रिया होय.

४ **सुरेंद्रता:**—पारिव्राज्य क्रियेची फलोत्पत्ती झाल्यामुळें जी देवेंद्रपदाची प्राप्ति होते तीच ही सुरेंद्रता नांवाची क्रिया होय.

५ **साम्राज्य:**—ज्यांत प्रथम चक्ररत्नाची प्राप्ति होऊन नंतर निधिरत्नापासून उत्पन्न होणारीं अनेक सुखें प्राप्त होतात असा जो सार्वभौमराजेपणा तीला साम्राज्य क्रिया ह्मणतात.

६ **परमार्हंत्य:**—आर्हंत्य ह्मणजे अर्हंताचा धर्म किंवा अर्हंताचें कर्म होय. स्वर्गावरून अवतीर्ण झालेल्या तीर्थंकराला जी ही कल्याणसंपत्तीची प्राप्ति, तेंच आर्हंत्य समजावें.

७ **परमनिर्वाण:**—संसारबंधापासून मुक्त झालेल्या परमात्म्याची जी अवस्था ती परिनिर्वृत्ति ( परमनिर्वाण ) क्रिया होय. संपूर्ण कर्मरूपी मलाचा नाश झाल्यानंतर अंतरात्म्याची जी शुद्धि होते, तीच ' सिद्धि ' होय. व तिलाच 'स्वात्मोपलब्धि' असें ही ह्मणतात. जीवाचें नाहींसें होणें किंवा आत्म्याच्या सुखादिगुणांचा नाश होणें ही सिद्धि ( मुक्ति ) नव्हे. "

ह्याप्रमाणें आगमाला अनुसरून भरतानें सात कर्त्रन्वयक्रिया सांगितल्या. जो कोणी भव्यजीव वर सांगितलेल्या तीन्ही प्रकारच्या ह्या क्रिया करितो, तो जन्म, जरा व मरण यांचा नाश करून मुक्त होतो. भव्यजीव प्रथम सज्जातींत जन्म घेऊन, उत्कृष्ट असा श्रावक ( गृहस्थ ) धर्म पाळितो; नंतर गुरूच्या आज्ञेनें सर्वोत्कृष्ट अशी संन्यासदीक्षा घेऊन मरणानंतर स्वर्गाला

जातो. त्याठिकाणीं इंद्राची संपत्ती मिळवून व तिचा यथेच्छ उपभोग घेऊन, तेथून तो खालीं अवतीर्ण होऊन चक्रवर्ती होतो. तदनंतर आर्हंत्यपदाची प्राप्ति करून घेतल्यानें संपूर्ण ऐश्वर्यानें युक्त होऊन तो भव्यात्मा मुक्तिस्थानीं प्राप्त होतो.

## पर्व ४० वें.

### द्विजोत्पत्तौ क्रियामन्त्रानुवर्णन.

नंतर भरतानें या सर्व क्रियाच्या अनुष्ठानाकरितां मंत्ररचना सागितली. कारण, योग्याची क्रियासिद्धि मन्त्रावरच अवलंबून असतें. गर्भाधान वगैरे क्रियाच्या [1]आरंभीं प्रथम तीन छत्रें, तीन चक्रें व तीन अग्नि हीं स्थापन करावीं. वेदीवर जिन-प्रतिमा विधिपूर्वक स्थापन कराव्या. तेथें त्या छत्रत्रयादिकाची पूजा विधीयुक्त व मंत्रपूर्वक करावी. त्या मन्त्रानीं गर्भाधान वगैरे क्रियाविधानात सिद्धपूजा करावी. गणधरानीं रचिलेल्या उपासक सूत्रात हे साधनमत्र ह्मणून सागितले आहेत. ह्मणजे, या मंत्रानीं क्रिया सिद्ध होतात. उपनयनानें संस्कृत झालेल्या द्विजाचीं शिरोलिंग ( शिखा ), उरोलिंग ( यज्ञोपवीत ), कटिलिंग ( कडदोरा ), व ऊरुलिंग ( नेसावयाचें वस्त्र ) हीं चार-चिन्हें आहेत. आता उपजीविकेचें साधन सागतो. धर्मानें वागणाऱ्या

---

**टीप:**— १ जिज्ञासु वाचरानीं हे मत्र मूळ महापुराणात पाहवेत, विस्तारभयास्तव ते येथें देता आले नाहींत

सम्यग्दृष्टि द्विजांची उपजीविका असिवृत्ति ( शस्त्र चालविणें ), मषीवृत्ति ( लिहिणें ), कृषिवृत्ति ( शेतकी ) व वणिग्वृत्ति ( व्यापार ) ह्याच्या योगानें होतें. एखाद्या त्रैवर्णिकाचें कुल दुर्भिक्षामुळें अथवा परकीय राजाच्या त्रासामुळें भ्रष्ट झालें असून, त्यानें जर आपलें कुल पुढें शुद्ध केलें, तर त्याच्या पुत्रपौत्रादि संततीच्या ठिकाणीं उपनयन संस्कार करण्यास शास्त्राची हरकत नाहीं. तसेंच, द्विजांनीं खालील शास्त्रोक्त नियमही अवश्य पाळावेत.

स्यान्निरामिषभोजित्वं कुलस्त्रीसेवनव्रतम् ।
अनारम्भवधोत्सर्गो ह्यभक्ष्यापेयवर्जनम् ॥

अर्थः—मांसभक्षण करूं नये. आपल्या विवाहित स्त्रीच्या ठिकाणींच रति करावी. अन्यस्त्रीसंग वर्ज्य करावा. शेतकी व व्यापार ह्यांशिवाय अन्यत्र होणाऱ्या हिंसेचा त्याग करावा. अभक्ष्यभक्षण करूं नये. मद्य वगैरे अपेय पदार्थ पिऊं नयेत. असा द्विजांचा (ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांचा) धर्म समजावा. द्विजानें उपासकसंग्रहांत सांगितलेले १ अतिबालविद्या, २ कुलावधि, ३ वर्णोत्तमत्व, ४ पात्रता, ५ सृष्ट्यधिकारिता, ६ व्यवहारेशिता, ७ अवध्यत्व, ८ अदण्ड्यत्व, ९ मानार्हता व १० प्रजासंबंधांतर हे दहा अधिकार प्राप्त करून घ्यावेत. बालपणापासून विद्या शिकण्याचा जो उद्योग ती अतिबालविद्या होय. द्विजानें बालपणांतच उपासकाचाराचें अध्ययन करावें. त्यायोगें तो मिथ्यात्वी होणार नाहीं. ब्राह्मणानें आपल्या कुलाचाराचें रक्षण करणें हा कुलावधि होय. वर्णोत्तमत्व (सर्व-

वर्णीत श्रेष्ठपणा ) हें ह्या द्विजवर्गाचें महत्व आहे. सद्गुणांच्या गौरवामुळें जी पात्रता तें ह्याचें प्रदानार्हत्व होय. ह्मणून, फक्त सद्गुणामुळेंच प्राप्त होणारी जी पात्रता ती द्विजानें आपल्या ठिकाणीं बळकट करावी. तसेंच, त्यानें सद्दृष्टी अशा जिनांनीं मानिलेल्या सनातन अशा धर्मसृष्टीच्या प्रकाराचें रक्षण केलें पाहिजे. हा ह्या वर्गाचा सृष्ट्यधिकार आहे. द्विजाचा प्रायश्चित्तादिकर्माविषयीं जो स्वतंत्रपणा तीच ह्याची व्यवहारेशिता होय. ही व्यवहारेशिता जर ब्राह्मणामध्यें नसेल तर तो स्वतःला व दुसऱ्याला शुद्ध करण्यास योग्य होत नाहीं. दुसऱ्याकडून आपण शुद्ध होण्याची इच्छा करणारा ब्राह्मण सर्वत्र तिरस्कारार्ह होतो. हा द्विजवर्ग अवध्याधिकाराविषयींही योग्य आहे. कारण, स्वतःच्या सद्गुणाच्या उत्कर्षामुळें ब्राह्मण वध करण्यास योग्य होत नाहीं. आपल्या ठिकाणीं अधिक गुणाचें अस्तित्व दाखविणाऱ्या या इंद्रियनिग्रही ब्राह्मणाला अदंड्यत्वाधिकारही आहे. कारण, धर्मानें वागणारा मनुष्यच दुसऱ्यास दंड करण्यास समर्थ होतो. ब्राह्मणाला स्वतः धर्मज्ञान असून तो त्याप्रमाणें वागत असल्यामुळें दंड करण्यास योग्य नाहीं. नववा मानार्हत्वाधिकार आहे. ब्राह्मणानें मान्यत्व हा गुण प्रयत्नानें आपल्या ठिकाणीं आणावा. त्याविषयीं प्रयत्न ह्मणजे ज्ञान व सदाचार ह्यांचें आधिक्य संपादन करणें हाच होय. उघडच आहे कीं, जो गुणांनीं अधिक असतो तो सर्वत्र सर्वप्रकारें सर्वांनाच वंदनीय होतो. अन्य धर्मीयांशीं संबंध जरी आला तथापि

हत्तीच्या भारानें ज्याची पाठ मोडून गेली आहे असा अश्व पाहिलास. त्याचें फल दुष्पमकालातील साधु तपश्चर्येचा संपूर्ण भार सोसण्यास समर्थ होणार नाहींत असें आहे. कित्येक साधु मूलगुण व उत्तरगुण न समजल्यानें सदाचारापासून भ्रष्ट होतील. वाळलेलीं पानें भक्षण करणाऱ्या मेंढराचा कळप पाहिल्यानें, मनुष्यें सदाचाराचा त्याग करून दुराचारी होतील. गजेंद्राच्या मानेवर बसलेला वानर पाहिल्यानें, प्राचीन क्षत्रियाच्या वंशाचा नाश होऊन अकुलीन घराण्यांतील लोक पृथ्वीचें पालन करतील. तूं स्वप्नात कावळ्यांनीं घुबडांना गांजलेलें पाहिलेंस. त्याचा अर्थ असा कीं, लोक जैनमुनीला सोडून, धर्माच्या इच्छेनें अन्य मतातील साधूंचे अनुयायी होतील. तसेंच, तूं नर्तन करणारीं अनेक भूतें पाहिलींस. त्यायोगें, सर्व लोक व्यंतरदेवाना आप्त ह्या बुद्धीनें नामस्मरणपूजनादिकांच्या योगानें भजतील. मध्यभागीं वाळलेल्या सरोवराच्या काठाजवळ पाणी असलेलें पाहिल्यानें, धर्म आर्यभूमीपासून च्युत होऊन म्लेंच्छदेशातील लोकांत राहील. तूं धुरळ्यानें मळकट झालेली रत्नराशि पाहिलीस. पंचम कालात तपोवृद्ध मुनि दिसणार नाहींत असें हें स्वप्न सुचवितें. श्वानाची पूजा करून लोक आदरानें त्याला अनेक प्रकारचे चरु खावयास देत आहेत असें त्वां स्वप्नांत पाहिलेंस. त्याचा अर्थ हा कीं, लोक अव्रती ब्राह्मणांचा सत्पात्रयतीप्रमाणें सत्कार करतील. मोठ्यानें डरकण्या फोडणाऱ्या तरुण बैलाची क्रीडा पाहिल्यानें, लोक फक्त तारु-

ण्यावस्थेंत योग्यांच्या मार्गानें वागतील. दुसऱ्या अवस्थेंत अर्थात् वृद्धपणांत ते त्याप्रमाणें वागणार नाहीत. परिवेषानें (खळ्यानें) युक्त असा चंद्र त्वां पाहिला; हें स्वप्न असें सुचवितें कीं, तपस्वीजनांना मनःपर्यय व अवधि हीं ज्ञानें उत्पन्न होणार नाहींत. शोभाविहिन वृषभांची जोडी मिळून जात आहे असें तूं स्वप्नांत पाहिलेंस. त्याचा अर्थ असा कीं, एकमेकांच्या सहवासामुळें मुनी हे एकीनें विहार करणार नाहीत. मेघाच्छादित सूर्याच्या दर्शनामुळें, पंचमकालांत केवलज्ञानरूपी सूर्याचा उदय बहुतकरून होणार नाहीं. शुष्क वृक्ष पाहिल्यानें पुरुष व स्त्रिया सदाचारापासून च्युत होतील. व भरता! शेवटीं तूं स्वप्नांत जीर्ण पर्णे अवलोकन केलींस. मोठमोठ्या वनस्पतींचे रस नाहींसे होतील असें तें स्वप्न सुचवितें. तूं पाहिलेल्या स्वप्नांची ही फलश्रुति मी आतां सांगितली. त्यांच्यापासून आज कोणताही दोष नसून त्यांचें फल युगांतरीं होणारें आहे. अस्तु. वत्सा! सर्व प्रकारच्या विघ्नांची शांति होण्याकरितां, तूं धर्माचें ठिकाणीं दृढ बुद्धि धारण कर."

ह्याप्रमाणें सर्वज्ञ पित्याचें भाषण ऐकून, तो वर्णाश्रम-प्रतिपालक राजाधिराज भरत फार संतुष्ट झाला. नंतर तो श्रीजिनास पुनः पुनः नमस्कार करून व त्याची परवानगी घेऊन आपल्या अयोध्या नगरीला परत गेला. तेथें त्यानें दुःस्वप्नांपासून उत्पन्न होणाऱ्या अनिष्टाच्या शांतीकरितां जिनाभिषेक, सत्पात्रीं दान वगैरे पुण्याचरणांच्या

योगानें शांतिकर्म केलें. याप्रसंगीं या दानशूर सार्वभौम भूपतीनें महामुनींची पूजा केली; व मोठमोठालीं दानें देऊन सर्वांना संतुष्ट केलें. भरताची प्रजा ही त्याच्याप्रमाणेंच धर्मनिष्ठ होती हें योग्यच आहे. कारण आचार्यांनीं ह्मटलें आहेः-

**धर्मशीले महीपाले यान्ति तच्छीलतां प्रजाः ।**
**अताच्छील्यमतच्छीले यथा राजा तथा प्रजाः ॥ ९७॥**

अर्थः— राजा जर धर्मशील असेल, तर प्रजाही त्या स्वभावाची होते; व राजा जर धर्मशील नसेल तर प्रजाही तशीच होते. कारण जसा राजा असतो तशीच प्रजाही होते. सम्राट् भरत हा धार्मिक लोकांचा आदरसत्कार करतो अशी त्याची सर्वत्र ख्याति पसरली होती. त्यायोगें तत्कालीन सर्व प्रजाही धर्माविषयीं अत्यंत प्रेम करीत असे. सर्व मांडलिक राजेही भरत हा वंद्य व अनुकरणीय पुरुष आहे असें मानून त्याच्याप्रमाणेंच आपला वर्तनक्रम व आचार ठेवण्याचा प्रयत्न करीत असत. चक्ररत्नाच्या सामर्थ्यानें, काम व अर्थ हे दोन्ही पुरुषार्थ त्याच्या ताब्यांत आले असून त्यांची सिद्धिही त्याला प्राप्त झाली होती. त्यामुळें त्यानें आतां तिसरा पुरुषार्थ जो धर्म त्याचें ठिकाणीं एकाग्रता धारण केली. धर्माचरणाचा प्रकार कसा असतो याचें वर्णन आचार्य खालील श्लोकात करितात.—

**दानं पूजां च शीलं च दिने पर्वण्युपोषितम् ।**
**धर्मश्चतुर्विधः सोऽयमाम्नातो गृहमेधिनाम् ॥ १०४ ॥**

अर्थः—दान करणें, पूजा करणें, शील पाळणें व पर्व-

तिथींच्या दिवशीं उपोषण करणें असा चार प्रकारचा गृहस्थाचा धर्म सांगितला आहे. नऊ पुण्यें व सात गुण यांनीं युक्त असलेला तो राजाधिराज भरत नित्य आहार दान देत असे. तसेंच भयभीत प्राण्यांना अभयदान, रोग्यांना औषधदान व जनतेला ज्ञानदान देऊन तो त्या त्या लोकांचा नित्य परामर्ष घेत असे. पूज्य पुरुषांची पूजा केल्यानें आपल्याला पूज्यपणा प्राप्त होतो असा विचार करून, तो त्यांचा मोठा आदरसत्कार करित असे. जिनबिंबें, जिनमंदिरें वगैरे नवीन तयार करून तो नित्य महापूजा करितें असे. यत्नानें शील पाळिलें असतां, तें आत्म्यानें रक्षण करितें अर्थात् तें जीवाचा अध पात होऊं देत नाहीं असें जाणून त्याची शील पाळण्याविषयीं प्रवृत्ति दृढ झाली. 'व्रतानुपालनं शीलं।' ह्मणजे व्रतें पाळणें ह्यालाच शील ह्मणतात. स्थूलहिंसेचा त्याग वगैरे व्रतांचें पूर्वीं वर्णन आलेंच आहे. जिनमंदिरांत निश्चल अंतःकरणानें बसलेला भरतराजा हा मुनीप्रमाणें सामायिकाच्या वेळीं आचरण करीत असे. सारांश, निर्दोषपणें व्रतें पाळणारा हा भरतचक्रवर्ती गृहस्थामध्यें अग्रगण्य झाला. प्रथम धर्माचा विचार करूनच तो कोणतीही क्रिया करीत असे. प्रातःकालीं उठून पहिल्यानें गुरु

---

**टीप** —१ प्रतिग्रहण, २ उच्चस्थानदान, ३ पादधावन, ४ पूजन, ५ प्रणाम, ६ मन शुद्धि, ७ वाक्शुद्धि, ८ कायशुद्धि व ९ आहारशुद्धि हीं नऊ पुण्यें होत.

**टीप** —२ श्रद्धा, भक्ति, विज्ञान, निर्लोभता, दया, क्षमा व शांति हे सात गुण होत.

व देवता यांचें पूजन करून, नंतर तो भूपति धार्मिक लोकां-सहवर्तमान धर्माचा विचार करित असे. तदनंतर तो इतर कार्यांकडे लक्ष देत असे; दोन प्रहरीं भोजन झाल्यावर विद्वान् लोकांबरोबर तो ज्ञानविषयक गोष्टींची चर्चा करित असे. तो विद्वान् राजा कधीं कधीं राजपुत्रांना समजण्याकरितां चार राजविद्यांचें व्याख्यान देत असे. १ न्याय करण्याचें शास्त्र; २ त्रयी ह्मणजे वृद्धि (संपत्ति वाढविणें), क्षय (संपत्तीचा नाश) व स्थान (राहण्याचें ठिकाण) ह्या तीन्हींबद्दलचें शास्त्र; ३ वार्ता ह्मणजे दुसऱ्या राज्यांतील गुप्त बातमी मिळविण्याचें शास्त्र; व ४ दंडनीति ह्मणजे अपराध्यास शिक्षा देण्याचें शास्त्र; ह्या चार शास्त्रांना राजविद्या असें ह्मणतात. एखादेवेळीं कोणाला धर्मशास्त्रांत विरोध आहे अशी शंका

अनुपमेय सुखाचा एकटाच उपभोग घेणारा, आपल्या देशांतून दुर्नीतीचें उच्चाटन करणारा, अर्थ व काम ह्याची न्यायानेंच प्राप्ती करून घेणारा आणि शस्त्रविद्येंत व शास्त्रांत निष्णात असा तो उत्कर्षशाली राजर्षि जिनभक्तामध्यें अग्रेसर झाला.

---

## पर्व ४२ वें.

### भरतराजवर्णाश्रमस्थितिप्रतिपादन.



त दनंतर एके दिवशीं श्रीमान् भरतेश्वरानें राजसभेंत जमलेल्या सर्व राजांना क्षात्रधर्माचा पुढें लिहिल्याप्रमाणें उपदेश केला —

" क्षत्रियश्रेष्ठ हो ! आद्य प्रजापतीनें तुह्माला न्याय रक्षणाच्या कामावर नेमिलें आहे. कुलपालन, मतिपालन, आत्मपालन, प्रजापालन व समजसपणा असा पाच प्रकारचा क्षत्रियांचा आचार सांगितला आहे. तो ऐकून शास्त्रानुसार प्रजेच्या कल्याणाविषयीं तुह्मी प्रवृत्त व्हा. त्यांत कुलानुपालन ह्मणजे कुलाम्नायाचें रक्षण होय. आपल्या कुलाला योग्य असलेल्या सदाचाराचें सर्व प्रकारें रक्षण करणें हें त्याचें स्वरूप आहे. आतां कुलाम्नायाचें थोडें विस्तारपूर्वक

आणिलें. सुलोचनेच्या निमित्तानें एकत्र जमलेले सर्व राजे व विद्याधर ह्यांच्या योगानें तो अकंपन राजा चक्रवर्तीप्रमाणे भाग्यवान दिसूं लागला. 'पूर्वी संपादन केलेल्या धर्माचेंच हें सर्व फल आहे; ह्मणून प्रथम ह्या धर्मांचें पूजन केलें पाहिजे' असा विचार करून त्या विद्वद्वर अकंपन राजानें श्रीजिनेंद्राची पूजा केली व याचकांची इच्छा तृप्त करून त्यानें त्यांना संतुष्ट केलें. नंतर सुलोचनेचा विवाहोत्सव जाहीर करणारा नगारा वाजविला. त्यासमयीं त्या वाराणसी नगरींत चैतन्य असलेले सर्व प्राणी अंतर्बाह्य आनंदी झाले होते ह्यांत मोठेसें आश्चर्य नाहीं. कारण, अचेतन अशा भिंती वगैरे वस्तु सुद्धां आपल्या उत्कृष्ट अलंकरणामुळें चैतन्य असलेल्या वस्तुप्रमाणेंच आनंदित दिसत होत्या.

विवाहविधि जाणणाऱ्या स्त्रियांनीं सुप्रभादेवीच्या आज्ञेनें सुलोचनेला सुशोभित अशा त्या विवाहमंडपांत आणून, एका सुवर्णाच्या पाटावर पूर्वेकडे तोंड करून बसविलें; नंतर ज्यांच्या तोंडावर अधरोष्ठाप्रमाणें शोभणारे कोमल पल्लव ठेविले आहेत अशा शुद्ध जलांनीं भरलेल्या सुवर्णाच्या कलशांनीं त्यांनीं तिला मंगल स्नान घालून व रेशमी वस्त्रें नेसवून मंगलकारक अलंकार घातले. तदनंतर तिला 'नित्यमनोहर' नांवाच्या जिनमंदिरांत नेलें. तेथें सर्व प्रकारचें कल्याण करणाऱ्या श्रीअर्हंताची भक्तीनें पूजा करून, आशीर्वादपूर्वक तिच्या मस्तकावर अक्षता टाकून, त्या स्त्रिया तेथें सुमुहूर्ताची वाट पाहात आदरानें बसल्या.

त्यावेळीं इकडे विवाहमंडपांत मनुष्यांचे व विद्याधरांचे राजे 'आपणालाच सुलोचन आतां वरणार' अशा आशेनें आपापल्याला

वस्त्रालंकारांनीं सुशोभित करून बसले होते. वाचकहो, 'आशा हि महती नृणाम्' ह्मणजे, जीवाची आशा फार मोठी असते हें यावरून उघड होतें. अस्तु. नंतर पृथ्वीपति अकंपनराजा सुप्रभा राणीसहवर्तमान त्या स्वयंवरमंडपांत आला. तदनंतर हेमांगदानें सुलोचनेला रथांत बसवून तेथें आणिलें. जेव्हां सुलोचनेनें त्या भव्य स्वयंवरमंडपांत प्रवेश केला तेव्हां मेघाच्या वृष्टीनें जसे चातक पक्षी संतुष्ट होतात त्याप्रमाणें त्या सुलोचनेच्या अवलोकनानें ते राजे संतोष पावले. हें योग्यच आहे. कारण, 'आल्हादः कस्य वा न स्यादीप्सितार्थसमागमे ।' अर्थात् इष्ट वस्तूची प्राप्ति झाली असतां कोणाला बरें संतोष होणार नाहीं? ती सुलोचना देखील तेथें जमलेल्या सर्व राजांकडे व विद्याधराधिपतींकडे पाहून आपल्या सौंदर्य वगैरे ऐश्वर्याच्या अभिमानामुळें फारच तुष्ट झाली. येथें आचार्य ह्मणतातः—'श्लाघ्यं तद्योषितां पुंसां शौर्यं वा निर्जितद्विषाम् ।' ह्मणजे, शत्रूला ज्यांनीं जिंकिलें आहे अशा पुरुषांचें शौर्य ज्याप्रमाणें स्तुति करण्यासारखें असतें, त्याप्रमाणेंच स्त्रियांचें सौंदर्य हेंही श्लाघ्य आहे. त्यावेळीं सर्व लोक आपापल्या समजुतीप्रमाणें तिच्या अनुपमेय लावण्याची वाखाणणी करूं लागले. श्रीगुणभद्राचार्य सुलोचनेबद्दल ह्मणतातः—

रत्नाकरत्वदुर्गर्वमम्बुधिः श्रयते वृथा ।
कन्यारत्नमिदं यत्र तयोरेतद्विराजते ॥

अर्थात्ः—समुद्र हा 'रत्नाकरपणाचा' दुष्ट गर्व व्यर्थ धारण करीत आहे. वास्तविक विचार केला असतां हें कन्या

रत्न ज्याठिकाणीं उत्पन्न झालें त्यांनाच तो रत्नाकरपणा शोभतो. याप्रमाणें चोहोंकडून तिचें सौंदर्य, पुण्य, ऐश्वर्य, स्वरूप, विभूति इत्यादि गोष्टीसंबंधानें स्तुति चालली असता, सुलोचना सिंहासनावरून लक्ष्मीप्रमाणें खालीं उतरून विवाहमंडपांत आली. तेव्हां महेंद्रदत्त सारथी रत्नमाला हातांत धरून तिला ह्मणतोः—

" वत्से ! हे सर्व विद्याधरांचे राजे विद्या, शौर्य व संपत्ति इत्यादि गुणांनीं शोभणारे असे आहेत. करितां, तूं ह्यापैकीं एखादा पति वर." कंचुकीनें सांगितलेलीं तीं नावें ऐकून सुलोचना त्या सर्वांना टाकून पुढें गेली. उघडच आहे कीं 'रुचिर्भिन्ना

"वत्से! हा सोमप्रभराजाचा पुत्र जयकुमार होय. ह्याचें स्वरूप मदनाच्या रूपाचाही अतिक्रम करणारें असल्यामुळें व तें तूं प्रत्यक्ष पाहत असल्यामुळें वर्णन करावयास नकोच. कारण, 'स दर्पणोऽर्पणीयः किं करकंकणदर्शने ।' ह्मणजे हातांतील काकण पहावयास आरसा द्यावा लागतो काय? कुमारानें उत्तरेकडील भरतक्षेत्रांत मेघकुमार नांवाच्या देवांना जिंकिलें ह्मणून ह्याला 'मेघनाद' ह्मणतात. निधिपति भरतराजानें ह्याला वीरपट्ट (शिरपेज) बांधून ह्याचें 'मेघस्वर' असें नांव ठेविलें. ह्याचे गुण त्रैलोक्यांतील जीवांच्या अंतःकरणाला संतुष्ट करून ह्यावेळीं सर्वप्रकारें तुझ्या अंतःकरणानें रंजन करण्याकरितां परतून आले आहेत हा मोठा चमत्कार होय. ज्याचा विजय सर्वत्र प्रसिद्ध आहे असा हा कुमार तूं नुसती उत्पन्न झाल्यानेंच जिंकला गेला आहे. ह्मणून ह्या ठिकाणीं हा जय तुला न्यायानेंच प्राप्त झाला आहे. आतां तूं आपल्या कटाक्षरूपी बाणांनीं जिंकलेल्या ह्या कुमाराला रत्नमालेनें गळ्यांत बांधून आपल्या हातांत धर! बाळे! जयलक्ष्मी तुझीच होऊं दे!" कंचुकीचें हें भाषण ऐकून त्यावेळीं पूर्वजन्मींचें प्रेम, जयकुमाराची नेत्रापुढें दिसणारी सुंदर आकृति, कुंदपुष्पाप्रमाणें त्याची कांति, आजपर्यंत ऐकलेले त्याचे सद्गुण व मदन इतक्यांनीं मिळून बला-

---

१ टीपः—येथें श्रीगुणभद्रकवि ह्मणतातः—

अवधूतः पुराऽनङ्गः सम्प्रति स्वीकृतोऽनया ।
प्रयोजनवशात्प्राज्ञैः प्रास्तोऽपि परिगृह्यते ॥

अर्थः—पूर्वी तिरस्कार केलेला मदन सुलोचनेनें त्यावेळीं पुन्हां जवळ केला. कारण, शहाणे लोक हाकून दिलेल्या मनुष्याचाहि कांहीं कार्याकरितां संग्रह करित असतात.

रत्न ज्याठिकाणीं उत्पन्न झालें त्यांनाच तो रत्नाकरपणा शोभतो. याप्रमाणें चोहोंकडून तिचें सौंदर्य, पुण्य, ऐश्वर्य, स्वरूप, विभूति इत्यादि गोष्टीसंबंधानें स्तुति चालली असतां, सुलोचना सिंहासनावरून लक्ष्मीप्रमाणें खालीं उतरून विवाहमंडपात आली. तेव्हां महेंद्रदत्त सारथी रत्नमाला हातांत धरून तिला ह्मणतोः-

" वत्से ! हे सर्व विद्याधरांचे राजे विद्या, शौर्य व संपत्ति इत्यादि गुणांनीं शोभणारे असे आहेत. करितां, तूं ह्यांपैकीं एखादा पति वर." कंचुकीनें सांगितलेलीं तीं नांवें ऐकून सुलोचना त्या सर्वांना टाकून पुढें गेली. उघडच आहे कीं '**रुचिर्भिन्ना हि देहिनाम्** ' ह्मणजे मनुष्याची आवड निरनिराळी असते. जीं राजांचीं मुखकमलें तिला पाहून पूर्वीं प्रफुल्लित झालीं होतीं तींच मागून ती पुढें गेली असतां म्लान झालीं. खरोखर संसाराची स्थिति अशीच आहे ! ज्यायोगें संसारांत सुख होतें त्यायोगेंच पुढें दुःख होऊं लागतें. अस्तु. नंतर तिचा तो रथ भूमीवरील राजांच्या समोर गेला. कंचुकी त्या त्या राजांचीं नावें घेऊन त्यांचें वर्णन करूं लागला. तरी सुद्धां ती कुमारी पूर्वींप्रमाणें अर्ककीर्तिप्रभृति राजांना ओलांडून--ज्याप्रमाणें वसंतऋतूंत भ्रमरी बाकीच्या वृक्षांना टाकून आम्रवृक्षाकडे येते त्याप्रमाणें-जयकुमाराजवळ प्राप्त झाली. त्यावेळीं ही कन्या सर्वांना पाहून नंतर कोणी तरी वरावा अशी इच्छा करीते आहे असें समजून ते सर्व राजे तसेंच स्वस्थ बसले. वाचकहो ! '**किं वाऽऽशा नावलम्बते** ' ह्मणजे आशा ही कशाचा आश्रय करीत नाहीं अस्तु. जयकुमाराजवळ आल्यानंतर तो कंचुकी तिला ह्मणालाः-

"वत्से! हा सोमप्रभराजाचा पुत्र जयकुमार होय. ह्याचें स्वरूप मदनाच्या रूपाचाही अतिक्रम करणारें असल्यामुळें व तें तूं प्रत्यक्ष पाहत असल्यामुळें वर्णन करावयास नकोच. कारण, 'स दर्पणोऽर्पणीयः किं करकंकणदर्शने।' ह्मणजे हातांतील कांकण पहावयास आरसा द्यावा लागतो काय? कुमारानें उत्तरेकडील भरतक्षेत्रांत मेघकुमार नांवाच्या देवांना जिंकिलें ह्मणून ह्याला 'मेघनाद' ह्मणतात. निधिपति भरतराजानें ह्याला वीरपट्ट ( शिरपेज ) बांधून ह्याचें 'मेघस्वर' असें नांव ठेविलें. ह्याचे गुण त्रैलोक्यांतील जीवांच्या अंतःकरणाला संतुष्ट करून ह्यावेळीं सर्वप्रकारें तुझ्या अंतःकरणाचें रंजन करण्याकरितां परतून आले आहेत हा मोठा चमत्कार होय. ज्याचा विजय सर्वत्र प्रसिद्ध आहे असा हा कुमार तूं नुसती उत्पन्न झाल्यानेंच जिंकला गेला आहे. ह्मणून ह्या ठिकाणीं हा जय तुला न्यायानेंच प्राप्त झाला आहे. आतां तूं आपल्या कटाक्षरूपी बाणांनीं जिंकलेल्या ह्या कुमाराला रत्नमालेनें गळ्यांत बांधून आपल्या हातांत धर! बाळे! जयलक्ष्मी तुझीच होऊं दे!" कंचुकीचें हें भाषण ऐकून त्यावेळीं पूर्वजन्मींचें प्रेम, जयकुमाराची नेत्रापुढें दिसणारी सुंदर आकृति, कुंदपुष्पाप्रमाणें त्याची कांति, आजपर्यंत ऐकलेले त्याचे सद्गुण व मदन इतक्यांनीं मिळून बला-

---

१ टीपः—येथें श्रीगुणभद्रकवि ह्मणतातः—

अवधूतः पुराऽनङ्गः सम्प्रति स्वीकृतोऽनया।
प्रयोजनवशात्प्राज्ञैः प्रास्तोऽपि परिगृह्यते॥

अर्थः—पूर्वी तिरस्कार केलेला मदन सुलोचनेनें त्यावेळीं पुन्हां जवळ केला. कारण, शहाणे लोक हाकून दिलेल्या मनुष्याचाहि कांहीं कार्याकरितां संग्रह करित असतात.

त्कारानें रथांतून खालीं उतरविलेल्या अशा त्या कुमारी सुलोचनेनें कंचुकीच्या हातातून सुंदर अशी ती रत्नमाला घेऊन प्रेमभरानें त्याच्या कंठात घातली. ती माला जयकुमाराच्या वक्ष:स्थलावर बसून साक्षात् लक्ष्मीप्रमाणें शोभूं लागली. एकाएकीं सर्व वाद्याचा गंभीर ध्वनि सुरूं झाला. इष्टफलप्राप्तीमुळें ज्याचा आनंद वृद्धिंगत झाला आहे अशा त्या अकंपन राजानें आपली कन्या व जामात जयकुमार याना पुढें करून आपल्या श्रृंगारिलेल्या नगरींत मोठ्या थाटानें प्रवेश केला. 'जयकुमार हा स्तुत्य अशा स्वयंवरविधीमध्यें पहिला होय ' अशी त्याची कीर्ति सर्व जगभर कल्पसमाप्तिपर्यंत पसरली. ज्याची पुण्यसंपत्ति प्रकाशित झाली आहे अशा त्या जयकुमाराचा नाथवशाचा स्वामि जो अकंपन राजा त्याच्या प्रियकन्येशीं विवाह झाला. श्रीजिनेंद्रानें सांगितलेल्या मार्गाचें अवलंबन केल्यामुळें लक्ष्मीवान् लोकाचा चूडामणि अशा या जयकुमाराला ह्याप्रमाणें लक्ष्मी व धवल यश यांची प्राप्त झाली. ह्मणून हे भाविक पंडित जनहो! तुह्मी एकाकार झालेल्या अंतःकरणवृत्तीनें ज्याची करुणा मोठी आहे अशा श्रीजिनाच्या चरणकमलाला शरण जा!



# पर्व ४४ वें.

## जयविजयवर्णन.

त्या स्वयंवरमंडपांत जमलेल्या राजामध्यें दुर्मर्षण नांवाचा एक दुष्ट राजा होता. जयकुमाराचा झालेला हा उत्कर्ष त्याला सहन न झाल्यामुळें तो तेथें जमलेल्या राजांना ह्मणाला:–" अहो! या मदोन्मत्त अकंपन राजानें तुमचा अपमान करण्याच्या इच्छेनेंच तुह्मा सर्वांना येथें बोलावून आणिलें आहे. वस्तुतः ह्यानें पूर्वीच जयकुमाराला पाहून पसंत केलें होतें." याप्रमाणें प्रथम सर्व राजांच्या क्रोधाग्नीस पेटवून नंतर तो दुर्मर्षण चक्रवर्तीचा पुत्र जो अर्ककीर्ति त्याला ह्मणाला.—" तूं व तुझा पिता भरत हे दोघेच ह्या जगांतील सहा खंडांत असलेल्या रत्नाचे स्वामी आहात! सर्व रत्नांमध्यें कन्यारत्न श्रेष्ठ आहे; व त्यात देखील ही सुलोचना कुमारी हें सर्वश्रेष्ठ रत्न आहे. ह्या दुष्ट अकंपन राजानें जय नावाच्या कोणा क्षुद्र राजाला आपली कन्या दिली आहे. त्याचें हें अन्यायाचें कृत्य मला सहन न झाल्यामुळें मी तुझ्याकडे आलों आहे. हे राजा! नीतिकार ह्मणतात:–

> प्रकृतोऽपि न सोढव्यः प्राकृतैरपि किं पुनः।
> त्वादृशैः स्त्रीसमुद्भूतो मानभङ्गो मनस्विभिः॥

अर्थः— नीच लोकांनीं सुद्धां यत्किंचित्‌ही अपमान सहन करूं नये. मग तुझ्यासारख्या मानी पुरुषानें स्त्रीसंबंधानें

झालेला अपमान कसा बरें सहन करावा ? ह्मणून मला आज्ञा कर; ह्मणजे मी त्या जयाला यमसदनीं पाठवून ही कुमारी व ती रत्नमाला हीं तुला अर्पण करितों." ह्याप्रमाणें बोलून त्या पापी दुर्मर्षणानें अर्ककीर्तीला क्रोध उत्पन्न केला. आचार्य ह्मणतातः— '**सदसत्कार्यनिर्वृत्तौ शक्तिः सदसतोः समा।**' ह्मणजे चांगलें व वाईट कार्य साधण्याच्या कामांत (अनुक्रमानें) सज्जन व दुर्जन ह्यांची शक्ति सारखीच असते. दुर्मर्षणाच्या त्या चीड व क्रोध येणाऱ्या भाषणानें अर्ककीर्ति विचारशून्य होऊन ह्मणालाः– "ज्या दुष्टानें माझा अपमान करून दुसऱ्याला ही कन्या दिली त्याचा तत्काल नाश केलाच पाहिजे. मी आज जयलक्ष्मीशीं सहवर्तमान ही माला जयकुमाराच्या वक्षःस्थलापासून ओढून घेतों!" कुमाराचें हें भाषण ऐकून, ज्याप्रमाणें अग्नीला वायु सहाय्य करितो त्याप्रमाणें कित्येक राजे त्यालाही सहाय्य करण्यास उद्युक्त झाले. हें योग्यच आहे. कारण, '**केऽपि पापक्रियारंभे सुलभाः सामवायिकाः।**' ह्मणजे दुर्व्यापार करण्याला सहाय्य करणारे कोणीही सहज मिळूं शकतात. अर्ककीर्तीचें हें भाषण **अनवद्यमति** नांवाच्या एका नीतिमान् व दूरदर्शी प्रधानाला न रुचल्यामुळें तो त्याला ह्मणालाः—

"हे कुमारा! पृथ्वी, चंद्र, सागर, वायु, तूं व तुझा पिता हे सर्व जगाचें कल्याण करणारे आहांत. तुमच्यांत विघाड झाला —— —ा सृष्टीतही विघाड होतो. तुमच्या एकमेकाच्या ागण्यानें ही सृष्टि राहिलेली आहे. क्षमादि सर्व गुण

जगाच्या कल्याणाकरिता भरतचक्रवर्तीमध्यें व तुझ्यामध्यें एकवटून राहिले आहेत. तुझ्या पितामहानें (वृषभनाथानें) ही सृष्टि उत्पन्न केली. त्यानें दिलेल्या ह्या सृष्टीचें तुझा पिता सार्वभौम भरत रक्षण करीत आहे, व तू देखील त्याच्या मागून तिचा रक्षक आहेस. प्रजेचें सकटापासून रक्षण करणें हें तुमचें आद्यकर्तव्य आहे. सर्व प्रकारचे नीतिमार्ग तू पाळिले पाहिजेस. आगम व स्मृति ह्यात सांगितलेला हा 'स्वयंवरविवाह' प्राचीन व सनातन असून सर्व प्रकारच्या विवाहात श्रेष्ठ आहे. महाकुलात उत्पन्न झालेल्या सधन किंवा निर्धन, गुणवान् किंवा गुणहीन, कुरूप किंवा सुरूप अशा आपल्याला प्रिय झालेल्या कोणाला तरी एकालाच कुमारी वरू शकते. त्याविषयीं बाकीच्यानीं मत्सर करू नये, अशी ही नीति आहे. जर ही नीति कोणाकडून उल्लंघन केली जाईल, तर तूच तिचें रक्षण केलें पाहिजे बाबारे! 'क्वापि पाता स्यात्परिपन्थकः' ह्मणजे रक्षण करणारा कोठें तरी शत्रु झाला आहे काय? भरतचक्रवर्ती अकंपन राजाला पित्याप्रमाणें मानतो. ह्मणून तू ह्याची अमर्यादा करू नको. कारण 'पूज्यातिलङ्घनं माहुरुभयत्राशुभावहम्।' ह्मणजे पूज्याचा अतिक्रम करणें हें इहपरलोकीं अकल्याण करणारें होतें. कुमारा! तुझ्या ह्या नाथवंशासारखाच सोमवंशही श्रेष्ठ आहे. कारण तुझ्या वंशापासून 'धर्मतीर्थ' जसें झालें तसेंच त्या वंशापासून 'दानतीर्थ' झालें आहे. दिग्विजयाच्या वेळीं

ह्या जयकुमाराचा पराक्रम सर्वांनीं पाहिलाच आहे. ज्या पुरुषाबद्दल हा शूर होईल असें वाटत आहे तसल्या पुरुषाची देखील त्याला शूर समजून राजानें प्रतिष्ठा केली पाहिजे. मग अत्यंत असाध्य अशा आपल्या कार्यांत ज्यानें इष्टसिद्धि केली आहे त्याच्याबद्दल काय बोलावें? चक्रवर्ती भरतसुद्धा तुझ्या ह्या कृत्यानें रागावेल! करितां तूं हा अधर्म करूं नकोस. धर्म, अर्थ व काम हे तीन पुरुषार्थ तूं संपादन केले आहेस. आतां नीतिमार्गाचें उल्लंघन करून तूं ते तिन्ही पुरुषार्थ व्यर्थ कां बरें गमावतोस? ह्या समारंभांत सुलोचना ही जयकुमाराला न्यायानें प्राप्त झाली आहे. ह्यांत तुझा पराभव तो काय झाला? ह्याविषयीं तूं मत्सर करणें हा मात्र तुझा पराभव आहे." प्रधानाचें हें नीतियुक्त व हितकर भाषण अर्ककीर्तीला अत्यंत कटु वाटलें; व तो क्रुद्ध झाला. 'बुद्धि ही पूर्वीच्या कर्माला अनुसरणारी आहे' या उक्तीची सत्यता व्यक्त करण्याकरितांच कीं काय तो कुमार उलट प्रधानाला ह्मणाला, "श्रीवृषभनाथानें सांगितलेला हा स्वयंवरविधि व वयोवृद्ध अकंपनराजा हे दोन्हीहि मला मान्य आहेत. परंतु ह्या कपटी राजानें आपल्या मनानें पूर्वींच जयाला कन्या देण्याचें ठरवून व मुलीला तो आपला बेत सांगून त्याच्या कंठात तिच्याकडून वळेंच माला घालविली. आपणास चक्रवर्ती ह्मणवून घेण्याकरितां त्यानें हें मुद्दाम कपटनाटक रचिलें. मी सुलोचनेची इच्छा करीत नाहीं. तथापि मी ह्या अन्यायाची उपेक्षा कधींही करणार नाहीं. कारण, 'दुराचारनिषेधेन त्रयं धर्मादि वर्धते' अर्थात् दुराचाराला

प्रतिबंध केल्यानें धर्म, अर्थ व मोक्ष हे तीन्ही पुरुषार्थ वाढतात. दुष्टाचा वध केला असतां धर्मच होईल. अन्यायाला जर मी प्रतिबंध केला नाहीं तर माझी मोठी अपकीर्ति होईल. ह्मणून तुह्मी उगीच बसा! खऱ्या हितचिंतकानें धर्माला अविरुद्ध अशा कृत्याचा कधींहि प्रतिबंध करूं नये." याप्रमाणें अर्ककीर्तीनें प्रधानाचा उपमर्द करून सर्व राजांना युद्धाविषयींचा आपला ठाम निश्चय कळविला. तत्काल अर्ककीर्तीची चतुरंग सेना युद्धाला सज्ज झाली. अर्ककीर्ति विजयघोष नांवाच्या हत्तीवर आरोहण करून आपल्यावर चालून येऊं लागला आहे ही वार्ता ऐकून, अकंपनराजाला वाईट वाटलें; व '**स्वालोचितं च कर्तव्यं विधिना क्रियतेऽन्यथा**' अर्थात् आपण विचार करून केलेलें कृत्य प्रारब्धानें विघडविलें जात आहे! तेव्हां यापुढें काय करावें? याबद्दल प्रधान मंडळी व जयकुमारप्रभृति राजे ह्यांच्याबरोबर विचार करून त्यानें अर्ककीर्तीकडे एक दूत पाठविला. दूतानें अर्ककीर्तीला 'याप्रमाणें मर्यादेचा अतिक्रम करणें योग्य नाहीं.' असें पुष्कळ प्रकारें समजावून सांगितलें. पण व्यर्थ! त्यानें परत जाऊन झालेली सर्व हकीकत अकंपनराजाला सांगितली. राजाला तें ऐकून अत्यंत खेद झाला. हें पाहून जयकुमार अकंपन राजाला ह्मणाला:—

"अर्ककीर्तीनेंच नीति सोडिली आहे. तेव्हां आतां ह्यांत विचार करण्यासारखें कांहीं नाहीं. तुह्मी येथेंच राहून सावधपणानें सुलोचनेचें रक्षण करा. मी त्याला आतां बांधून आणतो." याप्रमाणें भाषण करून जयकुमार आपले बंधु व सैन्य यांसहवर्त-

मान निघाला. इकडे सुलोचनेला नित्यमनोहर चैतालयात नेऊन, ' वत्से ! तू आपल्या मातोश्रीसह ह्याठिकाणीं श्रीशातिनाथाची पूजा करीत रहा.' असें सागून अकपनराजाहि आपले सर्व सैन्य बरोबर घेऊन तावडतोब युद्धास निघाला तत्काल महायुद्धांस सुरुवात झाली. जयकुमारानें सैन्याच्या निरनिराळ्या तुकड्या करून मकरव्यूहाची ( मत्स्याच्या आकाराची ) रचना केली. इकडे चक्रव्यूहाच्या रचनेनें आपल्या सैन्याच्या मध्यभागीं असलेला अर्ककीर्तीकुमार सूर्याप्रमाणें शोभत होता. विद्याधराचे राजे अर्ककीर्तीच्या आज्ञेनें आकाशांत गरुडव्यूहाची रचना करून निरनिराळे उभे राहिले. युद्धात अर्ककीर्तीच्या सैन्यातील असंख्य लोक गतप्राण झाले. तेव्हां धीरोदात्त असा **जयकुमार** विजयार्द्ध नांवाच्या आपल्या श्रेष्ठ गजाला अर्ककीर्तीसमोर उभा करून त्याला ह्मणाला, "कुमारा! चक्रवर्तीनें सर्व नीतिमार्ग उत्तम प्रकारें चालविले आहेत. परतु, ह्या दुष्ट लोकानीं तुला त्या नीतिमार्गाचा शत्रु बनविलें ! तुझ्या कृत्यानें चक्रवर्तीच्या सर्व सैन्याचा भयकर नाश मात्र होऊ लागला आहे. तुझ्या ह्या वर्तनानें चक्रवर्तीला देखील त्रास होईल. करिता हें युद्ध आता पुरें कर ! या कुमारा ! '**अन्यायो हि पराभूतिर्न तत्त्यागो महीयसः**' ह्मणजे अन्याय करणें हाच मोठ्या लोकाचा पराभव होय ! अन्यायाचा त्याग करणें हा काहीं पराभव नाहीं.. माझ्यावरोवर

**टीपः**—जिज्ञासु वाचकानीं मूळ महापुराणातून हे युद्धवर्णन वाचावें अशी त्याना शिफारस करितो

युद्ध करण्यांत तुझाच मोठा नाश होणार आहे." अभव्य-जीव ज्याप्रमाणें सद्धर्म ऐकत नाहीं त्याप्रमाणें जयकुमाराचें हें भाषण न ऐकतां अर्ककीर्तीनें तसेंच युद्ध चालू ठेविलें. याप्रमाणें दोघांमध्यें घनघोर युद्ध चालू असतां महापराक्रमी, तेजःपुंज व सदाचारसंपन्न असा सूर्यहि अस्ताला गेला. तें पाहून कवि ह्मणतो, " आश्रित्य वारुणीं रक्तः को न गच्छत्यधोगतिम् " अर्थात् वारुणीचा ( मद्य; पश्चिमदिशा ) आश्रय करून रक्त ( आसक्त; रक्तवर्ण ) झालेला असा कोण बरें अधोगतीला प्राप्त होणार नाहीं ? आचार्य म्हणतातः—

उदये वर्धितच्छायो व्याप्य विश्वं प्रतापवान् ।
दिनेनेनोऽप्यनश्यत्कास्तिष्ठेत्तीव्रकरःपरः ॥

अर्थः—उदयाच्या वेळीं ज्याची कांति वृद्धिंगत झाली आहे असा प्रतापवान् ( पराक्रमी; ताप देणारा ) सूर्य देखील सर्व जगाला व्यापून एका दिवसांत-बारा तासांत—नाश पावला; मग ज्याचे कर ( प्रजेकडून घ्यावयाचें द्रव्य; किरण ) प्रखर आहेत असा दुसरा कोणता पुरुष टिकेल ?

आणखी श्रीगुणभद्राचार्य म्हणतात·—

स प्रतापः प्रभा साऽस्य सा हि सर्वैकपूज्यता ।
पातः प्रत्यहमर्कस्याप्यतर्क्यः कर्कशो विधिः ॥

अर्थः—सूर्याचा सायंकालपर्यंत अनुभवास येत असलेला तो असाधारण प्रताप, ती त्याची अवर्णनीय कांति आणि सर्व लोकांच्या अंतःकरणांत असलेली त्याच्याविषयीं पूज्यबुद्धि असे गुण असूनही त्याचें प्रत्येक दिवशीं असें पतन होतें; हें पाहून असें वाटतें

परिणामामुळें हा तुमचा आमच्याविषयीं विरोध उत्पन्न झाला आहे. संपूर्ण पृथ्वीला संतुष्ट करणारा मेघ एखादे वेळीं एखाद्यावर वीज टाकतो; तर तो त्या व्यक्तीच्या अशुभ कर्माचा उदय होय! त्यात मेघाचा मुळींच दोष नाही. अस्तु. आतां माझ्या निर्दोष व सुस्वरूप अशा लक्ष्मीवती कन्येचा स्वीकार करून तूं आह्मांवर प्रसन्न हो." याप्रमाणें अकंपन राजानें भाषण करून अर्ककीर्तीला संतुष्ट केलें. अर्ककीर्तीला हत्तीवर बसवून सर्व राजे व विद्याधर यांसहवर्तमान अकंपनमहाराज नित्यमनोहर मंदिरांत गेले, तेथें आठ दिवसपर्यंत सर्व पातकांच्या शांतीकरितां शांतिपूजा केली. मग अकंपन राजानें जयकुमाराचा व अर्ककीर्तीचा सलोखा केला. नंतर जयकुमाराचा सुलोचनेशीं व अर्ककीर्तीचा लक्ष्मीवतीशीं मोठ्या थाटानें लग्नसमारंभ झाला. अकंपनराजानें बाकीचे राजे व विद्याधर यांचा योग्य तो सन्मान करून त्यांना आपापल्या नगराला पोंचविलें. तदनंतर त्यानें सुमुख नांवाच्या चतुर सेवकाला चक्रवर्तीला प्रसन्न करण्याकरितां पाठविलें. त्या सेवकानें चक्रवर्तीकडे जाऊन व त्याला नजराणा देऊन स्वयंवराची व युद्धाची सर्व हकीकत कळविली. व तो ह्मणाला, "हे राजाधिराज ! आम्ही आपला मोठा अपराध केला आहे. करितां आमच्या अपराधाप्रमाणें योग्य ती शिक्षा आह्मांला सांगा. आपला हुकूम बजाविल्यानें आम्हीं इहपरलोकीं अत्यंत धन्य होऊं." सुमुखाच्या या नम्र भाषणानें भरत चक्रवर्ती फारच खुष झाला. उघडच आहेः—

सतां वचांसि चेतांसि हरन्त्यपि हि रक्षसाम् ।
किं पुनः सामसाराणि तादृशां समतादृशाम् ॥

अर्थः—सज्जनाचीं भाषणें राक्षसाच्या अंतःकरणाचें देखील हरण कारितात. मग सलोखा उत्पन्न करणाऱ्या अशा त्याच्या त्या भाषणानें चक्रवर्तीसारख्या समदृष्टी पुरुषाचीं मनें वळावीत ह्यांत आश्चर्य तें काय? असो. नंतर भरतचक्रवर्ती सुमुखाला ह्मणाले, "अकंपन महाराज आम्हाला आमच्या पित्यासमान आहेत. ह्यावेळीं ते आह्मा सर्वांत वडील आहेत. ह्या गृहस्थाश्रमात आह्माला तेच पूज्य आहेत. इतकेंच नव्हे तर, अन्यायाच्या मार्गांत प्रवृत्त झालेल्या मला तसें करू नको म्हणून निषेध करणारेही तेच आहेत. बाबारे! भगवान् आदिनाथ हे मोक्षमार्गाचे गुरु आहेत; श्रेयान् महाराज हे दानक्रियेचा विच्छेद न होऊ देण्याचे गुरु आहेत. व ज्याप्रमाणें चक्रवर्तींच्या आचाराचा मी ह्या लोकांत अग्रगण्य गुरु आहे, त्याप्रमाणें स्वयंवरविधीचे अकंपन महाराज हे गुरु आहेत. ते जर नसते, तर ह्या मार्गाची प्रवृत्ति करणारे दुसरे कोण होते? हा मार्ग सनातन आहे. अरे दूता! सुप्रसिद्ध असें हें माझें चक्रवर्तित्व जयकुमाराच्या पराक्रमानेंच मला मिळालेलें आहे. अर्ककीर्तीनें अन्यायमार्गाची प्रवृत्ति करून यावच्चंद्रदिवाकरौ माझी अकीर्ति केली. नीतिकारानीं ह्मटलें आहे.-

सदोषो यदि निग्राह्यो ज्येष्ठपुत्रोऽपि भूभुजा।
इति मार्गमहं तस्मिन्नद्य वर्तयितुं स्थितः॥

अर्थः— राजानें आपला वडील मुलगा जर अपराधी असेल तर त्याला देखील दंड करावा. अशा नीतिमार्गाची प्रवृत्ति करण्याकरिता मी आज तयार आहे. अर्ककीर्तीला तुह्मीं आपली अक्षमाला नावाची कन्या देऊन त्याचा जो सत्कार केला तो

तुह्मी मोठा अविचार केला. कारण, त्यायोगानें ' चक्रवर्तीनें आपला पुत्र दोषी असूनही मान्य केला ' अशा प्रकारची माझी दुष्कीर्ति अकंपन महाराजांनीं चिरस्थायी केली. " ह्याप्रमाणें भरतचक्रवर्तीनें भाषण करून आपल्या ज्येष्ठ पुत्राचा त्याग करून, न्यायालाच आपला औरसपुत्र केला. सुमुखानें चक्रवर्तीला साष्टांग नमस्कार करून व त्याची परवानगी घेऊन, अकंपन राजा व जयकुमार ह्यांना मोठ्या आदरानें तिकडील सर्व वृत्तांत निवेदन केला. त्यांनीं सुमुखाला पारितोषक देऊन त्याचा मोठा सन्मान केला. पुढें कांहीं दिवसपर्यंत तो प्रतापशाली श्रीमान् जयकुमार आपल्या श्वशुरगृहींच राहिला. नंतर श्वशुराची परवानगी घेऊन तो सुलोचनेसह आपल्या नगरीला जाण्यास निघाला. त्यावेळीं अकंपनराजानें त्यांना अलंकार, सैन्य वगैरे लवाजमा दिले; व त्याना दूरवर पोंचवावयास जाऊन, तो मोठ्या दुःखित अंतःकरणानें तेथून आपल्या पत्नीसहवर्तमान मार्गें परतला. खरोखर, अपत्यवियोग अत्यंत दुःसह आहे! लौकरच तो लक्ष्मीसंपन्न कुमार गंगेच्या तीरावर आला. तेथें त्यानें योग्य प्रदेश पाहून आपली छावणी दिली. नंतर सुलोचनेला तेथेंच ठेऊन तो अयोध्येला गेला. अर्ककीर्ति प्रभृति मुख्य मुख्य लोक जयकुमाराला सामोरे गेले. तेथें त्याचा सर्वांनींच मोठा आदरसत्कार केला. उघडच आहे कीं, चक्रवर्तीनें ज्या पुरुषाचा सन्मान केला त्याला कोण बरें मान देणार नाहीं? नंतर जयकुमारानें राजसभेंत जाऊन भरतचक्रवर्तीला मोठ्या विनयानें साष्टांग नमस्कार केला. भरतानें त्याचा सन्मान करून त्याला आपल्या आसनावर बसविलें. नंतर चक्रवर्ती त्याला ह्मणालाः—

-" कुमारा! तूं आपली नूतन पत्नी कां बरें आणिली नाहींस, तिला पाहण्याकरितां आम्ही फार उत्कंठित झालों आहोंत. तुझ्या विवाहोत्सवांत आम्हाला कां बरें बोलाविलें नाहीं ? अकंपन महाराजानें आपल्या वधुवर्गांतून आम्हाला वेगळें काढलें हें बरें केलें काय ? " चक्रवर्तीचें हें निष्कपट भाषण ऐकून जयकुमार मोठ्या नम्रतेनें म्हणालाः—

" हे राजाधिराज ! विवाहाच्या सर्व प्रकारांत स्वयंवराचा प्रकार फार प्राचीन आहे असें समजून, अकंपनराजानें तें मंगलकृत्य आरंभिलें. परंतु दैवानें तें बिघडविलें होतें; तथापि तें युद्ध आपल्या कृपेनेंच शांत झालें. तसेंच आपण आज जो माझा अपूर्व सन्मान केला त्याबद्दल मी आपला अत्यंत ऋणी आहे. " कुमाराची ही नम्र वाणी ऐकून त्या निधिपतीनें वस्त्रें, अलंकार व वाहनें इत्यादिकांच्या योगानें त्याचा सत्कार करून व सुलोचनेला तिला योग्य अशाच प्रकारचे अमूल्य अलंकार वगैरे देऊन त्याला निरोप दिला. ह्या सर्व व्यवहारांवरून ' सम्पत्सम्पन्नपुण्यानामनुबध्नाति सम्पदम् । ' म्हणजे, लक्ष्मी ही जे पुण्यवान् आहेत त्याच्याच संपत्तीला वाढवितें हें सिद्ध होतें असो. सर्वांचा निरोप घेऊन तो कुमार गंगानदीच्या संनिध प्राप्त झाला. त्यानें त्वरेनें नदींत जेथें उतार नाहीं अशा ठिकाणीं आपल्या गजाला नेलें; उघडच आहे कीं, ' हेयोपेयविवेकः क्व कामिनां मुग्धचेतसाम् । ' म्हणजे, ज्याचीं अंतःकरणें विचारशून्य झालीं आहेत अशा कामी लोकांना त्याज्य काय व ग्राह्य काय याचा विचार कसला असणार ? तत्काल त्या डोहांत तरंगत अस-

लेल्या त्या गजेंद्राला काली नांवाच्या देवीनें सुसरीचें रूप धारण करून धरिलें. वाचकहो ! 'स्वदेशस्थः क्षुद्रोऽपि महतां बली ।' ह्मणजे, क्षुद्र प्राणी सुद्धा आपल्या ठिकाणीं असला तर तो मोठ्यापेक्षां बलवान् होतो. बुडत असलेल्या हत्तीला पाहून तीरावर राहिलेले हेमांगदप्रभृति राजकुमार एकदम त्या डोहांत शिरले. हें पाहून प्राप्त झालेल्या संकटाचा नाश होईपर्यंत, भोजन व शरीरसंस्कार ह्याचा त्याग आहे असा नियम करून, मोठ्या भक्तियुक्त अंतःकरणानें पंचनमोकाराचा मंत्र ह्मणत ह्मणत ती सुलोचना सती गंगादेवीप्रमाणें त्या गंगानदींत शिरली. गंगेचें स्वर्गावरून पडण्याचें स्थानभूत जें शिखर त्याची मुख्य देवता जी गंगादेवी ती आपल्या आसनाच्या कंपनानें सुलोचनेवरील हें संकट जाणून, त्वरेनें तेथें आली; व तिनें त्या कालिकेचा तिरस्कार करून त्या सर्वांना तीरावर आणिलें. उघडच आहे, 'स्वयमागत्य के नात्र रक्षन्ति कृतपुण्यकान् ।' ह्मणजे, पुण्य करणाऱ्या लोकांना स्वतः येऊन कोण बरें रक्षण करीत नाहीं ? अस्तु. नंतर गंगानदीच्या तीरावर सर्व संपत्तीनें युक्त असें एक शोभिवंत मंदिर निर्माण करून, सुलोचनेला रत्नखचित सिंहासनावर बसवून व तिची पूजा करून गंगादेवी ह्मणाली, 'तूं दिलेल्या पंचनमस्कार मंत्रानें मी गंगानदीची मुख्य देवता झालें. शिवाय मी सौधर्मेंद्राची जी पट्टराणी झालें तें हें सर्व तुझ्याच प्रसादानें झालें.' हें ऐकून जयकुमारानें सुलोचनेला 'हें काय ?' ह्मणून विचारिलें. तेव्हां ती ह्मणाली:—

"'विंध्यपर्वताजवळ असलेल्या विंध्यनगरींत विंध्यकेतु

नांवाचा राजा होऊन गेला. त्याची पत्नी प्रियंगुश्री नांवाची होती. त्या दंपत्यास विंध्यश्री नांवाची कन्या होती. विंध्यकेतु राजानें विंध्यश्रीला माझ्याबरोबर सर्व प्रकारचें उत्तम शिक्षण मिळेल या हेतूनें माझ्या पित्याच्या स्वाधीन केलें. एकदां बागेंत खेळत असता तिला सर्पानें दंश केला. त्यावेळीं मी सांगितलेल्या पंचनमस्कार मंत्राची एकनिष्ठेनें भावना करीत करीत ती मृत झाली. त्या पुण्यबलानें ती ह्याठिकाणीं ही गंगादेवी होऊन, मजवरील प्रेमामुळें येथें आली आहे." सुलोचनेचें हें भाषण ऐकून जयकुमारानें मोठ्या आनंदित अंतःकरणानें व मधुर भाषणानें त्या गंगादेवीला निरोप दिला. नंतर गंगातीरावर जाऊन त्यानें आपल्या प्रिय पत्नीसहवर्तमान ती रात्र मोठ्या आनंदानें घालविली. जयकुमार ह्मणतो-" प्रिये, हें पहा! स्वभावतःच सुंदर दिसणारी ही परम पवित्र भागीरथी नदी आपला रस (प्रेम; पाणी) फार वाढल्यानें त्याचा वेग आवरण्यास असमर्थ होऊन आपल्याला योग्य अशा सागररूपी पतीकडे जात आहे हें अगदीं योग्य आहे. कारण, ह्मटलें आहेः-

रतेः कामाद्विना नेच्छा न नीचेषूत्तमस्पृहा ।
सङ्गमे तन्मयी जाता प्रेम नामेदृशं मतम् ॥

अर्थः—रतीला मदनावांचून दुसऱ्याची इच्छा व्हावयाची नाहीं. कारण उत्तमाची इच्छा नीच पदार्थांवर जातच नाहीं. ही नदी पतीच्या संगमानें अगदीं तद्रूप झाली आहे. प्रिये! 'प्रेम' ह्मणून जर असेल तर तें अशा प्रकारचेंच असलें पाहिजे. ह्मणूनच सर्व कवीश्वरांनी हिची 'देवता' ह्मणून स्तुति केली

आहे. उघडच आहे कीं, ' गुणिनश्चेन्न के कान्वा संस्तुवन्ति गुणप्रियाः ' अर्थात्, गुणप्रिय लोक जर गुणी लोकांची स्तुति करणार नाहींत, तर ते कोणाची स्तुति करतील ? " अस्तु. मग दुसरे दिवशीं प्रातःकाळीं तेथून आपल्या सर्व परिवारांसह निघून किती एक मुक्कामांनीं तो कुरुवंशदीपक जय ' कुरुजांगल ' नांवाच्या देशास पोंहचला. अनेक मंगलवाद्यांचा ध्वनी होत असतां तो कुमार आपल्या कांतेसहवर्तमान उत्तम प्रकारें श्रृंगारिलेल्या आपल्या नगरींत प्रवेश करून, अनेक प्रकारच्या संपत्तींनीं युक्त अशा आपल्या राजमंदिरांत आनंदानें राहिला. पुढें त्यानें शुभ मुहूर्तावर श्रीजिनेंद्राची मंगलद्रव्यांनीं महापूजा करून व नगरींत महोत्सव करून, सर्व लोकांना आपल्या दातृत्वानें संतुष्ट केलें; व हेमांगदप्रभृति राजपुत्रासमक्ष महादेवी अशा सुलोचनेला पट्टबंध ( पट्टराणीला योग्य असा अलंकार मस्तकावर बांधणें ) बांधिला. कारण म्हटलें आहे कीं, 'स्त्रीषु सञ्चितपुण्यासु पत्युरेतावती रतिः ' म्हणजे, ज्यांनीं पुण्यसंचय केला आहे अशा स्त्रियांच्या ठिकाणीं पतीचें एवढें प्रेम असतेंच. पुढें कित्येक दिवसपर्यंत त्यानें हेमांगदादि पाहुण्याना आपल्या येथें ठेवून घेऊन, त्यांचा योग्य प्रकारें सत्कार करून व त्यांना मोठा परिवार देऊन त्यांच्या नगरीकडे पाठविलें. हेमांगदानें आपल्या नगरीला परत आल्यावर आपल्या मातापित्याला –सुप्रभादेवीला व अकंपन राजाला–वधुवराची सर्व हकीकत सांगून संतुष्ट केलें. याप्रमाणें सुखानें काल जात असतां [illegible]नीं अकंपन राजाला इच्छित विषय व त्यांचा उपभोग

ह्या दोन्हींविषयीं उपरति झाली; त्यावेळीं त्यानें आपल्या मनाशींच विचार केला कीं —

अरेरे! शरीर, संसार व भोगाचे सर्व विषय हे तुच्छ व क्षणिक अतएव त्याज्य आहेत हें तत्व विषयांध झाल्यामुळें आजपर्यंत मला समजलेंच नाहीं. वस्तुतः, हें शरीर दुःख व दुर्व्यापार ह्यांचें स्थान असून, अत्यंत अशुद्ध व नाशवंत आहे. हा जीव शरीराचें ग्रहण केल्यामुळें जन्मी ( संसारी, वारंवार जन्म घेणारा ) होतो! व त्याचा त्याग केल्यानें मुक्त होतो!! असें असून ही शरीर हेंच ह्या जीवाचें खरें स्वरूप आहे असें समजून, हा ज्ञानवान् जीव त्याचेंच कसें बरें पोषण करतो! ज्या आशारूपी खाणींत हें संपूर्ण विश्व एका परमाणूप्रमाणें दिसतें, ती खाण ह्या नश्वर देहांतच आहे! या जीवा! तू पुष्कळ काळपर्यंत मोहामुळें दुर्गतिला प्राप्त होत आहेस! ज्याचा उपभोग घेतला जातो तो भोग (विषय) होय, किंवा जें उपभोग घेणें तोही भोग होय! अरे प्राण्या, विषय व उपभोग घेणें हे दोन्ही नरकांत देखील आहेत. त्याचें ठिकाणीं प्रेम कशाला? भोग ( विषय ) हे लोभरूपी अग्नीला वाढविण्याकरितां आहेत. करितां, त्याच्या शांतीकरितां श्रीजिनवचनाचें ध्यान केलें पाहिजे. आतां यतिदीक्षा घेऊन या ससारचक्राचा नाश करणेंच योग्य आहे असा विचार करून, त्या सुज्ञ अशा अंकपन राजानें हेमांगद नामक ज्येष्ठ पुत्राला श्रीजिनपूजापूर्वक राज्याभिषेक करून, श्रीआदिनाथाजवळ दीक्षाग्रहण केली. व क्रमानें एकेका श्रेणीवर चढून त्यानें केवलज्ञानाची प्राप्ति करून घेतली. अंकपन राजाबरोबरच

सुप्रभादेवीनें व इतर अनेक राजानीं ही दीक्षा घेतली. उघडच आहे कीं, 'दुर्गमं च व्रजन्त्यल्पाः प्रभुर्यदि पुरस्सरः' अर्थात् जर आपला राजा किंवा धनी अग्रेसर असला, तर तुच्छ लोक देखील जाण्याला अत्यत कठीण अशा मार्गावर ही जातात. इकडे, जयकुमार व सुलोचना या दोघानीं दीर्घ कालपर्यंत जरी विषयोपभोग भोगिले तरी ही त्याची तृप्ति झाली नाहीं. हें पाहून इष्टविषयापासून उत्पन्न होणाऱ्या कष्टमय सुखाला धिक्कार असो असें वाटतें! अतएव येथें आचार्य वाचकाना उपदेश करितात कीं, बाबानो! ज्यातील सर्व विषय नाहींसे झाले आहेत अशा सुखाकरिता—आत्मसुखाकरिता—तुह्मी यत्न करा!!

## पर्व ४६ वें.

### जयसुलोचनाभवांतरवर्णन.

कोणे एके समयीं जयकुमार आपल्या राजवाड्याच्या गच्चीवर आनंदानें बसला असता, सहज गमन करणारें असें पक्ष्याचें जोडपें पाहून, 'अरेरे! माझी प्रभावती' असें उच्चस्वरानें ह्मणून मूर्च्छित झाला. त्याप्रमाणेंच त्या ठिकाणीं ती पारव्याची जोडी पाहून, सुलोचनाही 'अरेरे! माझा रतिवर' असें ह्मणून मूर्च्छित झाली. सेवकानीं शीतोपचार केल्यावर ते दोघेही सावध झाले. त्या दोघाना पूर्व जन्मातील आपल्या वृत्तातांचें स्मरण झालें. व त्याना त्यावेळीं तिसरें अवधिज्ञान प्रकट झालें. जयकुमार व सुलोचना या दोघाचें हें सर्व कृत्य

पाहून, सुलोचनेच्या सवती आपापसांत बोलूं लागल्या, " पहा ! या दुष्ट सुलोचनेनें आपल्याला मूर्च्छा येण्याला पतीला आलेली मूर्च्छा कारण आहे असें कपटानें दाखवून, 'स्त्रियांचें ठिकाणीं कपट असतें' हें जें लोकांचें ह्मणणें तें तिनें सार्थ केलें. 'सुलोचना शीलवती आहे.' असें ह्मणून महाराज तिची वारंवार स्तुति करीत असतात; व ही तर आतां 'रतिवर' असें ह्मणून मूर्च्छित झाली! ह्यावरून 'प्रायो रक्तस्य दोषोऽपि गुणवत्प्रति-भासते।' ह्मणजे आसक्त झालेल्या मनुष्याला बहुतकरून दोष देखील गुणाप्रमाणें भासतो असें दिसतें. अस्तु. अवधि-ज्ञानानें त्या स्त्रियांची ती सर्व भाषणें जाणून, जयराजा सुलो-चनेला ह्मणाला, 'प्रिये, पूर्वजन्मीं झालेली आमची सर्व हकिकत येथील मंडळींना सांग.' तेव्हां सुलोचनेनें ती सर्व कथा सांगण्यास सुरुवात केली. ती अशीः—

" ह्या जंबूद्वीपातील पूर्वेकडील विदेहांत पुष्कलावती देशाच्या मध्यभागीं पुंडरीकिणी नांवाची नगरी होती. तेथें प्रजापाल नांवाचा राजा राज्य करीत असे. त्या राजाचा कुबेर-मित्र नामक एक श्रेष्ठी होता. त्या श्रेष्ठीच्या घरांत 'रतिवर' व 'रतिषेणा' या नांवाचें एक उत्तम पारव्याचें जोडपें होतें. त्यांत रतिवर हा अत्यंत बुद्धिमान् होता. एखादे वेळीं तो श्रेष्ठीच्या घरीं आलेल्या मुनींना सामोरें जाऊन त्यांच्या चरण-कमलावरील धुरळा आपल्या पंखांनीं घालवित असे. 'पातकी जीवांना व पुण्यवान् जीवांना गति कोणती मिळेल?' असें कोणी कौतुकानें विचारिलें असतां, तो पारवा शास्त्रपारंगत झालेल्या

एखाद्या मौन धारण करणाऱ्या यतीप्रमाणें खालचा भाग व वरचा भाग ( नरक व स्वर्ग ) दाखवित असे. वाचकहो, ह्यांत आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं. कारण, ' **क्षयोपशम-माहात्म्यात्तिर्यञ्चोऽपि विवेकिनः ।** ' ह्मणजे, आवरणाचा नाश किंवा उपशम ह्यांच्या सामर्थ्यानें पशुपक्षीही विचारी होतात." नंतर सुलोचना जयकुमाराला ह्मणाली:— "महाराज ! पूर्व भवांतील आपण ' रतिवर ' आहात; व ' रतिषेणा ' नांवाची ही मी आपली पत्नी आहे. प्रभो ! ह्या संसाररूपी भोवऱ्यांत ह्या जीवाला कोणती गति प्राप्त होत नाहीं ? असो. त्या कुबेरमित्र श्रेष्ठीला कुबेरकांत नांवाचा एक पुत्र होता. त्याच नगरींत समुद्रदत्त नांवाचा वैश्य होता. त्यास कुबेरमित्रश्रेष्ठीची बहिण दिली होती. त्याला प्रियदत्ता नांवाची एक सुस्वरूप, सद्गुणी व सुलक्षणी अशी कन्या होती. कुबेरमित्रानें आपल्या कुबेरकांतपुत्राचें लग्न या प्रियदत्तेशीं मोठ्या समारंभानें केलें. याप्रमाणें कांहीं काळ लोटल्यावर प्रजापाल-राजानें लोकपाल नांवाच्या आपल्या पुत्राला राज्याभिषेक करून शीलगुप्तगुरूजवळ दीक्षा घेतली. एकदां कुबेरमित्रानें आपल्या मस्तकांत पांढरा केस पाहिला; त्यायोगें त्याला वैराग्य उत्पन्न झालें; व त्यानेंही संयम ग्रहण केलें. त्या पुण्यबलानें तो श्रेष्ठी ब्रह्मलोकांत लौकांतिक नांवाचा देव झाला. येथें आचार्य ह्मणतात:— " **किन्न साध्यं यथाकालपरिस्थित्या मनीषिभिः ।** " अर्थात् कालाला अनुसरून वागल्यानें बुद्धिमान् लोकांना न मिळवितां येण्यासारखें काय बरें आहे ? कांहीं नाहीं. नंतर एके समयीं

कुबेरकांत शेटजीच्या घरांत दोन चारण मुनी आले. तेव्हां श्रेष्ठीनें त्यांना मोठ्या भक्तीनें ठेवून घेतलें. त्या चारणयुग्माच्या नुसत्या दर्शनानेंच श्रेष्ठीच्या घरांतील पारव्याच्या जोडप्याला आपल्या पूर्वभवाचें ज्ञान झालें, त्यानीं मुनीच्या चरणकमलाला आपल्या पंखांनीं स्पर्श करून मोठ्या भक्तिभावानें नमस्कार केला. तसेंच, मुनीदर्शनानें त्या जोडप्याची परस्परावरील प्रीति ही नष्ट झाली. व ते मुनी ही तत्काल आहार ग्रहण न करितां तसेंच तेथून निघून गेले तेव्हा श्रेष्ठीची चतुर पत्नी जी प्रियदत्ता तिनें त्या रतिषेणेला 'तुझें पूर्वजन्मातील नाव काय ? ' असें विचारिलें तेव्हां तिनें आपल्या चोंचीनें ' रतिवेगा ' असें लिहिलें. तें पाहून ही माझी पूर्वजन्मींची भार्या आहे असें समजून तो पारवा संतोष पावला. तसेंच, रतिवराला त्याचें पूर्वजन्मींचें नाव विचारल्यावरून त्यानें 'सुकांत' अशीं अक्षरें जमिनींवर लिहिलीं. तें पाहून हा माझाच पति आहे असें जाणून रतिषेणा ही संतुष्ट झाली. 'रतिवेगा' ही मृणालवती नगरींत श्रीदत्त नामक श्रेष्ठीला विमलश्री नावाच्या पत्नीपासून झाली. व त्याच नगरींत अशोकदेवाची पत्नी जी जिनदत्ता तिला ' सुकांत ' नावाचा पुत्र झाला. रतिवेगा व सुकांत ह्यांचें त्या भवांत पतिपत्नींचेंच नातें होतें. पुढें त्या दोघांचा पारव्याच्या भवांत जन्म झाला. गांधारदेशांतील उशीरवती नगरीचा आदित्यगति नावाचा राजा होता. त्याच्या स्त्रीचें नांव शशिप्रभा होतें. त्या कपोताच्या जोडींपैकीं पुरुष जो ' रतिवर ' तो त्या पुढील भवांत त्या दोघाचा 'हिरण्यवर्मा' नावाचा पुत्र झाला. तसेंच गौरीदेशांत

भोगपुर नगराचा वायुरथ नांवाचा विद्याधरांचा राजा होता. त्याची पत्नी जी स्वयंप्रभादेवी तिच्या उदरीं ती 'रतिषेणा' नांवाची कपोती जैनधर्माच्या प्रभावानें 'प्रभावती' नांवाची कन्या होऊन जन्मली. प्रभावतीनें 'जो मला गतियुद्धांत जिंकील त्याच्या गळ्यांत मी माळ घालीन.' असा पण लाविला होता. त्या पणाप्रमाणें वायुरथ विद्याधरानें कन्येच्या स्वयंवराची घोषणा करून, सिद्धकूट नांवाच्या चैत्यालयाच्या पुढें असलेली माला मेरूच्या भोंवतीं तीन वेळां फिरवून भूमीवर फेंकून दिली. ती माला भूमीला स्पर्श करण्याच्या पूर्वीच प्रभावतीनें घेतली हें पाहून तेथें जमलेले विद्याधर फार लाजले. उघडच आहे कीं, '**समो ननु न मृत्युश्च मानभङ्गेन मानिनाम्।**' अर्थात्, मानीजनांना अपमानापेक्षां मृत्युदेखील बरा वाटतो. नंतर हिरण्यवर्मा त्या ठिकाणीं प्राप्त झाला; व त्यानें तिच्या पणाप्रमाणें तिला गतियुद्धांत जिंकिलें; तेव्हां तिनें हिरण्यवर्म्याच्या गळ्यांत ती रत्नमाला घातली. त्या दोघांचा जन्मांतरींच्या संबंधामुळें वृद्धिंगत झालेल्या सुखसंपर्कानें काल जात असता एके समयीं तें दंपत्य सिद्धकूटनामक पर्वताच्या शिखरावर गेलें; तेथें परमावधिज्ञानी असे एक चारणमुनी होते; या दोघांनीं त्याना आपल्या पूर्वभवांचा वृत्तांत विचारिला. तेव्हां मुनींनीं त्यांच्या पूर्वींच्या तीन भवांची सविस्तर कथा सांगितली. त्यामुळें त्या दोघांचें प्रेम द्विगुणित झालें." शेवटीं 'रतिवेगा' 'रतिषेणा' व 'प्रभावती' मीच आहे असें तेथें जमलेल्या मंडळींना सुलोचनेनें सांगितलें. हें ऐकून तो कुरुवंशोत्पन्न जयकुमार ही

'त्या तिघींचा त्या त्या जन्मांत मी पति झालों होतों' असें ह्मणाला. तें ऐकून सर्वांना सानंदाश्चर्य वाटलें.

नंतर श्रीमान् जयकुमार सुलोचनेला ह्मणाला, 'प्रिये! ह्या कथेमधला उपयुक्त आणि बोधपर असा जो कांहीं भाग राहिला असेल तो ही आह्मां सर्वांना सांग.' तें ऐकून सुलोचनेनें पुढील कथा सांगण्यास सुरवात केली ती अशीः—" आपल्या पुण्य-कर्माच्या परिपाकामुळें प्राप्त झालेलें सुख व राज्य ह्यांचा स्वेच्छे-प्रमाणें उपभोग घेणारा तो आदित्यगति राजाचा पुत्र हिरण्य-वर्मा एके दिवशीं आपल्या कांतेसहवर्तमान अरण्यांत क्रीडा करित होता; त्यावेळीं त्याला आपण आपल्या पूर्वभवांतील संबंध प्रत्यक्षच पहात आहोंत कीं काय असें वाटलें; व त्या-योगें अर्थात् काललब्धीच्या सामर्थ्यानें संसरापासून विरक्त होऊन तो विद्वद्वर हिरण्यवर्मा स्वतःशींच विचार करूं लागला कीः—

" अरेरे! पापी, नाशवंत व अशुद्ध अशा या देहाशीं आपल्या ह्या आत्म्याला ऐक्य वाटतें! ह्या आत्म्याला देहांत राहण्याचें भय वाटत नाहीं. परंतु, ह्या देहांतून निघून जाण्याचें मात्र मोठें भय वाटतें! पहा! ह्या आत्म्याला सुखाच्या मार्गाचा कसा विपर्यास झाला आहे? आत्मा हा स्वभावतः निराकार असून ह्या देहाच्यासंबंधानें साकार झालेला आहे. ह्याला निर्वाण-प्राप्ति झाली ह्मणजेच हा निराकार होणार आहे. ह्मणून ह्यानें कोणत्या तरी रीतीनें देह टाकून दिला पाहिजे. हा पुत्रदारादि-कांचा जो संबंध आहे तो या आत्म्याला केवळ बंध आहे. या जीवाला प्रथम जन्म होतें; मधल्या अवस्थेंत रोग व जरा असते. व

शेवटीं दुष्ट मरण असतें. याप्रमाणें याला अनादिकालापासून या संसारांत चक्राप्रमाणें नित्य भ्रमण करावें लागतें. केवल काल्पनिक सुखानें संतुष्ट होऊन, आत्मस्वरूपापासून होणाऱ्या शाश्वत सुखापासून विन्मुख झालेला हा जीव तांबड्या गुंजांना अग्नि समजून त्याच्या उष्णतेनें संतोष पावणाऱ्या वानरासारखाच मूर्ख होय. निर्जरा [ अंशत. कर्मक्षय ] ही जीवाचें ठिकाणीं सर्वदा आहे. तथापि, बंधाचा नाश झाल्यावांचून ती मुक्तीला कारण होत नाहीं. व बंधाचा नाश त्याला कारणीभूत असलेल्या आस्रवाच्या नाशावांचून होत नाहीं. ह्मणून आश्रवाच्या नाशाविषयीं मी प्रयत्न करीत आहे. पुण्यप्रदेश वगैरे सर्व सामुग्री अनुकूल असताना जर तपश्चर्या होत नाहीं तर ती केव्हा व कशी होणार ? ह्मणून बा आत्म्या, आत्म्याला सुखकर अशा मार्गांत दुरात्मता टाकून तू आपल्या परमात्म्याला आपल्या योगानें आपल्याच ठिकाणीं सर्वांपेक्षां श्रेष्ठ असा कर." ह्याप्रमाणें विचार करून हिरण्यवर्म्यानें सुवर्णवर्म्याला राज्य देऊन, श्रीपालगुरूजवळ जिनदीक्षा ग्रहण केली. हिरण्यवर्म्याची माता शशीप्रभा व पत्नी प्रभावती या दोघींनींही गुणवती नावाच्या आर्यिकेजवळ दीक्षा घेतली. हें योग्यच झालें कारण, आगमकर्ते ह्मणतात, 'कुतश्चन्द्रमसं मुक्त्वा चन्द्रिकायाः स्थितिः पृथक् ।' ह्मणजे चंद्राला सोडून चंद्रिकेचें निराळें राहणें कसें बरें होईल ! असो एकदा सदाचारसंपन्न व निःसंग अशा हिरण्यवर्मा मुनींची व प्रभावती आर्यिकेची सहजा-[illegible] गांठ पडली. त्यावेळीं कुबेरकांताची पत्नी जी प्रियदत्ता

हीहि तेथेंच होती. बोलतां बोलतां प्रभावती प्रियदत्तेला ह्मणाली कीं, तुझ्या घरांत असलेल्या पारव्याच्या जोडींतील मी ' रतिषेणा ' आहे. तें ऐकून आश्चर्यचकित होऊन प्रियदत्तेनें विचारिलें कीं, रतिवर आज कोठें आहे? तेव्हां प्रभावती ह्मणाली कीं, तो हिरण्यवर्मा नावाचा विद्याधराचा राजा झाला. सध्यां त्यांनीं कर्मरूपी शत्रूंचा नाश करण्याकरिता दीक्षा घेतली आहे. ते ही आज ह्याच ठिकाणीं आहेत. तत्काल हिरण्यवर्मा मुनीकडे जाऊन प्रियदत्तेनें त्याना नमस्कार केला. प्रभावतीच्या धर्मोपदेशानें प्रियदत्ता गृहस्थाश्रमापासून विरक्त झाली. व लौकरच तिनेंही दीक्षाग्रहण केली. एकदा हिरण्यवर्मा मुनीनें सात दिवसाची प्रतिज्ञा करून स्मशानात प्रतिमायोग धारण केला असतां नगरवासी लोकांच्या झुंडींच्या झुंडी मुनीच्या पूर्वभवाच्या गोष्टी बोलत बोलत दर्शनास जात येत असत. त्यासमयीं विद्युच्चोर नावाच्या एका दुष्ट माणसाला प्रियदत्तेच्या दासीच्या भाषणावरून हिरण्यवर्ममुनीचा पूर्वभव समजला. तो ऐकून त्या नीचानें हिरण्यवर्ममुनीला व प्रभावतीला एके ठिकाणीं आणून व त्याना एकाच चितेवर ठेऊन जिवंतपणीं जाळून टाकिलें. तो उपसर्ग त्या दोघानीं ध्यानापासून यत्किंचितही न ढळतां शातपणें सहन केला. ते दोघे आपल्या विशुद्धपरिणामामुळें-अतःशुद्धिमुळें-स्वर्गाला गेले. खरोखर, ' क्षमया किं न जायते ' क्षमेनें काय बरें प्राप्त होत नाहीं? सुवर्णवर्म्यानें ( हिरण्यवर्माचा पुत्र ) विद्युच्चोराचें तें कृत्य ऐकून त्याला दंड करण्याची प्रतिज्ञा केली. हिरण्यवर्मा व प्रभावती यांना स्वर्गांत योगबलानें

ही सर्व हकीकत समजली. तत्काल संयमीच्या रूपानें त्या ठिकाणीं येऊन त्या दोघानीं धर्मकथादिकाच्या योगानें सुवर्णवर्म्याच्या अंतःकरणात तत्त्वाविषयीं श्रद्धान उत्पन्न केलें. व त्याचा कोप नाहींसा केला; आणि त्याला आपला सर्व वृत्तांत सांगून ते दोघे दिव्यस्वरूप धारण करून स्वस्थानीं निघून गेले

कोणे एके समयीं वत्स देशातील सुसीमा नगरींत 'शिव घोष' मुनीला घातिकर्मांचा नाश केल्यामुळें केवलज्ञान उत्पन्न झालें. तेव्हा पूर्वीं हिरण्यवर्मा व प्रभावती असलेले देव व देवी हे दोघेही समवसरणसभेंतून तेथें आले. त्यानीं त्या ठिकाणीं आलेल्या 'भीम' नावाच्या साधूला नमस्कार करून धर्मोपदेश करण्याविषयीं प्रार्थना केली. भीममुनीनें जीवादि सात तत्वें, चतुर्गति, त्याला कारणीभूत असलेलें कर्म, त्याचें फल व त्याचा नाश, सम्यक्त्व, यतिधर्म व गृहस्थधर्म वगैरे विषयाचें विशद रीतिनें विवेचन केलें. तें ऐकून त्या दोघानीं 'तुह्मी ही दीक्षा कोणत्या कारणास्तव घेतली ?' असा प्रश्न केला. तेव्हा त्यानें आपली जी कथा सांगितली ती अशीः—

विदेह क्षेत्रातील पुष्कलावती देशात पुंडरीकिणी नगरी आहे. तेथें हा मी भीम माझ्या पापकर्मामुळें एका दरिद्री कुलांत जन्मलों. एके दिवशीं एका यतीची गाठ घेऊन, थोड्या कालादिकाच्या लब्धीमुळें मी धर्मश्रवण करून गृहस्थाचे आठ मूल गुण पाळण्याचा नियम घेतला. ही गोष्ट माझ्या वडिलास समजल्यावर ते मला ह्मणाले, "अरे ! इहलोकीं फल न देणाऱ्या व कठीण अशा व्रताचा तुझ्यासारख्या दरिद्याला काय

उपयोग आहे ? स्वर्गसुखाची इच्छा करणाऱ्यांनीं वाटेल तर हीं व्रतें करावींत. आपण तर ज्याच्यायोगानें ह्या जगांत जीवन होईल अशा ऐहिकफलाची इच्छा करीत आहोंत. करितां, तुला व्रत देणाऱ्याचें ठिकाण मला दाखीव." पित्याचें तें भाषण ऐकून मी त्यांना बरोबर घेऊन निघालों. मार्गांत हिंसा, चोरी, असत्यभाषण, परस्त्रीसेवन इत्यादि पातकें करणाऱ्या अपराध्यांना राजाच्या हुकूमावरून सेवक लोक फांशी देण्यास नेत आहेत असें मी पाहिलें. तेव्हां पापकर्माचें फल इहपरलोकीं अगदीं दुस्तर आहे असें जाणून, व्रतांचा त्याग करणें इष्ट नाहीं असें मला वाटलें. तसेंच आह्मांला देखील हें जें दारिद्र्य आलें आहे तें पूर्वजन्मींच्या पापकर्माचेंच फळ आहे असा विचार करून, मी विरक्त होऊन दीक्षा घेतली. सद्गुरुकृपेनें लौकरच मी सर्वशास्त्रांत निष्णात झालों; व त्यायोगें माझे परिणामही दिवसेंदिवस जास्त जास्त शुद्ध होत चालले.

एके दिवशीं सुदैवानें सर्वज्ञ मुनीजवळ माझ्या दुष्ट अशा पूर्वीच्या अनेकजन्मांची कथा मला ऐकण्यास मिळाली. त्या वेळीं मुनी मला ह्मणाले, " वा भीमा ! तूं पूर्वी मृणालवती नगरींत भवदेव नांवाचा वैश्यपुत्र होतास; त्या भवांत रतिवेगा व सुकांत ह्यांच्याशीं व्यर्थ द्वेष धारण करून त्वां त्यांना मारिलेंस. पुढें त्यांच्या कबूतराच्या जन्मांत तूं मांजर होऊन मरण पावलास. नंतर त्यांच्या विद्याधरांच्या जन्मांत तूं विद्युचोर होऊन त्यांना ( हिरण्यवर्मा व प्रभावती ) एका चितेवर जिवंतपणीं जाळलेंस. त्या पापकर्मामुळें नरकांत दुःख भोगून तेथून ह्या ठिकाणीं

ही सर्व हकीकत समजली. तत्काल संयमीच्या रूपानें त्या ठिकाणीं येऊन त्या दोघांनीं धर्मकथादिकांच्या योगानें सुवर्णवर्म्याच्या अंत:करणांत तत्वाविषयीं श्रद्धान उत्पन्न केलें. व त्याचा कोप नाहींसा केला; आणि त्याला आपला सर्व वृत्तांत सांगून ते दोघे दिव्यस्वरूप धारण करून स्वस्थानीं निघून गेले

कोणे एके समयीं वत्स देशातील सुसीमा नगरींत 'शिवघोष' मुनीला घातिकर्मांचा नाश केल्यामुळें केवलज्ञान उत्पन्न झालें. तेव्हां पूर्वी हिरण्यवर्मा व प्रभावती असलेले देव व देवी हे दोघेही समवसरणसभेंतून तेथें आले. त्यांनीं त्या ठिकाणीं आलेल्या 'भीम' नावाच्या साधूला नमस्कार करून धर्मोपदेश करण्याविषयीं प्रार्थना केली. भीममुनीनें जीवादि सात तत्वें, चतुर्गति, त्याला कारणीभूत असलेलें कर्म, त्याचें फल व त्याचा नाश, सम्यक्त्व, यतिधर्म व गृहस्थधर्म वगैरे विषयांचें विशदरीतिनें विवेचन केलें. तें ऐकून त्या दोघांनीं 'तुह्मी ही दीक्षा कोणत्या कारणास्तव घेतली ?' असा प्रश्न केला. तेव्हां त्यानें आपली जी कथा सांगितली ती अशी:—

विदेह क्षेत्रांतील पुष्कलावती देशांत पुंडरीकिणी नगरी आहे. तेथें हा मी भीम माझ्या पापकर्मामुळें एका दरिद्री कुलांत जन्मलों. एके दिवशीं एका यतीची गाठ घेऊन, थोड्या कालादिकांच्या लब्धीमुळें मी धर्मश्रवण करून गृहस्थाचे आठ मूल गुण पाळण्याचा नियम घेतला. ही गोष्ट माझ्या वडिलास समजल्यावर ते मला ह्मणाले, "अरे ! इहलोकीं फल न देणाऱ्या व .७। कठीण अशा व्रतांचा तुझ्यासारख्या दरिद्याला काय

ही सर्व हकीकत समजली. तत्काल संयमीच्या रूपानें त्या ठिकाणीं येऊन त्या दोघानीं धर्मकथादिकांच्या योगानें सुवर्णवर्म्याच्या अंत:करणांत तत्वाविषयीं श्रद्धान उत्पन्न केलें. व त्याचा कोप नाहींसा केला; आणि त्याला आपला सर्व वृत्तांत सांगून ते दोघे दिव्यस्वरूप धारण करून स्वस्थानीं निघून गेले.

कोणे एके समयीं वत्स देशांतील सुसीमा नगरींत 'शिवघोष' मुनीला घातिकर्मांचा नाश केल्यामुळें केवलज्ञान उत्पन्न झालें. तेव्हां पूर्वी हिरण्यवर्मा व प्रभावती असलेले देव व देवी हे दोघेही समवसरणसभेंतून तेथें आले. त्यांनीं त्या ठिकाणीं आलेल्या 'भीम' नांवाच्या साधूला नमस्कार करून धर्मोपदेश करण्याविषयीं प्रार्थना केली. भीममुनीनें जीवादि सात तत्वें, चतुर्गति, त्याला कारणीभूत असलेलें कर्म, त्याचें फल व त्याचा नाश, सम्यक्त्व, यतिधर्म व गृहस्थधर्म वगैरे विषयांचें विशद रीतिनें विवेचन केलें. तें ऐकून त्या दोघांनीं 'तुह्मी ही दीक्षा कोणत्या कारणास्तव घेतली ?' असा प्रश्न केला. तेव्हां त्यानें आपली जी कथा सांगितली ती अशीः—

विदेह क्षेत्रांतील पुष्कलावती देशांत पुंडरीकिणी नगरी आहे. तेथें हा मी भीम माझ्या पापकर्मामुळें एका दरिद्री कुलांत जन्मलों. एके दिवशीं एका यतीची गाठ घेऊन, थोड्या कालादिकांच्या लब्धीमुळें मी धर्मश्रवण करून गृहस्थाचे आठ मूल गुण पाळण्याचा नियम घेतला. ही गोष्ट माझ्या वडिलास समजल्यावर ते मला ह्मणाले, "अरे! इहलोकीं फल न देणाऱ्या व करण्याला कठीण अशा व्रतांचा तुझ्यासारख्या दरिद्र्याला काय

उपयोग आहे ? स्वर्गसुखाची इच्छा करणाऱ्यानीं वाटेल तर हीं व्रतें करावींत आपण तर ज्याच्यायोगानें ह्या जगात जीवन होईल अशा ऐहिकफलाची इच्छा करीत आहोंत करिता, तुला व्रत देणाऱ्याचें ठिकाण मला दाखीव." पित्याचें तें भाषण ऐकून मी त्याना बरोबर घेऊन निघालों. मार्गांत हिंसा, चोरी, असत्यभाषण, परस्त्रीसेवन इत्यादि पातकें करणाऱ्या अपराध्याना राजाच्या हुकूमावरून सेवक लोक फाशी देण्यास नेत आहेत असें मी पाहिलें. तेव्हा पापकर्माचें फल इहपरलोकीं अगदीं दुस्तर आहे असें जाणून, व्रताचा त्याग करणें इष्ट नाहीं असें मला वाटलें तसेंच आह्माला देखील हें जें दारिद्र्य आलें आहे तें पूर्वजन्मींच्या पापकर्मांचेंच फळ आहे असा विचार करून, मी विरक्त होऊन दीक्षा घेतली सद्गुरुकृपेनें लौकरच मी सर्वशास्त्रात निष्णात झालों, व त्यायोगें माझे परिणामही दिवसेंदिवस जास्त जास्त शुद्ध होत चालले.

एके दिवशीं सुदेवानें सर्वज्ञ मुनीजवळ माझ्या दुष्ट अशा पूर्वींच्या अनेकजन्माची कथा मला ऐकण्यास मिळाली. त्या वेळीं मुनी मला ह्मणाले, " वा भीमा ! तू पूर्वी मृणालवती नगरींत भवदेव नावाचा वैश्यपुत्र होतास, त्या भवात रतिवेगा व सुकात ह्याच्याशीं व्यर्थ द्वेष धारण करून त्या त्याना मारिलेंस. पुढें त्याच्या कबूतराच्या जन्मात तू माजर होऊन मरण पावलास नतर त्याच्या विद्याधराच्या जन्मात तू विद्युचोर होऊन त्याना ( हिरण्यवर्मा व प्रभावती ) एका चितेवर जिवतपणीं जाळलेंस. त्या पापकर्मामुळें नरकात दु ख भोगून तेथून ह्या ठिकाणीं

आला आहेस." ह्याप्रमाणें त्या सर्वज्ञ मुनीनें सांगितलेला आपला वृत्तांत त्या भीममुनीनें त्या देवाला व देवीला सांगितला. " पूर्वी ज्यांना तीन वेळां मारिलें ते आह्मीं आहोंत." असें ह्मणून आह्मी दोघे देव व देवी मुनीला भक्तिभावानें नमस्कार करून निघून गेले. पुढें त्या भीममुनीला केवलज्ञान प्राप्त झालें. *त्यावेळीं देव व देवी असें आह्मीं ( हिरण्यवर्मा व प्रभावती )* देखील मुनिवंदनेकरितां तेथें गेलों होतों. प्रभूपासून धर्मोपदेश श्रवण करून आह्मीं तेथून स्वर्गाला निघून गेलों." याप्रमाणें सुलोचनेनें आपण केलेल्या शुभाशुभकर्मांच्या उदयामुळें प्राप्त झालेली आपली उच्च नीच स्थिति सभेंतील सर्व लोकांना आपल्या अस्खलित व रसाळ वाणीनें सांगितली. तिचें तें भाषण ऐकून जयकुमारप्रभृति सर्वजण अत्यंत संतुष्ट झाले. पण तिच्या सवतींचीं मुखें मात्र अस्थानीं केलेल्या मत्सरामुळें म्लान झालीं. ह्मणून आचार्य ह्मणतातः—' **अस्थाने कृतमत्सरोऽसुखकरस्त्याज्यस्ततोऽसौबुधैः ।**' अर्थात्, अयोग्य ठिकाणीं केलेला मत्सर दुःखदायक होतो; एवंच सूज्ञांनीं तो टाकावा. नंतर सुलोचना जयकुमाराला पुनः ह्मणते, " हे राजाधिराज! आपण पूर्वी रतिवेगेबरोबर सुकांत नांवाचे वैश्य झालांत. पुढें रतिषेणेसह कुबेरकांत श्रेष्ठीच्या घरीं रतिवर झालांत. प्रभावतीसह हिरण्यवर्मा नांवाचे विद्याधरभूपति झालांत. व नंतर मीच जी महादेवी तिच्याशी सह आपण कल्पवासी देव झालांत." तिचें तें रसयुक्त व मधुर असें भाषण ऐकून, त्या रसिक कुमाराला याहून अधिक ऐकण्याची इच्छा झाली. योग्यच आहे

कीं, 'न रसिकश्रयितोक्तैः कामुकास्तृप्नुवन्ति' ह्मणजे रसिक स्त्रीच्या भाषणांनीं कामिजन तृप्त होत नाहींत.

## पर्व ४७ वें.

### प्रथमतीर्थकरचक्रधरपुराण.

नंतर जयकुमार 'श्रीपाल चक्रवर्तीची कथा आह्मांला सांग.' असें ह्मणाला. तेव्हां सुलोचनेनें तीही कथा सांगितली; "आह्मी ( जयकुमार व सुलोचना ) स्वर्गाला जाऊन, तेथें आह्मांला योग्य अशा प्रकारचें दिव्य सुख भोगून शेवटीं राहिलेल्या पुण्यामुळें ह्या ठिकाणीं प्राप्त झालों आहोंत!" असें सांगून तिनें आपली कथा संपविली. ती ऐकून, जयकुमारादि सभेंत असलेले सर्व लोक आनंदातिरेकानें डुलूं लागले. व तिनें सांगितलेली कथा सर्वस्वी सत्य आहे असें प्रत्येकास वाटूं लागलें. हें योग्यच आहे. कारण, 'कः प्रत्येति न दुष्टश्चेत्सद्भिर्निगदितं वचः' अर्थात्, दुष्ट माणसाशिवाय सज्जनांच्या भाषणावर कोणता माणूस विश्वास ठेवणार नाहीं बरें? असो. याप्रमाणें जयकुमार व सुलोचना हे दोघे अनेक प्रकारचे अनुपमेय सुखोपभोग अनुभवित कालक्रीडा करीत होते. विद्याधराच्या भवामध्यें प्राप्त झालेल्या प्रज्ञप्ति आदि विद्यांच्या सामर्थ्यानें देवांनीं विहार करण्याच्या प्रदेशांत आपणही आपल्या पत्नीसह क्रीडा करावी अशी जयकुमारास एकदां इच्छा उत्पन्न झाली; व त्याप्रमाणें त्यानें राज्याची व्यवस्था आपला कनिष्ठ बंधु जो 'विजय' याजवर सोंपविली.

व तो सुलोचनेसह विहार करण्यास निघाला. समुद्र, कालचक्र, नद्या व अनेक प्रकारचीं रमणीय अरण्यें ह्यामध्यें विहार करून एके दिवशीं तें जोडपें कैलास पर्वतावरील अरण्यांत येऊन पोहचलें. जयकुमार तेथील अनुपम सृष्टिशोभा पहात पहात, सुलोचनेला मागें टाकून थोडा दूर गेला. एके समयीं सभेमध्यें अमरेंद्रानें जयकुमार व सुलोचना ह्या दोघाच्या शीलमहात्म्याची फारच स्तुति केली. ती ऐकून रविप्रभ नावाच्या देवानें जयाच्या शीलाची परीक्षा पहावी या हेतूनें काचना नावाच्या देवीला त्याच्या जवळ पाठविलें. ती त्या कुमाराजवळ येऊन ह्मणाली --

" महाराज ! मी तुह्माला महामेरु पर्वतावरील नंदनवनात क्रीडा करीत असताना प्रथम पाहिलें. त्या दिवसापासून मी आपलें सारखें चिंतन करीत आहे. मी मदनानें अत्यत व्याकुळ झाली आहे. माझ्यावरोबर असलेल्या सर्व लोकाना सोडून देऊन आपल्यावरील प्रेमामुळें मी आपणाकडे आली आहे. सबब, प्रसन्न होऊन या दासीचे मनोरथ पूर्ण करा." तेव्हा जयकुमार ह्मणाला. " पराङ्गनाङ्गसंसर्गसुखं मे विषभक्षणम्। अर्थात्, परस्त्रीच्या देहस्पर्शापासून होणारें सुख मला विषभक्षण केल्याप्रमाणें आहे. बाई ! तू असलें पाप मनात आणू नकोस, तू माझी बहीण आहेस. मी मुनीवरापासून शीलव्रत घेतलें आहे." ह्याप्रमाणें जयकुमाराचें भाषण ऐकून, त्या देवीनें क्रोधानें आपणाला कप सुटला आहे असा बहाणा केला. व राक्षसीचा वेष धारण करून ती जयकुमाराला घेऊन निघाली. मार्गांत फुलें वेचण्यात गुतलेल्या सुलोचनेची व तिची गाठ पडून, सुलोच-

नेनें तिची अत्यंत निर्भत्सना केली. ती देवी सुलोचनेच्या शील महात्म्यानें भीऊन त्याठिकाणींच गुप्त झाली. आचार्य ह्मणतातः– 'आविर्भ्यद्देवता चैवं शीलवत्याःपरे न के' 'अर्थात्, शीलवती स्त्रियांना जर देवता भिऊं लागली, तर दुसरें कोण बरें भिणार नाहींत ? ती कांचना देवी त्यांचें शीलमाहात्म्य जाणून आपल्या स्वामीकडे गेली. व तिनें ही त्या दोघांच्या शीलाची अत्यंत प्रशंसा केली. ती ऐकून तो गुणज्ञ रविप्रभ देव अत्यंत संतुष्ट होऊन त्या दंपत्याकडे गेला; व त्यांना आपला वृत्तांत सांगून ' माझ्या त्या अत्याचाराची तुह्मी दोघांनीं क्षमा केली पाहिजे. ' असें ह्मणाला. आणि तो त्यांची अमूल्य रत्नांनीं पूजा करून स्वर्गाला गेला. नंतर जयराजा कांतिसहवर्तमान तिकडे दीर्घ कालपर्यंत विहार करून, आपल्या नगराला येऊन तेथेंही अनेक प्रकारच्या दिव्यसुखाचा अनुभव घेऊं लागला. एकदां हा श्रीमान् जयकुमार भगवान् आदितीर्थंकराच्या दर्शनास गेला. सर्वज्ञ प्रभूला नमस्कार करून, धर्मसंबंधीं प्रश्न करून व त्यांचीं यथायोग्य उत्तरें मोठ्या भक्तिभावानें श्रवण करून, तो महाज्ञानी जयराजा अक्षेपिणी विक्षेपणी वगैरेंच्या गोष्टी बोलूं लागला.

(आक्षेपिणी म्हणजे ज्यांत आपल्या मताचा संग्रह होतो अशी कथा. २ विक्षेपिणी ह्मणजे ज्यांत दुसऱ्याच्या मताचें खंडन होतें अशी कथा. ३ संवेजनी ह्मणचे धर्म व धर्माचें फळ याविषयीं भक्ति उत्पन्न करणारी कथा. व ४ निर्वेजनी

---

टीपः—१ आक्षेपणी, २ विक्षेपणी, ३ संवेजनी, व निर्वेजनी ह्या चार प्रकारच्या मापकाला जैनमधात कथा ( गोष्टी ) असें नाव आहे.

व तो सुलोचनेसह विहार करण्यास निघाला. समुद्र, कालचक्र, नद्या व अनेक प्रकारचीं रमणीय अरण्यें ह्यामध्यें विहार करून एके दिवशीं तें जोडपे कैलास पर्वतावरील अरण्यात येऊन पोहचलें. जयकुमार तेथील अनुपम सृष्टिशोभा पहात पहात, सुलोचनेला मार्गे टाकून थोडा दूर गेला. एके समयीं सभेमध्यें अमरेंद्रानें जयकुमार व सुलोचना ह्या दोघाच्या शीलमहात्म्याची फारच स्तुति केली. ती ऐकून रविप्रभ नावाच्या देवानें जयाच्या शीलाची परीक्षा पहावी या हेतूनें काचना नावाच्या देवीला त्याच्या जवळ पाठविलें. ती त्या कुमाराजवळ येऊन ह्मणाली --

" महाराज ! मी तुह्माला महामेरु पर्वतावरील नंदनवनात क्रीडा करीत असताना प्रथम पाहिलें. त्या दिवसापासून मी आपलें सारखें चिंतन करीत आहे. मी मदनानें अत्यत व्याकुळ झाली आहे. माझ्याबरोबर असलेल्या सर्व लोकाना सोडून देऊन आपल्यावरील प्रेमामुळें मी आपणाकडे आली आहे. सबब, प्रसन्न होऊन या दासीचे मनोरथ पूर्ण करा." तेव्हा जयकुमार ह्मणाला. " पराङ्गनाङ्गसंसर्गसुखं मे विषभक्षणम्। अर्थात्, परस्त्रीच्या देहस्पर्शापासून होणारें सुख मला विषभक्षण केल्याप्रमाणें आहे. बाई ! तू असलें पाप मनात आणू नकोस, तूं माझी बहीण आहेस. मी मुनीवरापासून शीलव्रत घेतलें आहे." ह्याप्रमाणें, जयकुमाराचें भाषण ऐकून, त्या देवीनें क्रोधानें आपणाला कप सुटला आहे असा बहाणा केला. व राक्षसीचा वे धारण करून ती जयकुमाराला घेऊन निघाली. मार्गांत फु वेचण्यात गुतलेल्या सुलोचनेची व तिची गाठ पडून, सुलोच

पडत नाहींत तो धर्म होय. तो धर्म—सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, सम्यक्चारित्र व तपश्चर्यारूपी क्रिया—असा चार प्रकारचा आहे. प्रथम **सम्यग्दर्शनाचें** लक्षण सागतोः—

जीवादिसप्तके तत्वे श्रद्धानं यत्स्वतोऽञ्जसा ।
परप्रणयनाद्वा तत्सम्यग्दर्शनमुच्यते ॥

**अर्थः**—जीव वगैरे सात तत्वाच्या ठिकाणीं आपोआप किंवा परोपदेशामुळें जें निश्चयपूर्वक श्रद्धान तें ' **सम्यग्दर्शन** ' होय. आतां सम्यग्ज्ञानाचें व चारित्राचें स्वरूप सांगतो.

शङ्कादिदोषनिर्मुक्तं भावत्रयविवेचितम् ।
तेषां जीवादिसप्तानां संशयादिविसर्जनात् ॥
याथात्म्येन परिज्ञानं सम्यग्ज्ञानं समादिशेत् ।
यथा कर्मास्रवो न स्याच्चारित्रं संयमस्तथा ॥

**अर्थः**—ज्याच्याबद्दल शंकादि दोष नाहींत, औपशमिक, क्षायिक व क्षायोपशमिक ह्या तिन्ही भावांनीं ज्याचा निश्चय केला आहे, व संशयादि दोष गेल्यामुळें होणारें जीवादि सात तत्वांच्या स्वरूपाचें जें यथार्थ ज्ञान त्याला ' **सम्यग्ज्ञान** ' असें ह्मणावें. ज्यायोगें कर्मास्रव न होईल अशा प्रकारचा जो संयम तें ' **चारित्र** ' होय. व '**निर्जरा कर्मणां येनतेन वृत्तिस्तपो मतम्** ' ह्मणजे ज्यायोगानें कर्मांची निर्जरा होते तशी वृत्ति ह्याला ' **तप** ' ह्मणतात. हीं चार जर कषायांनें मिश्र असलीं, तर स्वर्गप्राप्तीला साधनीभूत होतात; व जर कषायरहित असलीं तर भव्य अशा मुमुक्षू जीवांना स्वर्गप्राप्तिच काय पण, मोक्षप्राप्ति करून देण्याला सुद्धा साधनीभूत

होतात. हा चार प्रकारचा मोक्षमार्ग जीवांला फारच दुर्लभ आहे. १ मिथ्यात्व, २ व्रतशून्य आचार, ३ प्रमाद, ४ कषायीपणा व ५ शुभाशुभ योग हीं जीवाला कर्मबंध होण्याचीं कारणें आहेत. १ प्रकृति, २ स्थिति, ३ अनुभाग व ४ प्रदेश असे बंधाचे चार प्रकार आहेत. व कर्मे हीं आपल्या उदयाच्या प्राप्तीनें फल देण्यास व बंध उत्पन्न करण्यास कारणीभूत आहेत." याप्रमाणें आपल्या अधिकारयुक्त वाणीनें धर्मस्वरूप सांगून श्रीवृषभनाथ पुढें ह्मणतातः—

"अहो भव्य व आगमज्ञ पंडितहो ! नानाप्रकारचे दोष, अचिंत्य दुःखें व असंख्य पातकें ह्यांनीं पूर्ण भरलेला असल्यानें भयंकर असा जो गृहस्थाश्रम त्याचा तुह्मी त्याग करा. गुप्ति वगैरे सहा प्रकाराचा स्वीकार करून, ( १ तीन गुप्ति, २ पांच समिति, ३ दश धर्म, ४ बारा अनुप्रेक्षा, ५ बावीस परिषहजय व ६ तेरा प्रकारचें चारित्र ) वीतराग वगैरे प्रकार, अथवा पुलकादि प्रकार, आणि प्रमत्तादि गुणस्थानाचे भेद ह्यांपैकीं कोणत्याही प्रकारात यथायोग्य राहिलेले असे होत्साते, निश्चयनय व व्यवहारनय ह्या दोन प्रकारानीं सांगितलेल्या निर्दोष अशा मोक्षाचा तुह्मी अवलंब करा. अर्थात् मोक्ष मिळवा !

गृहस्थाश्रमांत असलेले तुह्मी प्रथम सम्यग्दर्शन संपादन करून, अकरा प्रकारच्या उपासकव्रतांचा आश्रय करा. दान, उपवास व अरहंतपूजा हीं करा शीलव्रताचा अंगिकार करा; व सज्जाति, सद्गृहस्थत्व, पारिव्राज्य, सुरेंद्रता, साम्राज्य, परमार्हंत्य व निर्वाण हीं सात परमस्थानें प्राप्त करून घ्या."

भरतचक्रवर्ती प्रभृति सभेंतील सर्व मंडळी आदिप्रभूचा हा धर्मोपदेश ऐकून अत्यंत संतुष्ट झाली. परमात्म्याच्या त्या अलौकिक वाक्प्रभावानें सर्व जीवांचा मिथ्यात्वांधःकार दूर होऊन, त्यांच्या अंतःकरणात ज्ञानरूपी सूर्याचा उदय झाला. नंतर तीन प्रकारचें ज्ञानरूपी नेत्र ( मतिज्ञान, श्रुतिज्ञान व अवधिज्ञान ) व सम्यक्त्व ह्यांच्या योगानें शुद्धीला सेवन करणारा व देशसंयम ठेवणारा असा सम्राट् भरत विधात्याला नमस्कार करून, कैलासपर्वतावरून आपल्या सर्वांगसुंदर अशा अयोध्या नगरीला परत गेला.

इकडे, त्र्यैलोक्याधिपति श्रीवृषभनाथ हा धर्मक्षेत्रांचें ठिकाणीं निरंतर धर्मबीजांची पेरणी करून त्या बीजांना धर्मकथनरूपी वृष्टीनें जलसिंचन करित असे. याप्रमाणें आदिप्रभूनें मोक्षफलाच्या प्राप्तीकरितां १०१४ दिवस ज्यांत कमी आहेत अशीं एक लक्ष वर्षें आपल्या सर्व गणासहवर्तमान विहार केला. व शेवटीं, कैलासपर्वतावर येऊन श्रीशिखर व सिद्धशिखर ह्या दोहोंच्या मध्यप्रदेशांत पौषमहिन्यांतील पौर्णिमेच्या दिवशीं निरिच्छ होऊन, शेष कर्म दग्ध करण्याकरितां पर्यंकासनाचा स्वीकार केला. त्यावेळीं, भरतराजाला स्वप्नांत महामंदर नांवाचा पर्वत सिद्धक्षेत्रापर्यंत वाढून राहिलेला दिसला. जयराकुमाराचा पुत्र जो अनंतवीर्यराजा त्यानें स्वप्नांत नक्षत्रांनीं युक्त असा चंद्र त्र्यैलोक्याला प्रकाशित करून, जाऊ लागला आहे असें पाहिलें. प्रातःकालीं, भरतचक्रवर्ती प्रभृति अनेक राजांनीं आपापल्या पुरोहितांना त्या त्या स्वप्नांचीं फलें विचारिलीं. तेव्हां " हीं सर्व

स्वप्नें कर्मांचा समूळ नाश करून, भगवान् पुरूचें-प्रथम तीर्थकराचें-पुष्कळ मुनीसहवर्तमान मुक्तिपदाचें ठिकाणीं गमन सुचवितात. " ह्याप्रमाणें प्रत्येकानें त्यांचा अर्थ सांगितला. इकडे श्रीमान् भरतचक्रवर्तीच्या दरबारांत त्याचा विद्वान् पुरोहित वरील प्रमाणेंच स्वप्नांची फलश्रुति सांगत असतां, आनंद नांवाचा कोणी एक देव तेथें आला; व आदितीर्थंकराची स्थिती सांगून तो ह्मणाला, ' महाराज ! भगवान् पुरूनें आपला दिव्यध्वनि बंद केला असतां, सूर्यास्त झाल्यावर सरोवरातील कमळांची जशी स्थिति होते तशीच सभेंतील सर्व लोकांची स्थिति झाली. (सर्वांनीं आपले हात जोडले.)' हें ऐकण्याबरोबर सम्राट् भरत त्वरेनें सर्वांसहवर्तमान त्या जगद्गुरूजवळ आला; व त्याला तीन प्रदक्षिणा करून, त्यानें स्वतः ' महामह ' नांवाची महापूजा केली. ह्याप्रमाणें चक्रवर्ती चवदा दिवस भगवताची सेवा करीत होता. नंतर, माघमासाच्या ' कृष्ण-पक्षातील चतुर्दशीच्या दिवशीं सूर्योदय झाल्यावर, अभिजित् नांवाच्या मुहूर्तावर सर्व मुनींसह पूर्वेकडे तोंड करून व पर्यंकासन घालून, प्रभूनें सूक्ष्मक्रियाप्रतिपाति नांवाच्या तिसऱ्या शुक्लध्यानानें मन, वचन व काय ह्या तिन्ही योगाचा निरोध केला. तदनंतर, व्युपरतक्रियानिवृत्ति नांवाच्या शेवटच्या ध्यानानें पांच ह्रस्व स्वर उच्चारण्यास लागणाऱ्या काला इतक्या अवधींत संपूर्ण अघातियाकर्मांचा (नाम, गोत्र, वगैरेंचा) नाश करून, श्रीआदिनाथमहाराज शेवटच्या-चौदाव्या- गुण-स्थानाच्या ठिकाणीं स्थित झाले. त्यावेळीं त्या परमात्म्याच्या

परमौदारिक, तैजस व कार्माण ह्या तिन्ही शरीरांचा नाश होऊन तो **सिद्धपर्यायाला** प्राप्त झाला. तत्काल आपल्या आठ गुणांनीं जो पूर्ण झाला आहे, व ज्यानें आपल्या देहापेक्षां प्रमाणानें थोडी कमी अशी निर्मल व अविनाशी मूर्ति धारण केली आहे असा तो **आदिनाथ** सर्व विश्वाला निरंतर प्रत्यक्ष पहात राहिला. अर्थात् त्याला सर्वश्रेष्ठ असें निर्वाणपद प्राप्त झालें. त्यासमयीं सर्व देव प्रभूची शेवटची पूजा करण्याच्या इच्छेनें तेथें आले; व 'हें भगवंताचें पवित्र, मोक्षाचें उत्तम साधन व निर्मळ असें शरीर आहे.' असें ह्मणून, त्यांनी तें पालखींत ठेविलें. नंतर त्यांनीं तें जड शरीर अपूर्व सुगंधानें युक्त करून दहन केलें देवेंद्रांनीं श्रीवृषभनाथाचें भस्म घेऊन 'आह्मी हीं ह्या जिनेंद्राप्रमाणेंच होऊं' अशा बुद्धीनें तें भस्म कपाळावर भक्तीनें लाविलें; मग धर्मप्रेमानें युक्त झालेल्या त्या इंद्रांनीं संतोषानें एके ठिकाणीं जमून आनंद नाटक केलें यामाणें परमात्म्याची निर्वाणपूजा करुन, त्याच्या नांवानें जयजयकार करून ते स्वस्थानास निघून गेले. त्यावेळीं महाज्ञानी असे भरतचक्रवर्ती हीं इष्टवियोगामुळें अत्यंत शोक करू लागले. तेव्हा त्याचा शोक नाहींसा करण्याच्या इच्छेनें श्रीवृषभसेन गणधरांनीं सर्वांची **भवावलि** सांगण्यास आरंभ केला **वृषभसेन** ह्मणाले.—

"भगवान् पहिल्या जन्मीं जयवर्मा होता. तो दुसऱ्या जन्मीं **महाबल** राजा झाला. तिसऱ्या जन्मीं **ललितांग** नांवाचा देव झाला. चौथ्या भवांत **वज्रजंघ** राजा झाला. पांचव्या भवात भोगभूमींतला **आर्य** झाला. सहाव्या भवांत **श्रीधर** देव

होऊन तेथून सातव्या भवांत सुविधि नांवाचा राजा झाला. आठव्या भवांत अच्युत कल्पांतला देव झाला. नवव्या भवांत **वज्रनाभि** राजा झाला. दहाव्या जन्मीं सर्वार्थसिद्धींतला अहमिंद्र झाला व तेथून अवतार करून सर्व इंद्रांनीं पूजिलेला असा श्रीवृषभ नांवाचा या युगांतील प्रथम तीर्थंकर झाला. "

" तसेंच, हा श्रेयान् राजा आदितीर्थंकरास प्रथम आहरदान देऊन दानतीर्थाचा प्रवर्तक व पंचाश्चर्यरत्नवृष्टीचा आद्य-नायक झाला. हे **भरता**! पूर्वजन्मीं तूं अहमिंद्र होतास. तोच तूं आतां सहा खंडांचें अखंड पालन करणारा भरतचक्रवर्ती झाला आहेस. बाहुबलि हा पूर्वजन्मीं अहमिंद्र देव होता. तेथून चवून तो तुझा उत्कर्षशाली बंधु झाला. मी ही पूर्वजन्मीं अहमिंद्र होतों; तेथून येथें भगवंताच्या पोटीं जन्म घेऊन **वृषभसेन** नांवाचा गणधर झालों. "

ह्याप्रमाणें पूर्वभव सांगून पुढें श्रीवृषभसेन गणधर ह्मणतातः—

" हे **भरता**, या संसाररूपी संकटांत इष्टवियोग व अनिष्ट-संयोग सर्व संसारी जीवाला होतच असतो. अरे! हें तूं सर्व जाणत असूनही असा खिन्न कां झालास? राजा! ज्याचीं अष्ट हीं कर्में नष्ट झालीं आहेत असा हा भगवान् श्रीवृषभदेव निरुपम व शाश्वत अशा निर्वाणाप्रत पोंचला! याबद्दल संतोष मानावयाचा सोडून दुःख कां करतोस? चरमांगी ( ज्यांना पुनः जन्म नाहीं ) असे आह्मी ही ( भरत, वृषभसेन वगैरे ) श्री-जिनेंद्राच्या संगतीमुळें संपूर्ण मलाचा नाश करून व आत्म-स्वरूपाची प्राप्ति करून घेऊन, लवकरच निरुपम, अनंत,

अविनाशी व उत्कृष्ट सुख ज्यांत आहे असें जें मोक्षपद त्याप्रत प्राप्त होऊं. बा भरता! मरण पावलेल्या जीवाला कर्मक्षय न झाल्यामुळें, जर पुनर्जन्म घ्यावा लागणार असेल तर त्याच्या मृत्यूबद्दल शोक करणें कांहींसें क्षम्य होईल. परंतु, आपण ज्यावर प्रेम करीत आहोंत तो जीव (आदिप्रभू) मरणानंतर मुक्त होत आहे; करितां, अशा उत्सवाच्या प्रसंगीं शोक करणें हें प्रेमाचें खास लक्षण नव्हे! हे निधिपते! ह्या वृषभस्वामींचे घाति अघातिकर्मरूपी आठ ही दुष्ट शत्रु समूल नष्ट झाले आहेत; व हा आठ गुणांनीं युक्त झाला आहे. असें आहे तर ह्यांत त्याचा नाश तो काय झाला? कांहीं नाहीं. ह्मणून तूं हा दुष्ट मोह टाकून दे. व त्याला जिंकण्याकरितां शुद्ध अशी बुद्धि धारण कर. राजा! तुझा हा पिता त्रिकालज्ञानी असल्यानें ह्या त्रिभुवनाचा गुरु आहे. असें असून तूं मोहनीय कर्माच्या उदयामुळें उत्पन्न झालेल्या प्रेमानें शोक करून त्याला न्यूनत्व देतोस काय? ह्या जगांत अज्ञानी जीव आपल्याला सुखकर काय आहे व दुःखकर काय आहे ह्याबद्दल मनांत खोटीच कल्पना करून कांहीं वस्तूंचा द्वेष करितो; कांहीं वस्तूंची अपेक्षा करितो; व ह्यांत विपर्ययही करितो; ह्मणजे सुखकर वस्तूला दुःखकर मानितो व पूर्वीं दुःखकर मानलेल्या वस्तूला सुखकर मानितो. व त्या योगानें हा भव्य असूनही अभव्याप्रमाणें पापकर्माच्या पाठीं लागून कुमार्गाचें सेवन करीत, दरिद्री अथवा रोगी होऊन, दुःखें भोगणारा असा होत्साता, ह्या संसाररूपी अरण्यांत फिरत रहातो. हे

पृथ्वीपते! भव्य अशा भगवान् पुरुजिनेंद्राला देखील कालादि-लब्धि न मिळाल्यामुळें जन्म घ्यावा लागला. बाबारे! काल हा अनादि असून अचिंतनीय अशा दुःखानीं भरला आहे; म्हणून, ह्या संसाराच्या स्थितीला धिक्कार असो! अनंतकाळ संसारभ्रमण केल्यामुळें ह्या जीवाचे शेंकडों संबंध आजपर्यंत होऊन गेले आहेत. ही गोष्ट ज्ञानी अशा तुला समजूं नये काय? मग एकाद्या अज्ञानी जीवाप्रमाणें मोहनीय कर्माला वश होऊन, शोक करणें हें तुझ्यासारख्याला अगदीं उचित नाहीं. हे श्रीमान् भरतेश्वरा! त्रैलोक्याधिपति जो श्रीआदिनाथ त्याची देखील शरीरादि सर्व संपत्ति कर्मापासून उत्पन्न झालेली असल्यानें ती चिरस्थायी नाहीं. आणि म्हणूनच ज्ञानी लोक ती संपत्ति सर्वथैव त्याज्य आहे असें मानितात. हे भूपते! जो वीतराग पुरु पूर्वीं चर्मचक्षूंना दिसत होता, त्याच्याकडे तूं आतां ज्ञानचक्षूंनीं पहा! म्हणजे तो तुझ्या अंत करणात तुला दिसेल? करितां बाबारे! आपल्या निर्मल ज्ञानरूपी उदकाच्या योगानें हा शोकरूपी अग्नि आतां शांत कर."

गणधराग्रणी वृषभसेनाचें हें भाषण ऐकून भरतचक्रवर्ती शांत झाला. नंतर ज्याचा आत्मसाक्षात्कार होण्याचा काल अगदीं जवळ आला आहे असा तो सम्राट् भरत वृषभसेन गणधराला नमस्कार करून, आपल्या सर्व लवाजम्यासह अयोध्येला परत गेला. तेथें गेल्यावर एके दिवशीं हा राजा आपलें मुखकमल स्वच्छ दर्पणांत पहात असता त्याला वृद्धपणा प्राप्त झाल्यामुळें मस्तकांत एक पांढरा केंस दिसला. तत्काल त्याचा मोह नष्ट होऊन त्याला उपरति झाली; त्यायोगें त्याला आपलें राज्य तुच्छ वाटूं

लागेल; त्यानें अर्ककीर्ति पुत्रावर सर्व राज्यभार सोंपविला. आणि स्वतः श्रीजिनदीक्षा घेतली. ज्याला सर्व तत्वांचें ज्ञान झालें आहे अशा त्या मुमुक्षु भरतानें यम समिति वगैरे संपूर्ण संयमाचा स्वीकार केला. थोड्याच अवधींत ह्या राजर्षीला मनःपर्ययज्ञान व तदनंतर केवलज्ञान हीं झालें. त्यायोगानें भरत मुनींचें ठिकाणीं त्याचवेळीं अनिर्वचनीय असा भव्यपणा उत्पन्न झाला. एकंदरीत ह्या जगांत जीवाला सुखाची प्राप्ति फार चमत्कारिक रीतीनें होते! पूर्वी आपल्या साम्राज्यांतील सर्व लोकांकडून पूजिला गेलेला चक्रवर्ती भरत आतां सुरेंद्रादिकांनीं ही वंदिला गेलेला असा होत्साता त्रैलोक्याचा स्वामी झाला. खरोखर, दुष्कर तपश्चर्या करणाऱ्याला काय बरें साध्य होणार नाहीं! आपल्या सद्धर्मोपदेशानें भव्यजीवांना आनंद देणाऱ्या या भरत मुनीनें ह्या पृथ्वीवर पुष्कळ दिवस विहार केला. व अंतीं आपल्या आयुष्याचा एक मुहूर्तपरिमाण काल उरला असतां, तीन प्रकारच्या देहबंधाचा ( औदारिक, तैजस व कार्माण ह्या तीन प्रकारच्या शरीरांचा ) नाश होण्याकरितां, ज्यानें समाधि मरणाची क्रिया केली आहे, असा तो भरतेश्वर सिद्धालयीं जाऊन शाश्वत व श्रेष्ठ सुखाचा अनुभव घेऊं लागला. तसेंच, सर्व प्राण्यांविषयीं ज्यांनीं मित्रभाव धारण केला आहे व जे कालक्रमानें संयम, शील व गुण ह्यांनीं परिपूर्ण झाले आहेत असे ते श्रीवृषभसेनादि सर्व गुणवान् गणधरही अविनाशी अशा निर्वाणपदाला प्राप्त झाले.

---

त्रैलोक्यगुरु जो पुरु जिनपति त्यानें उपदेशिलेल्या मार्गानें वागणाऱ्या भव्यजीवांचें तो वीतरागदेव सर्व प्रकारें कल्याण करो !

---

## मंगल श्लोक.

योऽभूत्पञ्चदशो विभुः कुलभृ(घृ)तां तीर्थेशिनां चाग्रिमो ।
दृष्टो येन मनुष्यजीवनविधिर्मुक्तेश्च मार्गो महान् ॥
बोधो रोधविमुक्तवृत्तिरखिलो यस्योदपाद्यन्तिमः ।
स श्रीमान् जनकोऽखिलावनिपतेराद्यः स दद्याच्छ्रियम् ॥

अर्थः—जो भगवान् आदिजिनेंद्र, मनूंमध्यें पंधरावा ( शेवटचा ) व तीर्थंकरामध्यें पहिला झाला, ज्यानें मानवी जीवनाचा उपाय व मुक्तीमार्ग प्रत्यक्ष पाहिला, ज्याला ज्ञानावरणीयादि कर्मांच्या क्षयामुळें निष्प्रतिबंध झालेलें शेवटचें श्रेष्ठ असें संपूर्ण केवलज्ञान प्राप्त झालें, तो संपूर्ण क्षत्रियांचा पिता व सर्व क्षत्रियांमध्यें पहिला असा **पुरुनाथ** तुम्हांला सर्व संपत्ति देवो !

साक्षात्कृतमथितसप्तपदार्थसार्थः ।
सद्धर्मतीर्थपथपालनमूलहेतुः ।
भव्यात्मनां भवभृतां स्वपरार्थसिद्धि-।
मिक्ष्वाकुवंशवृषभो वृषभो विदध्यात् ॥

अर्थः—ज्यानें प्रसिद्ध अशा जीवादि सात पदार्थांचा समूह प्रत्यक्ष पाहिला आहे, व जो सद्धर्मतीर्थमार्गाच्या रक्षणाचा मूलनायक आहे असा इक्ष्वाकुकुलांत श्रेष्ठ असलेला श्रीवृषभ-तीर्थंकर संसारांत असलेल्या भव्यजीवांची परमार्थसिद्धि करो !

यो नाभेस्तयनोऽपि विश्वविदुषां पूज्यः स्वयंभूरिति ।
त्यक्ताशेषपरिग्रहोऽपि सुधियां स्वामीती यः शब्द्यते ॥
मध्यस्थोऽपि विनेयसत्वसमितेरेवोपकारी मतो ।
निर्दानोऽपि बुधैरुपास्यचरणो यः सोऽस्तु वः शान्तये ॥

अर्थः—जो नाभिराज, मनूचा पुत्र असूनहीं, स्वयभू असल्यामुळें सर्व विद्वज्जनाना पूज्य झाला, सर्व परिग्रहांचा त्याग केला असूनही, जो बुद्धिवानाचा अग्रेसर म्हणून म्हटला जातो; जो मध्यस्थ म्हणजे रागद्वेष यानीं रहित असूनही, भव्यजीवांच्या समूहावर उपकार करणारा म्हणून मानिला गेला, व जो दाता नसूनही पंडितलोक ज्याच्या चरणाची उपासना करितात असा श्रीवृषभनाथ तुमच्या शांति सुखाकरिता असो ! म्हणजे तो तुम्हांस शांति देवो !!!

हें भगवज्जिनसेनाचार्यकृत धन्य व यशस्कर श्रीमहापुराण जो पठण किंवा श्रवण करील तो संपूर्ण संकटांतून तरेल.

---

भगवद्गुणभद्राचार्यकृत श्रीमहापुराणांतील प्रथमतीर्थंकर व प्रथमचक्रवर्ती यांचें पुराण समाप्त.

---



डेमी अष्टपेजी ] **जैनधर्मादर्श.** [ पृष्ठें २४०

**लें० रावजी नेमचंद शहा वकील, सोलापूर.**

या पुस्तकाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. त्यांपैकीं पूर्वार्धांत जैनधर्मासंबंधीं आपल्या लोकांचे व पाश्चात्यांचे गैरसमज व अज्ञान अथवा भ्रांतज्ञान यांचें निरसन केलें असून जैनधर्माचें प्राचीनत्व व सनातनत्व अनेक ग्रंथांच्या आधारें सिद्ध केलें आहे. उत्तरार्धांत जैनधर्माचे सिद्धांत व तत्त्वज्ञान यांचें सविस्तर विवेचन जैन ग्रंथांवरून फारच सोप्या भाषेंत केलें आहे. यांत ज्ञानावरणादि कर्मांचीं सुबक ८ चित्रें व पदस्थ ध्यानाच्या कमळाचें १ मनोहर चित्र अशीं सुंदर ९ चित्रें दिलीं आहेत. पुस्तकांच्या अंतरंगाप्रमाणें बाह्यांगहि सुंदर केलें आहे. छपाई सुरेख. पुस्तक जैनांस व जैनेतरांस अत्यंत उपयुक्त व शिक्षाप्रद होईल. किंमत १ रुपया. पुस्तक किती उत्कृष्ट साधलें आहे हें महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध विद्वानांच्या व भारदस्त वर्तमानपत्रकारांच्या खालील कांहीं अभिप्रायावरून समजून येईल:—

केसरी, ता. १४।२।११:—" हिंदुस्थानांत वैदिकधर्माचे खालोखाल जैनधर्मच इतरांहून प्राचीन आहे. अर्थात्, या दृष्टीनें हिंदुस्थानांतील समाजांचा इतिहास जाणूं इच्छिणारांस जैनधर्म, जैनतत्वज्ञान व जैनवाङ्मय यांची माहिती विशेष महत्वाची आहे. पूर्वीं दुराग्रहामुळें व सांप्रत अज्ञानामुळें जैनधर्म,

जैनतत्वज्ञान व जैनवाङ्मय यांचेसंबंधानें जैनेतरांत फार गैर-समज व वितुष्ट असे किंवा आहे. अशा प्रकारचे भ्रामक सिद्धांत व दुराग्रह किंवा गैरसमज यांचें निरसन करण्याचें काम कोणा तरी जैनविद्वानानें हातीं घेऊन तें तडीस नेणें अवश्य होतें; व रा. शहा यांच्या या पुस्तकानें हा हेतु कांहीं अंशीं साध्य होणार आहे पूर्वार्धांत जैनधर्मासंबंधानें सामान्य विवेचन बाबू बनारसीदास एम्. ए. एल्. बी. यांच्या इंग्रजी निबंधाच्या आधारें केलें आहे; व उत्तरार्धांत **जैनधर्म, जैन तत्वज्ञान व जैनविधी** यांची माहिती **जैन ग्रंथांवरून स्वतंत्रपणें** दिली आहे. जैनधर्म व तत्वज्ञान यांची माहिती **थोडक्यांत व सुलभपणें** जैनांस व जैनेतरास मिळेल अशी पुस्तकाची रचना असून ती देतांना ऐतिहासिक दृष्टीचा अव-लंब रा. शहा यांनीं ठिकठिकाणीं केला आहे. पूर्वार्धांत जेथें जैनधर्माचा, वैदिक व बौद्ध धर्मांच्या तुलनेनें, विचार केला आहे, तेथें विद्वानांत व शोधकांत मतभेद होण्याचा संभव आहे. तथापि असा मतभेद झाला तरी जैनधर्माची संगतवार माहिती देणारा सुलभ मराठी ग्रंथ या नात्यानें त्याची योग्यता कमी होत नाहीं. व या दृष्टीनें असा उपयुक्त व संग्रहणीय ग्रंथ लिहिल्याबद्दल आह्मी रा. शहा यांचें अभिनंदन करितों. ”

ज्ञानप्रकाशः—ता. १४।९।१२ “ सोलापूरचे वकील रा० रावजी. ने० शहा यांनीं हें पुस्तक लिहिलें असून त्यांत जैन-र्मासंबंधानें अनेक गोष्टींची व्यवस्थित चर्चा केली आहे. पूर्वार्धा-मध्यें कित्येक वादग्रस्त प्रश्नाचा विचार केलेला आहे. जैनधर्म,

बौद्धधर्म व ब्राह्मणधर्म यांच्यामधील संबंध काय; त्याचप्रमाणें निरनिराळ्या दर्शनांचा जैनधर्माशीं कितपत संबंध पोंचतो; जैनधर्माचा खरा संस्थापक कोण; कित्येक पाश्चात्य पंडितांचे व त्याचप्रमाणें कित्येक हिंदी लेखकाचे जैनधर्मासंबधानें कसे गैरसमज आहेत; जैनधर्म किती प्राचीन आहे वगैरे प्रश्नांची चर्चा लेखकानें निरनिराळी प्रमाणें घेऊन केलेली असल्याकारणानें भिन्नमतवादी लोकांनाहि ती विचारणीय अशी झालेली आहे. उत्तरार्धांत जैनधर्मांतील "तत्वज्ञान", आचार," नियम, संस्कार यांची माहिती दिलेली आहे. मराठी भाषा बोलणाऱ्या जैनधर्मानुयायी लोकांना हें पुस्तक उपयुक्त आहेच, परंतु वैदिक धर्मानुयायी व इतर लोकांनींहि जैनधर्मासंबंधानें माहिती करून घेण्याकरितां हें पुस्तक अवश्य वाचावें अशी आमची शिफारस आहे. धार्मिक बाबतींत प्रामाणिकपणाचा मतभेद कायम राहिला तरी गैरसमज असणें केव्हाही इष्ट नाहीं आणि इतरांच्या धार्मिक मतासंबधानें गैरसमज दूर होण्यास त्या मतांची त्यांच्या दृष्टीनें माहिती घेतली पाहिजे. सांप्रत, हिंदुस्थानांतील निरनिराळ्या धर्मपंथांच्या लोकांत परस्परांविषयीं सहानुभूति उत्पन्न होण्याची फार अवश्यकता आहे. ती सहानुभूति उत्पन्न होणें हें परस्परांविषयींचे चुकीचे ग्रह नाहींसे होण्यावरच व निरनिराळ्या धर्मांतील तत्वें व आचारविचार यांचें योग्य ज्ञान करून घेण्यावर अवलंबून आहे हें उघड होय. लेखकाची भाषा नेमस्त असून विचारसरणी नुसती वावदूकपणाची नाहीं हें येथें अवश्य नमूद केलें पाहिजे."

कै. प्रो. हरि महादेव भडकमकर. बी. ए. १७।३।११:—
" पुस्तकाची भाषा सुबोध व सुरेख आहे. जैनधर्मादर्श या पुस्तकाचा उपयोग प्राकृत वाचकास चागला होईल. जैनधर्मीयांस स्वधर्माची ओळख व त्याची उपपत्ति व इतर जिज्ञासूंस सुबोध रीतीनें जैनधर्मतत्वांची ओळख आपले पुस्तकामुळें बऱ्याच अंशानें होईल असें मला वाटतें. जैनधर्माचीं मुख्य तत्वें हल्लीं प्रचलित असलेल्या हिंदुधर्माला विरूद्ध नाहींत; किंबहुना हल्लींच्या धर्मस्वरूपास बऱ्याच अंशीं तीं कारणीभूत आहेत. व त्यामुळें या धर्मांतील तत्व कोणतें व रूढ स्वरूप कोणतें याची ओळख करण्याची जिज्ञासा इतर सहभूत धर्मानुयायांसही खास असली पाहिजे. व ही जिज्ञासा बऱ्याच अंशानें आपल्या पुस्तकाच्या उत्तरार्धानें पुरी होते असें मला वाटतें. सुबोध ग्रंथ या विषयावर आपण मेहनत घेऊन मराठी भाषेत लिहिल्यामुळें सर्व जिज्ञासु मराठी वाचकांस हा लाभच आपण करून दिला आहे. "

श्रीयुत वासुदेव गोविंद आपटे. बी. ए. संपादक ' आनंद ' १७।४।११:—जैनधर्माविषयीं सामान्यतः आपल्या व पाश्चात्य लोकांत जें शोचनीय अज्ञान वसत आहे व त्यामुळें त्याच्या आचारविचारासंबंधानें जे गैरसमज झालेले आढतात ते दूर करण्यास आपलें पुस्तक चागलें उपयोगी पडेल. यांत जैनाविषयींचे गैरसमज, त्याचीं धर्ममतें, तत्वज्ञान आचार वगैरे विषयांची पुष्कळ चांगली माहिती आहे. आपण बरेच परिश्रमपूर्वक पुस्तक लिहून जैनधर्माविषयींच्या माहितीचा प्रसार कर-

ण्याचें पुण्य संपादिलें आहे असें समाधान मनास वाटल्या वाचून राहत नाहीं. असें सुंदर पुस्तक जिज्ञासूनीं अवश्य वाचावें.

**रा. रा. सीताराम केशव दामले. बी. ए. एल्. एल्. बी. माजी संपादक राष्ट्रमत व राष्ट्रोदय. २८।२।११:—** " प्रस्तुतच्या ग्रथामध्यें रा. शहा यानीं अनेक ग्रथाच्या आधारानें जैनधर्माचें प्राचीनत्व सिद्ध करून जैनधर्मांतर्गत शुद्ध व उदात्त तत्वाचें स्पष्टीकरण सरळ व पद्धतशीर रीतीनें केलें आहे. जैनधर्मीयास व जैनधर्माची माहिती करून घेण्याची इच्छा ज्याना असेल अशा जैनेतर वाचकाना या पुस्तकापासून पुष्कळ फायदा होण्यासारखा आहे "

**श्रीयुत अण्णापा फड्यापा चौगुले बी. ए. एल. एल. बी. ११।३।११** —" आपला ग्रथ वाचला. पुष्कळ खटपट करून लिहिला आहे. जैनधर्माचीं जीं मुख्य अंगे आहेत त्याजबद्दल चागली माहिती दिली आहे. ग्रथ निर्दोष होण्याबद्दल चागली काळजी घेतली आहे. "

**प्रोफेसर ए. बी. लठ्ठे एम् ए. २३।१।११:**—आपण परिश्रम चागलें केलेले आहेत याबद्दल आपलें अभिनंदन केलें पाहिजे. पुस्तकाबद्दल आपले आभारी आहोंत. "

Mr N W Pai B A L L B Government Pleader.

28 th July 1911

A very interesting work entitled " Jain Dharmadarsha " has been kindly presented te me by the author. The work is written throughout in simple and even elegant Marathi, and in a very

intelligible manner Those who do not believe that any one religion has the sole monopoly of all the vital religious truths, but that such truths are to be found in a greater or less degree in all the best religions over the earth, will naturally feel a great curiosity to know what are the tenets of religions other than their own Such people have not always the time to study the various authoritative books which set out the religious tenets of varous religions. But small manuals like the present one giving in a small compass a clear exposition of the religious belief of an intelligent class are welcome, as affording the necessary information easily and in an interesting manner. The author is to be congratulated on having produced a very readable & excellent work.

**श्री. ना. वि. पै. बी. ए. एल्. एल्. बी.:**—जैनधर्मादर्श नांवाचें पुस्तक ग्रंथकर्त्यानें मजकडे पारिक्षणाकरितां पाठविलें होतें. या पुस्तकाचा उद्देश फार स्तुत्य दिसतो. अलीकडे कामधंद्यामध्यें सर्व लोक गुंतून गेल्यामुळें आपआपल्या धर्माचीं पवित्र पुस्तकें वाचून समजून घेण्याची सवड सर्वांस नसते. अशा लोकाकरितां लहान सुवाच्य पुस्तकें लिहून त्यांना स्वधर्माचीं रहस्यें समजावून देण्याचा उद्योग फार स्तुत्य आहे. अशा प्रकारचा उद्योग रा. शहा यांनीं केलेला दिसतो. हें त्यांचें लहान सुवाच्य पुस्तक अन्यधर्मानुयाई लोकांसही जैनधर्माची माहिती सुलभ रितीनें करून देण्यास उपयुक्त

होईल. पुस्तकाची भाषासरणी सुलभ व सरस अशी साधली आहे; व विषयही चांगल्या रितीनें वाचकांपुढें मांडले आहेत. मजला हें पुस्तक वाचून आनंद वाटला, व मी ग्रंथकर्त्याचें अभिनंदन करितो.

जैनमित्र १५।२।११:—" यह २४० सफेकी पुस्तक सुंदर कागज, मराठी भाषा, बालबोध टाईप और रमणीक जिल्दसाहित हमारे पास ग्रंथकर्ता श्रीयुत रावजी नेमचंद शहानें भेजी है. ग्रथकारनें इस पुस्तकका संपादन कर महाराष्ट्रदेशके मनुष्योंके साथ बहुत बडा उपकार किया है. पूर्वार्द्धमें लाला बनारसीदासरचित जैन इतिहासके आधारपर इस बातको स्पष्ट रीतिसे सिद्ध किया है की, जैन धर्म एक बहुत प्राचीन धर्म है. हिंदु और बौद्ध मतसे सर्वथा भिन्न है तथा इस युगमें इसके प्रचारक श्रीऋषभदेवजी हुए हैं. उत्तरार्धमें जैन धर्मके सात तत्व, चौदह गुणस्थान, आठ कर्म, ग्यारह प्रतिमा, बारह भावना, सप्तभंगीनय तथा ध्यान आदिका वर्णन अनेक प्राचीन जैन शास्त्रोंके आधारसे बहुत खुलासेवार किया है. यह पुस्तक जैन और अजैन दोनोंके पढनेके लिये बहुत उपयोगी है. महाराष्ट्र देशके जैन बोर्डिंगोंमें रहकर व अन्य रीतिसे अंग्रेजी पढनेवालोंके लिये धार्मिक पठनक्रममें प्रथम इस पुस्तकके प्रचारकी आवश्यकता है. ग्रंथकर्ताको इस ग्रथके रचनेमें बहुतसे शास्त्रोंका अवलोकन करना पडा होगा; जिससे विदित होता है बहुत परिश्रम किया है. पाठकोंको चाहिये की लेखकके उत्साहको बढावें अर्थात् प्रत्येक महाराष्ट्रभाषाज्ञाता जैनीको चाहिये की इस पुस्तकको मंगावें तथा अन्यमती मित्रोंको भेट करें. "

जैनहितैषी. वर्ष ७. अंक ७ व ८:—पुस्तक पढकर हम बहुत प्रसन्न हुए. इसके लिखनेमें लेखकने आशातीत सफलता प्राप्तकी है जैनसमाजकी ओरसे इस ढंगकी जितनी पुस्तकें प्रकाशित की जावें, उतनी थोडी है. जैन नामधारी-योंको जैनधर्मसे परिचित करानेकी जितनी आवश्यकता है, उतनी बल्कि उससे भी अपने आसपासके विपुल अजैनोंको जैनधर्मका वास्तविक स्वरूप बतलानेकी है. यह पुस्तक उक्त दोनों आवश्यकताओंकी पूर्तीके लिये लिखी गई है इससे जैनीभी लाभ उठा सकते हैं. अजैनोंको जैनधर्मसे परिचित करानेके लिये तो यह बहुतही अच्छी है. इसके लिखनेमें लेखकने बहुत परिश्रम किया है, और इस बातका प्रयत्न किया है जिससे जैनधर्मको पहिले पहिले देखनेवाला कुछ समझ सके. यदि हमारे समाजके वे विद्वान जिन्होंनें शास्त्रीय पद्धतीसे जैनधर्मका अध्ययन किया है, इस ढगसे ग्रंथ लिखनेका प्रयत्न करें-धर्मके गूढ विषयोंको सरलतासे समझाना सीखें—तो जैनधर्मका बहुत बडा उपकार हो सकता है. गरज यह कि, पुस्तक बहुत अच्छी बनी है. यदि कोई धर्मात्मा इसकी दो सौ चार सौ प्रतियां भिन्नधर्मी सुशिक्षित लोगोंमें मुफ्त बितरण करनेकी कृपा करें, तो बहुत लाभ हो.

---

कवीवर्य दत्तात्रय भीमदेव रणदिवे.

दावावया यथार्थ श्रीजिनधर्मस्वरूप जननेत्रा ॥
वाङ्मयरूपीं त्वां जो निर्मल 'आदर्श' निर्मिला मित्रा ॥१॥
निजधर्माचें साचें त्यांत प्रतिबिंब पाहुनी रमलें ॥
मन्मानस निःसंशय पुरविल तव थोर हेतु हा गमलें ॥२॥

पळवील वृथा दुराग्रह हा अज्ञा सत्य धर्म कळवील ॥
जिनतत्वज्ञानेक्षण करण्या संशोधकांस वळवील ॥ ३ ॥
ऐसा ग्रंथाचें तव जैनसमाजाकडोनि हो चीज ॥
जो निर्मिला तनूची वेळेची सोसुनी तुवा झीज ॥ ४ ॥

---

श्रीजिनविजय. वर्ष ९ अंक १२:—"हें अत्यंत उपयुक्त पुस्तक रा. शहा यांनी फारच परिश्रमपूर्वक लिहिलें आहे. यांत जैनधर्माचें प्राचीनत्व व सनातनत्व उत्तम प्रकारें सिद्ध केलें असून, त्यांत जैनधर्माच्या तत्त्वांचें स्पष्टीकरण फारच सुलभ भाषेंत देण्यांत आलें आहे. अशा प्रकारच्या उपयुक्त पुस्तकाची आमच्या समाजांत जी उणीव होती ती श्रीयुत शहा व प्रकाशक गांधी यांनी भरून काढल्याबद्दल त्यांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करितों. हें पुस्तक प्रत्येकानीं अवश्य घ्यावें असें आम्ही आग्रहपूर्वक सूचवितों. पुस्तकाची छपाई व बाइंडिंग उत्तम असून त्या मानानें किंमत १ रुपयाही फार नाहीं."

दिगंबर जैन. वर्ष ४ अंक ५।—"आ पुस्तक दरेक जैन तेमज अन्य बंधूने खास वाचवालायक छे. अने ए पुस्तक संशोधन करीने प्रगट करवानो मि. रावजी नेमचंद शहानो प्रयास अत्यंत प्रशंसनीय अने गुजरातना भाईयोंने अनुकरण करवा लायक छे."

जैनहितैषी. वर्ष ७. अंक ७ व ८:—पुस्तक पढकर हम बहुत प्रसन्न हुए. इसके लिखनेमें लेखकने आशातीत सफलता प्राप्तकी है जैनसमाजकी ओरसे इस ढंगकी जितनी पुस्तकें प्रकाशित की जावें, उतनी थोडी है. जैन नामधारीयोंको जैनधर्मसे परिचित करानेकी जितनी आवश्यकता है, उतनी बल्कि उससे भी अपने आसपासके विपुल अजैनोंको जैनधर्मका वास्तविक स्वरूप बतलानेकी है. यह पुस्तक उक्त दोनों आवश्यकताओंकी पूर्तीके लिये लिखी गई है इससे जैनीभी लाभ उठा सकते है. अजैनोंको जैनधर्मसे परिचित करानेके लिये तो यह बहुतही अच्छी है. इसके लिखनेमें लेखकने बहुत परिश्रम किया है, और इस बातका प्रयत्न किया है जिससे जैनधर्मको पहिले पहिले देखनेवाला कुछ समझ सके. यदि हमारे समाजके वे विद्वान जिन्होंनें शास्त्रीय पद्धतीसे जैनधर्मका अध्ययन किया है, इस ढंगसे ग्रंथ लिखनेका प्रयत्न करें-धर्मके गूढ विषयोंको सरलतासे समझाना सीखें—तो जैनधर्मका बहुत बडा उपकार हो सकता है. गरज यह कि, पुस्तक बहुत अच्छी बनी है. यदि कोई धर्मात्मा इसकी दो सौ चार सौ प्रतियां भिन्नधर्मी सुशिक्षित लोगोंमें मुफ्त वितरण करनेकी कृपा करें, तो बहुत लाभ हो.

---

कविवर्य दत्तात्रय भीमदेव रणदिवे.

दावावया यथार्थ श्रीजिनधर्मस्वरूप जननेत्रा ॥
वाङ्मयरूपीं त्वां जो निर्मल 'आदर्श' निर्मिला मित्रा ॥१॥
निजधर्माचें साचें त्यांत प्रतिबिंब पाहुनी रमलें ॥
मन्मानस निःसंशय पुरविल तव थोर हेतु हा गमलें ॥२॥

पळवील वृथा दुराग्रह हा अज्ञा सत्य धर्म कळवील ॥
जिनतत्वज्ञानेक्षण करण्या संशोधकांस वळवील ॥ ३ ॥
ऐशा ग्रंथाचें तव जैनसमाजाकडोनि हो चीज ॥
जो निर्मिला तनूची वेळेची सोसुनी तुवा झीज ॥ ४ ॥

---

श्रीजिनविजय. वर्ष ९ अंक १२:—"हें अत्यंत उपयुक्त पुस्तक रा. शहा यांनीं फारच परिश्रमपूर्वक लिहिलें आहे. यांत जैनधर्माचें प्राचीनत्व व सनातनत्व उत्तम प्रकारें सिद्ध केलें असून, त्यांत जैनधर्माच्या तत्वांचें स्पष्टीकरण फारच सुलभ भाषेंत देण्यांत आलें आहे. अशा प्रकारच्या उपयुक्त पुस्तकाची आमच्या समाजांत जी उणीव होती ती श्रीयुत शहा व प्रकाशक गांधी यांनीं भरून काढल्याबद्दल त्यांचें आह्मी मनःपूर्वक अभिनंदन करितों. हें पुस्तक प्रत्येकांनीं अवश्य घ्यावें असें आह्मी आग्रहपूर्वक सूचावितों. पुस्तकाची छपाई व बाइंडिंग उत्तम असून त्या मानानें किंमत १ रुपयाही फार नाहीं."

दिगंबर जैन. वर्ष ४ अंक ५:—"आ पुस्तक दरेक जैन तेमज अन्य बंधूने खास वाचवालायक छे. अने ए पुस्तक संशोधन करीने प्रगट करवानो मि. रावजी नेमचंद शहानो प्रयास अत्यंत प्रशंसनीय अने गुजराथना भाईयोंने अनुकरण करवा लायक छे."

प्रगतिः—"भाषा सरळ व सुबोध आहे. छपाई व पुस्तकाचा उठाव चांगला आहे. पुस्तक उपयुक्त व आश्रय देण्यास योग्य आहे."

वन्दे जिनवरम्. वर्ष ३ अंक ४:—" प्रस्तुत अशींच पुस्तकें जेवढीं होतील तेवढीं चागलीं. या पुस्तकाच्या परिशीलनानें अन्यमतावलंबीयांनाही जैनधर्माचें रहस्य सहज कळून येईल असें आमचें मत आहे. "



## श्रीमत्पूज्यपाद स्वामिकृत.

## समाधिशतक.

याचें मराठी भाषांतर रा. रावजी नेमचंद शहा वकील सोलापूर यांनीं केलें आहे. यांत आत्मा ह्मणजे काय, त्याचे प्रकार किती आहेत, आपण कोण आहोंत, काय करतो, काय करावें, कोण व्हावें, कशाचा उपभोग करावा, कशाविषयीं प्रेम बाळगावें, कशावर भक्ति करावी, कोणत्या वस्तूंचा त्याग करावा, संसारी जीवाला शांततेच्या वातावरणांत कसें राहतां येईल व मानवी जीविताचें अंतिम ध्येय काय आहे ? इत्यादि विषयांचे विवेचन आचार्यांनीं केलें आहे. सारांश, हा ग्रंथ आध्यात्मिक असून भव्य जीवांना मोक्षमार्गाला लावणारा आहे. प्रस्तावनेंत श्रीमान् पूज्यपाद आचार्यांचें अल्प चरित्र दिलें असून, तें प्रसिद्ध इतिहाससंशोधक प्रो. काशीनाथ बापूजी पाठक बी. ए यांनीं तपासून शुद्ध केलें आहे. कागद व बाइंडिंग उत्तम. छपाई सुरेख. किंमत ६ आणे.

याचें गुजराथी भाषांतर विद्याप्रेमी श्रीमंत सरकार सयाजीराव गायकवाड यांनीं मुद्दाम करविलें असून तें तिकडील [illegible]त्यानें अभ्यासक्रमांत नेमिलें आहे.

‘ समाधिशतकावरील ’
# निवडक अभिप्राय.

विविधज्ञानविस्तारः—( माहे नोव्हेंबर १९१२ ) ‘ मूळ ग्रंथ प्रसिद्ध जैन आचार्य श्रीमान् पूज्यपादस्वामींनीं केला, ’ व पं. प्रभाचंद यांनीं टीका लिहून तो सुगम केला. तथापि मूळ ग्रंथ व टीका दोन्हीं संस्कृत भाषेंत असल्या कारणानें व ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय आत्मज्ञानासारखा गहन असल्यामुळें जैनधर्मो-विषयींच्या जिज्ञासूना या ग्रंथाचा सुलभ परिचय करून देण्यासाठीं रा. शहा यानीं केलेल्या सरळ मराठी भाषांतरासारख्या भाषांतराची आवश्यकता होती. ती गरज प्रस्तुत पुस्तकानें भागेल, व जैनागमाचीं प्रमेयें आणि रहस्यें संस्कृतानभिज्ञ लोकांना यापासून चांगल्या प्रकारें कळतील. प्रस्तुतचें पुस्तक नुसतें भाषांतरच नाहीं, तर अर्थविशद करणारा टीकाग्रंथही आहे. पुस्तकाची छपाई वगैरे चांगली असून किं० ६ आणे स्वल्पच आहे.

आनंदः—( आक्टोबर १९१२ ) ‘ हा अध्यात्मपर ग्रंथ मराठी वाचकास सुलभ व सुगम करून देण्याचें श्रेय रा. शहा यानीं केलें आहे. प्रयत्न फार स्तुत्य आहे. ’

केरळकोकिळः—( आक्टोबर १९१२ ) “ श्रीमत्पूज्यपादस्वामिकृत एका जैनधर्मीय संस्कृत ग्रंथाचें, हें भाषांतर असून, तें सोलापूरचे वकील रा. रावजी. ने. शहा यांनीं केलें आहे. भाषांतर सरळ, सोपें व शुद्ध आहे. पुस्तक जैनधर्मीयांना उपयुक्त आहेच; पण त्यांतील तत्वें जैनेतरानाही वाचनीय व मननीय आहेत. रा. शहा यानीं जैनधर्माचें वाङ्मय मराठींत आणण्याचा जो उपक्रम केला आहे, तो अभिनंदनीय आहे. ”

कबूल करावें लागेल. परंतु हीं साधूचीं वचनें प्रचारांतील भार्षेत गोंविलीं नसतील तर इष्ट फलास व्यवधान उत्पन्न होतें. ह्मणून त्यांचा स्फुट अनुवाद करणें जरूर पडतें. या दृष्टीनें पाहतां रा. रावजी नेमचंद शहा यानीं नवीन भाषांतर केलेला ' सामायिक पाठ ' हा ग्रंथ निदान जैनधर्मीय आबालवृद्धांस तरी अत्यंत महत्वाचा आहे. यांतील अनुवाद सुबोध व सुरस आहे व त्यामुळें मूळाच्या अर्थाचें मार्मिक ज्ञान होतें. सबब यथार्थ सुखाची इच्छा करणारे सर्वजन या पुस्तकाचा उपयोग करून घेतील अशी आशा आहे. "

( ता. १३।९।१२. ) कै० प्रो. ह. म. भडकमकर. बी. ए.

* * *

( २ ) सामायिकपाठः-" जैनधर्मी मनुष्यास सर्वांत अधिक जरूरीची एकादी गोष्ट असेल तर ती सामायिक हीच होय. सामायिक करण्याची प्रवृत्ति आपल्यांत जितकी वाढेल तितकी चांगली हें यावरून स्पष्ट आहे. आपण दिलेले तिन्ही पाठ चांगले आहेत; त्यांचें भाषांतरही चांगलें झालें आहे; आणि पुस्तकाचा उठावहि रम्य आहे. यामुळें सामायिक करणाऱ्यांची सोय झाली यात शंका नाहीं. या सोयीचा फायदा घेऊन प्रत्येकजण समता-भावाचा अनुभव प्राप्त करून घेईल तर त्यांचें व जगाचेंहि किती तरी हित होईल ! "

कोल्हापूर,<br>ता. २३।७।१९१२ } प्रो. आ. बा. लठ्ठे. एम्. ए.

(३) सामायिकपाठः–" रागद्वेषादि विकाराना सोडून एकाग्र चित्तानें धर्मचिंतनांत निमग्न होणें याला जैनधर्मांत 'सामायिक' ह्मणतात. भाषांतर चांगलें झालें आहे. किंमत २ आणे अल्प आहे." (आगष्ट १९१२.) आनंद.

* * *

(४) सामायिकपाठः–या सामायिक पाठाचें जैनांमध्यें मोठें महत्व आहे. त्यांस आणि जैनधर्माची माहिती करून घेणाऱ्या इतरांस या पुस्तकापासून मोठा उपयोग होईल.
(नोव्हेंबर १९१२.) विविधज्ञानविस्तार.

* * *

(५) सामायिकपाठः– " यात जैनधर्माचे तीन सामायिकपाठ दिले आहेत. तीन्ही पाठ जैन आचार्यकृत असून त्याचें भाषांतर दिलें आहे त्यावरून त्याचें महत्व कळून येईल."

(ता. १७।८।१२). केसरी.

* * *

(६) सामायिक पाठः–" यांत तीन सामायिक पाठांचा समावेश केला आहे. त्यातील दोन संस्कृतांत व एक हिंदींत असून त्यांचा मराठींत अर्थ दिलेला आहे. सामायिक हा विधि ध्यान चिंतन यासारखा असून तो प्रत्येक जैनाला अवश्य मानलेला आहे. अर्थात् प्रत्येक जैनधर्मानुयायानें हें पुस्तक संग्रहीं ठेवण्यासारखें आहे. "

(ता. १४।९।१२.) ज्ञानप्रकाश.

(७) सामायिक पाठः–" यांत निरनिराळ्या जैन–आचार्यांनीं मुमुक्षुजनांच्या उद्धारार्थ सांगितलेल्या तीन संस्कृत पाठाचें मराठी भाषांतर रा. रा० ने० शहा वकील, सोलापूर यांनीं केलें आहे. पाठांत सांगितलेलीं तत्वें अत्यंत उदार असून रा. शहा यांचें मराठी भाषांतरहि चांगलें वठलें आहे. धर्माचें सर्व वाङ्मय मूळ संस्कृत भाषेंत असल्यामुळें सामान्य जनांना त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. खऱ्या धर्माच्या अज्ञानानें समाजांत धर्मासंबंधानें एक अगदीं अनास्था तरी माजते, किंवा अंधविश्वास बोकाळतो. ही स्थिति भयावह आहे. तेव्हां रा. शहा यानी जैनधर्माचें वाङ्मय मराठींत आणण्याचा जो उपक्रम केला आहे, तो अभिनंदनीय आहे. "

आक्टोबर १९१२. केरळकोकिळ.

---

याच लेखकाची ' श्रीमहापुराणामृत ' (किंमत १ रुपया) व ' भगवज्जिनसेन व भगवद्गुणभद्र यांचें चरित्र ' (किंमत ४ आणे.) हीं दोन नवीन पुस्तकें विक्रीस तयार आहेत.

हीं सर्व पुस्तकें ग्रंथकर्त्याकडे अथवा जैनबुकडिपो सोलापूर फलटण गल्लींत मिळतील.

---

टीप —१ हें चरित्र प्रो पच घी भिडे एम्, ए एल् एल् बी यानीं तपासून शुद्ध केलं आहे .